"गणकभास्कर" विष्णु गोपाळ नवाथे यांचीं

# ज्योतिष विषयावरील पुस्तकें.

**सुलभजातक भाग १ ला**--( आवृत्ति ५ वी. ) हें पुस्तक नवीन शिकणारां-साठीं लिहिलें आहे. यांतील विषय-१ कुंडली म्हणजे काय ? २ कुंडली कशी मांडावी ? ३ हीच कुंडली खरी कशावरून ? ४ कुंडलीवरून जन्मकालाचा बोध. ५ परिभाषा. ६ शरीर. ७ विद्या. ८ स्त्रीसुख. ९ संतति. १० संपत्ति. ११ राजयोग. १२ रोग. १३ साडेसाती. १४ कालनिर्णय. किंमत ६ आणे.

**सुलभजातक भाग २ रा**--(आवृत्ति २ री.)यांतील विषयः-१ पंचांगावरून स्पष्ट ग्रह. २ इंग्रजी व हिंदी पद्धतीची भावचलित कुंडली. ३ नाक्षत्रकालाचें तारीखवार मध्यम मान. ४ नाक्षत्रकालाचा अनुक्रम.५अक्षांश १४।१६।१८।२०।२२ चें भावसाधन. ६ लंडन, कलकत्ता, मद्रास व मुंबई या शहरांचीं भावसाधन कोष्टकें, ७ होराद्रेष्काणादि दशवर्ग, लाग्नतम व अक्षांश रेखांश. किंमत १ रु.

**सुलभजातक भाग ३ रा**--विषय-१ भावसाधन. २ वर्गसाधन. ३ द्वादश-भावविचार. ४ भावविचाराचीं साधनें. ५ भावाधिपतीचें तात्विक फल. ६ भावा-धिपतींचे विशेष योग. ७ ग्रहांचें भावकारत्व. ८ कारकांश. ९ नक्षत्रें. १० राशि. ११ ग्रह. किंमत १ रुपया.

**सुलभजातक भाग ४ था**--या पुस्तकांतील विषय महाराष्ट्र वाचकांस अगदीं नवीन आहे. यांत प्रत्येक राशीचीं स्वरूपें, प्रत्येक अंशाचीं दृश्यें व त्यांचीं अंशफलें दिलीं आहेत. त्यांवरून अंशफल निश्चित करण्यास मोठी मदत होईल. या पुस्तकास ज्यो० यशवंत केशव प्रधान, ज्योतिर्मालाकर्ते, यांची भरपूर माहितीनें भरलेली प्रस्तावना जोडलेली आहे. किंमत १॥ रुपया.

**नाक्षत्रफल**--यांत अश्विन्यादि २७ योगताऱ्यांचीं व क्रांतिवृत्तांतील ४१ स्थिरताऱ्यांचीं फलें, त्याचप्रमाणें अश्विन्यादि विभागांचीं व त्या प्रत्येक विभागांतील सूर्यादि सर्व ग्रहांचीं फलें वर्णन केलीं आहेत. किंमत १२ आणे.

**जातकालंकार**--फलज्योतिषावर जे सुप्रसिद्ध आर्यग्रंथ आहेत, त्यांपैकीं हा एक ग्रंथ आहे. यांत मूळ संस्कृत श्लोक, मराठींत भाषांतर, व निरनिराळ्या योगांवर स्पष्टीकरण अशी योजना आहे. किंमत ६ आणे.

**जैमिनीयपद्धती**--या ग्रंथांत इतर जातकग्रंथांहून सर्वथा भिन्न अशी जातकपद्धति आहे. मूलसूत्र, त्याचा मराठींत सुबोध अर्थ व समजुतीसाठीं स्पष्टीकरण अशी यांत रचना केली आहे. किंमत ८ आणे.

**उडुदायप्रदीप**—या ग्रंथाचे संज्ञाध्याय, राजयोगाध्याय, आयुर्दायाध्याय व अंतर्दशाध्याय असे चार अध्याय असून मूळ, सुबोध अर्थ व अडचणींच्या ठिकाणीं विस्तृत खुलासा अशी यांत योजना केली आहे. किंमत ४ आणे.

---

# इतर उपयुक्त ज्योतिष ग्रंथ.

**वैद्यक-ज्योतिष-शिक्षक**--ल. ना. जोशी, मानवी शरीरावर राशींचे परिणाम कसे होतात, कोणता ग्रह अनिष्ट आला असतां कोणते रोग उद्भवतात व कोणत्या उपायांनीं त्यांचें निवारण करावें याची सशास्त्र माहिती यांत दिली आहे. किं.१।८

**जातकमार्गोपदेशिका**--य. के. प्रधान, या पुस्तकांत पत्रिका मांडण्याची शुद्ध शास्त्रीय पद्धती, राशिवर्णन, द्वादशभाववर्णन, प्रत्येक ग्रहांचे परस्पराशीं होणाऱ्या योगांचें विस्तृत फल इत्यादि विविध माहिती आहे. विद्वानांचे उत्तम अभिप्राय.
किंमत रु. २।८

**बालबोध ज्योतिष भाग १-२.**—य. के. प्रधान, हे दोन्ही भाग फलज्योतिषाचा अभ्यास करण्यास फार उपयोगी आहेत. किंमत ।१० व १ रु.

**षट्पंचाशिका**—मराठी भाषांतरासह.... ... ... ... ।१०

**योगचिंतामणि**---प्राकृत भाषांतरासहित. ... ... ... ।६

**सार्थ स्त्रीजातक**... ... ... ... ... ... ... ।७

**सार्थ स्त्रीसामुद्रिक**—हाही ग्रंथ आजपर्यंत स्वतंत्र पाहाण्यांत नव्हता. हा स्त्रीजातकाप्रमाणेंच ग्रहस्थित्यनुसार इष्टानिष्ट फलें दर्शविणारा आहे... ।४

**दगार्गलशास्त्र सटीक**—मराठी भाषांतरासहित. ( विहिरी खणवणारांस पाणी पहाण्याची अपूर्व सोय. ) ... ... ... ... ।७

इतर ज्योतिषग्रंथांचा आमचा मोठा कॅटलॉग लवकर मागवा.

**वि. ग भागवत आणि मंडळी,**
**बुकसेलर्स, पुणें नं. २**

॥ श्री ॥

# कीर्तनतरंगिणी.

## भाग दुसरा.




लेखक

पांडुरंग आबाजी मोघे

व

वामन एकनाथशास्त्री केमकर.



मुद्रक व प्रकाशक

केशव रावजी गोंधळेकर.

'जगद्धितेच्छु' प्रेस पुणे.

सन १९२३.

आवृत्ति नववी.

किंमत १: ट० ख० ८२ आणे

# अनुक्रमणिका.



* देवीप्रादुर्भाव व शिवरात्रीचरित्र हीं केमकर शास्त्री यांनीं अगदीं नवीं रचिलीं आहेत.

# प्रस्तावना.



कीर्तन म्हणजे काय व कीर्तनें करण्याचा प्रघात सुरू करण्याचें कारण काय व हा केव्हां कोणी सुरू केला हें प्रथम लोकांस कळणें अवश्य आहे; कारण कोणत्याही विषयाचें मूळ किंवा त्यापासून प्राप्त होणारें फळ याचें ज्ञान जर नसलें तर कर्त्याची क्रिया आणि करविणाराचा हेतु निष्फळ होऊन व्यर्थ शीण मात्र होतो. तो होऊं नये यासाठीं याविषयीं पुढें विवेचन करितों.

नारायणाच्या गुणांचे जे अनुवाद ते सशास्त्र वर्णन करून सहस्रावधि लोकांत उभें राहून सर्वांचें मनोरंजन होईल अशा सामुग्रीसह व्याख्यान देऊन सत्य एक परमात्मा याविषयीं ठसा उठवून देणें याचें नांव कीर्तन. भागवतांत जी नवविधा भक्ति सांगितली आहे त्यापैकीं ही दुसरी होय.

कृतयुगापासून द्वापारयुगापर्यंत हा कीर्तनाचा प्रकार मुळींच नव्हता. त्या तिन्ही युगांत वसिष्ठ, विश्वामित्र, व्यास व पराशरादि महान् ऋषि ज्ञानसंपन्न असून तत्त्वज्ञानी होते. ते जीवांचा उद्धार व्हावा म्हणून अनेकविध शास्त्रें रचून व्यासपीठावर बसून लोकांस ज्ञान, कर्म आणि उपासना यांचीं अनेकविध व्याख्यानें देत असत. पुढें कलीचा प्रादुर्भाव झाल्यावर कांहीं कालपर्यंत त्या ऋषींनीं केलेल्या ग्रंथांवर लोक भरंवसा ठेवून श्रवण, मनन व निदिध्यास करून कृतार्थ होत होते. अलीकडे लोक अगदीं कालग्रस्त होऊन अश्रद्धावान् व अकर्मास प्रवृत्त झाले; तेणेंकरून विद्या, बल आणि ज्ञान यांचा लोप होऊन लोक धर्माधर्माचा विचार न करितां केवळ पशुतुल्य व्यापार करूं लागले. असें हें लोकांचें दुःख भगवद्भक्तांनीं मनांत आणून त्यांचा उद्धार व्हावा याकरितां रामदास, तुकाराम, ज्ञानेश्वर आदिकरून जगदुद्धारार्थ अवतार घेतले, व त्यांनीं अज्ञानी लोकांस जमा करून कीर्तनरूपानें नानाप्रकारें कथा सांगून बरेच लोकांचा उद्धार केला. अलीकडे कांहीं विद्वान् लोकांनी शास्त्रविद्येच्या जोरानें व वाणीच्या माधुर्यानें व न्यायप्रतिपादक शास्त्राचे अनुरोधानें ईश्वराच्या भक्तीकडे बरेच लोकांचीं मनें वळविलीं; परंतु ते आत्मसाक्षात्कारी नसल्यामुळें परमार्थाविषयीं अंध असून त्यांचे श्रोतेही अंध; मग मुक्त कसे होतील हें सहजच कळतें.

प्रस्तुत काळीं कथा आणि पुराणें हे एक प्रकारचे व्यापाराच बनून राहिले आहेत. बरें, तो व्यापार तरी विद्वानांशिवाय चांगला व्हावयाचा नाहीं. विद्येच्या संबंधानें विचार केला तर दिवसेंदिवस शास्त्रज्ञ लोकांची संख्या कमी होत चालली आहे. बरें, ज्या ज्या ठिकाणीं पुराण आणि कथा होतात, त्या त्या स्थळीं अविद्वान् लोक व स्त्रिया यांखेरीज इतर समंजस लोक बहुधा मुळींच येत नाहींत असें म्हटलें तरी चालेल. कारण, ज्या मासल्याचे विद्वान् वक्ते त्याच मासल्याचे श्रोते. कीर्तन म्हणजे ज्याच्या श्रवणापासून अद्वैतज्ञान प्राप्त व्हावयाचें तें सर्व एके बाजूस राहिलें. पण लोकांस पद्धतवार कीर्तनही करितां येऊं नये काय? तर तेंही नाहीं. त्यांतून कोणास कथा करावी असें वाटल्यास कोठल्या तरी कांही कविता पाठ करून असंबद्ध रीतीनें पूर्वरंग व आख्यान यांचा संबंधही न जाणतां कसा

तरी वेळ घालवितात. कथेचे जुने सांप्रदायिक न राहिल्यामुळें कथा म्हणजे कशी असावी हेंही कोणास समजेनासें झालें. ह्यामुळें आम्हीं जें कीर्तनतरंगिणी नांवाचें पुस्तक तयार केलें आहे त्याचा हा दुसरा भाग आहे. पहिल्या भागांत हरिदासांस इतर दिवशीं कीर्तनास उपयोगी पडणारीं स्फुट आख्यानें व त्यांचे पूर्वरंगही घेतले आहेत.

ह्या दुसऱ्या भागांत हरिदासांस ज्याविषयीं आवश्यकताच असते अशीं राम, कृष्ण, नृसिंह इत्यादिकांचीं जन्माख्यानें व शेवटीं गोपाळकाला आणि ललित इतकें घेऊन हा भाग पुरा केला आहे. यांत प्रथम मंगलाचरणापासून कीर्तनाचे क्रमानें भजन, नंतर प्रतिपाद्य विषयाचा अभंग किंवा पद, त्यावर अनेक ग्रंथांतील सान्वय व सार्थ श्लोक, आर्या आणि कवित इत्यादि प्रमाणांनीं पूर्वरंगनिरूपण, मग आख्यानाचा उपक्रम, नंतर आख्यान आणि शेवटीं उपसंहार व आरती याप्रमाणें सर्व आख्यानें लिहिलीं आहेत. आख्यानांत कठीण शब्द आहेत त्यांचा अर्थ टिपेंत दाखविला आहे. संस्कृत कविता आल्यास त्यांवर अन्वयाचे आंकडे घालून त्यांच क्रमानें टिपेंत शब्दार्थ लिहिला आहे या ग्रंथाचा उपयोग कीर्तन करूं इच्छिणाऱ्या लोकांस विशेष आहे. ज्याला तालस्वरानें कामापुरतें ज्ञान व कांहीं वक्तृत्व आहे त्याला गुरूवांचूनही या पुस्तकाचे योगानें चांगलें कीर्तन करतां येईल. आणि उत्सवाचे दिवशीं हरिदासानें दुसरेंच आख्यान लावून गुलाल उधळण्याचे वेळीं एकादी तत्संबंधीं कविता म्हणून वेळ मारून न्यावी असा प्रसंग येणार नाहीं.

ह्या ग्रंथांत रा. पांडुरंग आबाजी मोघे व वे. शा. सं. वामन एकनाथशास्त्री केमकर यांनीं मदत दिली आहे. मोघे यांनीं बहुतकरून जुन्या कविता मिळवून आख्यानें तयार केलीं आणि केमकर यांनीं पूर्वरंगाची योजना ज्या आख्यानास जी उपयुक्त तीच तेथें घालून आख्यानांतील कविताही ज्या ठिकाणीं कमीजास्ती वाटल्या त्या ठिकाणीं फेरफार करून वाटलें तेथें ग्रंथाधारें स्वकृत नव्या संस्कृत व मराठी कविता घातल्या आहेत.

या ग्रंथाचा ज्यांच्या येथें असे उत्सव होतात त्यांस व हरिदास लोकांस व ग्रंथसंग्रहकर्त्यांस फारच उपयोग आहे.

केशव रावजी गोंधळेकर.

---

॥ श्री ॥

# कीर्तनतरंगिणी.

## भाग दुसरा.

### रामजन्म कीर्तन, पूर्वरंग निरूपण.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीमन्महागणाधिपतये नमः ॥ नमन ॥ अविरलमदजलनिवहं भ्रमरकुलानीकसेवितकपोलं ॥ अभिमतफलदातारं कामेशंगणपतिंवंदे ॥ १ ॥ याकुंदेंदुतुषारहारधवलायाशुभ्रवस्त्रान्विता, यावीणावरदंडमंडितकरायाश्वेतपद्मासना ॥ याब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैःसदावंदिता, सामांपातुसरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा ॥ २ ॥ नमोगुरुभ्योगुरुपादुकाभ्यो नमः परेभ्यः परपादुकाभ्यः ॥ आचार्यसिद्धेश्वरपादुकाभ्योनमोस्तुलक्ष्मीपतिपादुकाभ्यः ॥ ३ ॥ कृष्णंकमलपत्राक्षंपुण्यश्रवणकीर्तनम् ॥ वासुदेवंजगद्योनिंनौमिनारायणंगुरुं ॥ ४ ॥ गुरुर्ब्रह्मागुरुर्विष्णुर्गुरुर्देवोमहेश्वराः ॥ गुरुसाक्षात्परब्रह्मतस्मैश्रीगुरुवेनमः ॥ ५ ॥ मूकंकरोति वाचालंपंगुंलंघयतेगिरीम् ॥ यत्कृपातमहं वंदेपरमानंदमाधवं ॥ ६ ॥ संचिंतयेद्भगवतश्चरणारविंदंवज्रांकुशध्वजसरोरुहलांछनाढ्यं ॥ उत्तुंगरक्तविलसन्नखचक्रवालज्योत्स्नाभिराहतमहद्धृदयान्धकारं ॥ ७ ॥ इत्यादिकेंकरून देवास साष्टांग नमस्कार करावा. मागील मंडळींनीं रामकृष्णहरिराम जयजयरामरामजयराम ॥ याप्रमाणें भजन करावें. नमस्कार झाल्यावर हरिदासानें पुंडलिकवरदाहरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ इति नमन संपूर्ण ॥

पद—( राग तोडी. )

अरे अरे कांहिं तरी सोय धरी धरी रे ॥ परमवरदसुरुचिरतरकरनरनारायणपदधरणिधरण हा अनुदिनि मनिं जप करी रे ॥ अरे अरे कांहिं तरी० ॥ ध्रु० ॥ पशुसमहोशिलविषयींनिरत तरी परत परत अंतरीं रे ॥ भरींभरूनतूंघरींरमसिपरी श्रमसिगहनभवपुरींरे अरे अरे० ॥ १ ॥ नंदनंदनगोविंददीनजनबंधुवंद्यभवसिंधुतरी रे ॥ करुणावरुणालयशरणागतकरीपालनपदवरी रे ॥ अरे अरे० ॥ २ ॥ अमृतरायतवपादधरुनियांविनवितबहुबहुपरीरे ॥ नरतनुदुर्लभसखयावदवदवदनरहरी रे ॥ अरे अरे ० ॥ ३ ॥

भजन.

राधारमणा कंसारी, तारीं दुस्तर मन संसारीं ॥

कांहिं तरी सोय धरी धरी रे ॥ परमवरदसुरुचिरतरकरनरनारायणपदधराणिधरण ह्या अनुदिनीं मनि जप करी रे ॥ अरे अरे कांहिं० ॥ ध्रु० ॥

## उपोद्घात.

आदौ प्रारंभाचे ठायीं अपरोक्षसाक्षात्कारानुभवी शुकसनकादिक भगवद्भक्त जे ते स्वचरणशरण म्हणजे आपल्या चरणीं शरण आले असे जे साधनचतुष्टयसंपन्न अधिकारी मुमुक्षु प्रभृति अविद्योपाधियुक्त जीव, त्यांकारणें कर्मानुसार अनेक योनींची प्राप्ति होऊन जन्ममरणरूप दुःखातें उत्पन्न करणारें असें जें अज्ञान त्याचा नाश होऊन जन्ममरण व्यथा चुकावी आणि प्राण्यास अखंड दंडायमान असा जो सच्चिदानंदस्वरूप श्रीभगवान त्याची स्वात्मैक्यभक्ति प्राप्त व्हावी असा जो युगपरत्वेंकरून सुलभ उपाय तो सांगतात. अमृतराय म्हणतात. कांहितरी सोय धरी० ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न असा जो नारायण त्याचा अनन्यभावानें जप कर. हा अलभ्य नरदेह तुला प्राप्त झाला आहे, तर तूं विचार न करतां पशुवत् विषयासक्त होऊन ह्या संसारांत निमग्न होऊन आपल्या जीविताचें अनहित करून घेऊं नको; म्हणून वारंवार प्रार्थना करितात कीं, कांहीं तरी सोय धरी० ॥ तूं म्हणशील कीं, वृद्धापकालीं नारायणाचा जप करूं. तर बापा, ह्या क्षणभंगुर नरतनूचा भरंवसा नाहीं. यास प्रमाण आर्या—आयुः क्षणलवमात्रं न लभ्यते हेमकोटिभिः क्वापि ॥ तच्चेद् गच्छति सर्वं मृषा ततःकाऽधिका हानिः ॥ अर्थ—हें आयुष्य क्षणलवमात्र आहे, याचें अतिक्रमण झालें असतां कोटिशः द्रव्य खर्च केलें तरी पुनः प्राप्त होणार नाहीं. असें हें अमूल्य आयुष्य व्यर्थ गेलें ह्मणजे यापेक्षां दुसरी हानि ती कोणती ? तर यापेक्षां दुसरी हानि नाहीं. म्हणून सांगतात ॥ कांहीं तरी सोय धरी ॥ अमृतराय तव पाद धरुनिया विनवित बहु बहु परी रे ॥ नरतनु दुर्लभ दुर्लभ सखया ॥ वद वद वद नरहरी रे ॥ अरे अरे कांहिं तरी सोय धरी० ॥ यास्तव अमृतराय पुनः पुनः मुमुक्षूची प्रार्थना करितात कीं, हे मानवा, निरंतर भगवन्नामाचा जप केला असतां त्यापासून काय फळ प्राप्त होतें याविषयीं कथा सांगतों, श्रवण कर. वाल्मीक हा महान् पतित असून रामनामाच्या जपानें प्रतिव्यास होऊन त्यानें रामावतार होण्यापूर्वीं रामलीला वर्णन केल्या. तें भक्ताचें भाष्य सत्य व्हावें याजकरितां प्रभूंनीं तदनुसार अवतारचरित्र केलें. तें असें कीं, कोणी एके काळीं रावणानें नारदाप्रत प्रश्न केला कीं, माझें निधन कोणाच्या हस्तें आहे तें सांगा. त्या काळीं नारदांनीं सांगितलें कीं, हे दशानना, दशरथ नामें सार्वभौम राजाचा पुत्र रामचंद्र या नामें जो प्रसिद्ध होईल, त्याच्या हस्तें तुझें निधन होईल. असें ऐकून रावणानें सांगितलें कीं, दशरथाचें लग्नच होऊं देत नाहीं, मग राम कोठून उत्पन्न होईल ? असें सांगून पुढें दशरथाचे लग्नामध्यें विघ्न करून आनंदयुक्त होऊन रावणानें लंकेंत जाऊन ब्रह्मदेवास सांगितलें कीं, मीं दशरथ-लग्नाचा विध्वंस केला. त्याकाळीं ब्रह्मदेवांनीं सांगितलें कीं, हे दशानना, दशरथाचें लग्न झालें. असें ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून रावण तेव्हांपासून गाईब्राह्मणांस पीडा करूं लागला. या योगानें पृथ्वीला भार होऊन ब्रह्मदेवाचे अग्रभागीं गोरूपानें देवब्राह्मणांसहवर्तमान ती शरण गेली, एतद्विषयीं कथा निरूपण करितात.

# रामजन्माख्यान.



आर्या ।। श्रीरामचरित करितें मुक्त सकृत् किमपि सेवितां भावें ।। पार न लागे दशशतवदनाहि परंतु वाटतें गावें ।। १ ।। श्लोक वामनी ।। जगीं तूं असा कीं घटीं एक माती । गुण श्लोक कोटींत तुझे न माती ।। निरूपीन त्या सिंधूच्या बिंदुमात्रा । पुरे तेंचि संसाररोगासि मात्रा ।। २ ।। अध्यात्मरामायण श्लोक ।। भूमिर्भारेण मग्ना दशवदनमुखाशेषरक्षोगणानां, धृत्वा गोरूपमादौ दिविजमुनिजनैः साकमब्जासनस्थं ।। गत्वा लोकं रुदंती व्यसनमुपगतं ब्रह्मणे प्राह सर्वं । ब्रह्मा ध्यात्वा मुहूर्तं सकलमपि हृदावेदशेषात्मकत्वात् ।।३।। आर्याजलजोद्भव हें परिसुनि जाय सुरांसहित सिंधुकूलातें । तेथें स्तविता झाला श्रीशातें सज्जनानुकूलातें ।।४।।पद।।राग भैरवी।। धांव रमापते ज्ञानविलासा ।। पूर्णपरात्परशांतिनिवासा ।। ध्रु०।। रावण हा खल दुर्मद भारी ।। गोद्विज पाहुनि येउनि मारी ।। धर्म न ठेवित हा अविचारी ।। तोड विभो भवदायक फांसा ।।धांव०।।१।। राक्षस गांजिती काय करावें ।। दुःखनिधीप्रति कैंवि तरावें ।। चित्त किती कवळोनि धरावें ।। जाणुनि पहासि काय तमासा ।। धांव० ।।२।। पालय पालय सत्सुखसारा ।। दे तुझिया चरणीं दृढ थारा ।। रामकृष्ण गुरुराज उदारा ।। पांडुरंगा निजसुख दे दासा ।।३।। धांव०।।५।। ओंवी ।। दशाननाच्या कारागारीं ।। अनुदिनीं असतां सुरवरीं ।। ब्रह्मादिकां चिंता भारी ।। म्हणोन सर्वेश प्रार्थिला ।। ६ ।। अध्यात्मरामायण श्लोक ।। भगवन् रावणो नाम पौलस्त्यतनयो महान् ।। राक्षसानामधिपतिर्मद्दत्तवरदर्पितः।। ।। ७ ।। त्रिलोकीं लोकपालांश्च बाधते विश्वबाधकः ।। मानुषेण मृतिस्तस्य मया कल्याण कल्पिता ।। अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि देवरिपुं प्रभो ।। ८ ।। अभंग ।। धांवे पावें गरुडध्वजा ।। आम्हां अनाथांच्या काजा ।।१।। बहु झालों कासावीस ।। पाहें भोंवतालीं वास ।।२।। मज असोनियां ऐसा ।। तुजसारिखा कोंवसा ।।३।। तुका म्हणे हळूं चालीं।।चालूं नको धांव घालीं ।।४।।९।। आर्या ।। राजीवलोचनें त्या देवोक्तांचें करोनियां श्रवण ।। मा भैष्ट अशा शद्वें

---

अध्यात्मरामायण श्लोक तिसरा.

मग्ना ( व्याकूल ) दशवदनमुखाशेषरक्षोगणानां ( रावण—प्रमुख सर्वराक्षससमुदायांच्या) धृत्वा ( धारण करून ) दिविज ( देव ) साकं ( सहवर्तमान ) अब्जासनस्य ( ब्रह्मदेवाच्या ) गत्वा ( जाऊन ) व्यसनं ( दुःख ) उपगतं ( प्राप्त झालेलें ) प्राह ( बोलली ) ध्यात्वा ( ध्यान करून ) मुहूर्तं ( दोन घटिका ) सकलमपि ( सर्वही ) हृदा ( अंतःकरणानें ) अवैत् ( जाणता झाला )अशेषात्मकत्वात् ( सर्व जगाचा समुदायरूप असल्यामुळें ) श्लोक ७. पौलस्त्यतनयः ( पौलस्त्यऋषीचा पुत्र ) मद्दत्तवरदर्पितः ( मी दिलेल्या वरानें गर्विष्ठ )श्लोक ८.त्रिलोकीं ( स्वर्गमृत्युपातालांत ) लोकपालन् ( इंद्रादि लोकपालांस ) बाधते ( बाधा करतो ) विश्वबाधकः ( सर्व विश्वास पीडा करणारा ) मृतिः ( मरण ) तस्य ( रावणाची )मया (मीं) कल्याण ( हे कल्याण ) कल्पिता ( कल्पिली ) अतः ( यास्तव ) त्वं ( तूं ) मानुषः ( मनुष्य )भूत्वा ( होऊन ) जहि ( मार ) देवरिपुं ( रावणास ).

तोषविलें स्वांघ्रिपंकजप्रवण ॥१०॥ उदारराघव श्लोक॥वत्साः किं बिभिथदुरात्मनामरीणांमुत्खातं रणभुवि राघवः करिष्ये ॥ उत्पत्स्ये दशरथसूनुरेकधा च त्रेधा च त्रिजगदुपप्लवोपशांत्यै ॥११॥ ओंवी ॥ समस्तवृंदारकांचेभार॥ अवश्यव्हावेवनचर ॥ ममानुजसुमित्राकुमार ॥ धरणीधरहोईल ॥१२॥ कुंबुचक्रेआयुधेंसुंदर ॥ तीमजबंधुरूपेंनागर ॥ मजअद्वयदेहप्रकार ॥ धरणें लागे सुरकार्य ॥१३॥ उदारराघव श्लोक ॥ इत्युक्त्वाझटिति हरिस्तिरोदधेऽब्धौ देवास्ते वनभुवि वानरा बभूवुः ॥ लंकेशप्रमुखपलाशनप्रणाशे संकेतं तदवधिरित्युवाच धाता ॥१४॥ आर्या - राजप्रिया अयोध्या कोसलदेशीं यथार्थ नामा जी ॥ तेथें अजसुत दशरथ पाळी जो ख्यात या जनांमाजीं ॥१५॥ जगतीपतीस होत्या सार्धत्रिशत प्रिया अजि श्रेष्ठा ॥ कौसल्या कैकेयी आणि सुमित्रा तयांतही ज्येष्ठा ॥१६॥ राजास सौख्य कांहीं प्राप्त न झालेंचि पुत्ररत्नाचें ॥ यास्तव चिंताकुल तो मानीं वैफल्य सर्व यत्नांचें ॥ १७ ॥ पद ॥ गोड नलगे ऐश्वर्यभोग त्यामी ॥ अहोरात्रीं तो पुत्रहेत ज्यामी ॥ ध्रु० ॥ सर्वकाळ उच्छ्वासश्रमें सोडी ॥ सुताविणेंहेव्यर्थसर्व जोडी ॥१॥ पुत्रनसतांपशुत्ववेदवाणी ॥ देवांपितरां देईलकोणपाणी ॥ २ ॥ १८ ॥ आर्या ॥ मनुवंशीं जन्मुनियां झालों अनपत्य कीं न लोक मला ॥ यास्तव हयमेधीं हे द्यावी द्विजहस्तकीं म्हणे कमला ॥१९॥ उदारराघवश्लोक ॥कालज्ञः कमलभवात्मजः कदाचिद्ध्यात्वांतर्विहितविनिश्चयो वसिष्ठः ॥ खिंदानं तनयमवोचदिंदुमत्यश्छिंदानो रहसि रुजाममुष्यचित्ते ॥ २० ॥ चत्वारस्तव तनया भवंति यावत्सत्वाढ्यः सकलवसुंधराधुरीणाः ॥ इत्येवं सरसिजसंभवः कदाचिद्व्याचष्ट त्रिदिवसदां महासमाजे ॥ २१ ॥ ओंवी ॥ दशरथरायेंस्वप्नदेखिलें ॥ दो-

---

श्लोक ११—वत्साः ( बालक हो ) किं ( किमर्थ ) बिभिथ ( भितां ) दुरात्मनां ( दुष्टबुद्धि ) अरीणां ( शत्रूंचें ) उत्खातं ( निर्मूलन ) रणभुवि ( रणभूमींत ) करिष्ये ( करीन ) उत्पत्स्ये ( उत्पन्न होईन ) दशरथसूनुः ( दशरथाचा पुत्र ) एकधा ( एकारामरूपानें ) त्रेधा ( लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न ह्या तीन रूपांनीं ) त्रिजगदुपप्लवोपशांत्यै ( त्रैलोक्याच्या उपद्रवशांत्यर्थ ) श्लोक १४—इति ( असें ) उक्त्वा ( बोलून ) झटिति ( सत्वर ) तिरोदधे ( गुप्त झाला ) अब्धौ ( समुद्रांत ) वनभुवि ( वनांत ) बभूव ( झाले ) लंकेशप्रमुखपलाशनप्रणाशे ( रावणप्रमुख मांस भक्षिणाऱ्या राक्षसांच्या नाशार्थ ) तदवधि ( नाश होईपर्यंत )इति ( याप्रकारें ) उवाच ( बोलला ) धाता ( ब्रह्मदेव ).

उदार० श्लोक २०—कालज्ञः ( भूतभविष्यवर्तमानकालजाणणारा ) कमलभवात्मजाः ( ब्रह्मदेवाचा पुत्र ) कदाचित् ( कोणेएकेकालीं ) ध्यात्वा ( ध्यान करून ) अंतः ( अंतःकरणांत ) विहितविनिश्चयः ( केला आहे निश्चय ज्यानें ) खिंदानं ( खिन्न झालेला ) अवोचत् ( बोलला ) इंदुमत्त्याः ( इंदुमतीनामकदशरथाची माता तिच्या ) छिंदानः ( छेदन करणारा ) रहसि ( एकांतीं ) रुजां ( व्यथेस ) अमुष्य ( त्याच्या ) चित्ते ( मनांतील ) श्लोक २१—चत्वारः ( चार ) तव ( तुला ) तनयाः ( पुत्र ) भवंति ( होतील ) यावत्सत्वाढ्याः (संपूर्णपराक्रमसंपन्न ) सकलवसुंधराधुरीणाः ( समस्त पृथ्वीचा कार्यभार धारण करणारे ) इति ( याप्रकारें ) एवं ( असें ) सरसिजसंभवः ( कमलोद्भवब्रह्मदेव ) कदाचित् ( कोणेएकेसमयीं ) व्याचष्ट ( बोलला ) त्रिदिवसदां ( स्वर्गवासी देवांच्या ) महासमाजे ( मोठ्या सभेंत ).

घां पुरुषां आपणवधिलें ॥ आणीकएकस्त्रियेसीमारिलें ॥ अपराधेंवीण ॥ २२ ॥ गजबजोनिऊठे त्वरित ॥ कोणाशींनबोलेमूकवत ॥ वसिष्ठगृहासीअकस्मात ॥ जाऊनस्वप्ननिवेदी ॥ २३ ॥ गुरुबोलेहेंदुष्टस्वप्न ॥ तीनश्वापदांसीवधून ॥ मग याचीशांतीकरून ॥ दोषदूरकरावा ॥ २४ ॥ दोघेंवृद्धेंखांदाघेउनी ॥ श्रावणतीर्थेहिंडेमेदिनी ॥ तोसरोवरतीरींयेवोनी ॥ क्षणभरीउभाराहिला ॥ २५ ॥ तंवतींवृद्धेंम्हणतीश्रावणा ॥ आम्हांसिकरवींउदकपाना ॥ ऐसेंऐकोनियांवचना ॥ कावडीखालींठेविली ॥ २६ ॥ श्लोक ॥ वामनी ॥ वंदोनियांगुरुपदांअजपुत्रतेव्हां ॥ जावोनि शोधिविपिनांतमृगासिजेव्हां ॥ चापासिलावुनिशरारविअस्तमानीं ॥ ऐकेतडागतटिंतीपक्षुतुल्य वाणी ॥ २७ ॥ आर्या ॥ होतां कमंडलुध्वनि राजा परिसुनि सपक्ष तो बाण ॥ सोडी श्रावणहृदयीं तत्काळीं पाहती निघों प्राण ॥ २८ ॥ ओंवी ॥ सपक्ष बाण हृदयीं झडपला ॥ हातींचा कमंडलू खालीं पडला ॥ देह भूमीवरी टाकिला ॥ प्राण चालले श्रावणाचे ॥ २९ ॥ कोणा सभाग्याचा बाण ॥ करीत आला नामस्मरण ॥ हृदय निवालें पूर्ण ॥ केलें पावन मजलागीं ॥ ३० ॥ साकी ॥ क्षब्द मानवी ऐकुनि भूपति उतरे वृक्षाखालीं ॥ अहाहा ब्राम्हणवध घडला काशि मजला भूलीं आली ॥ ३१ ॥ खेद करितां श्रावण बोले तळमळ न करी राया ॥ आतां किंवा शत वरुषांनीं जायाची हे काया ॥ ३२ ॥ ओंवी ॥ माझीं मायबापें वृद्धें दीन ॥ त्यांसी करवीं उदकपान ॥ मग मी सोडीन प्राण ॥ सत्य जाण राजेंद्रा ॥ ३३ ॥ वाल्मीकीरामायण श्लोक—इत्थमाकर्ण्य तद्वाक्यं जलपात्रैःसमन्वितः ॥ ययौ तयोः समीपे तु न ब्रुवन् आददत् ॥ ३४ ॥ ओंवी ॥ कां रे श्रावणा न बोलसी ॥ उदक मागितलें येवढे निशीं ॥ बा रे ह्मणोनि कोपलासी ॥ शिणलासी पाडसा ॥ ३५ ॥ बा जरी न बोलसी वचन ॥ तरी आम्ही न करूं उदकपान ॥ ऐसें नृपति ऐकतां कान ॥ बोले वचन तयांसी ॥ ३६ ॥ राव दशरथ सभीत बोलिला ॥ म्यां अवचित श्रावण वधिला ॥ तंव तींहीं देह धरणीं टाकिला ॥ प्राण झाले कासावीस ॥ ३७ ॥ श्लोक ॥ प्राणांतकालिं मग शापिति त्या नरेशा ॥ तूं पुत्र पुत्र करितां मरशील ऐसा ॥ ऐसें वदोनि त्यजिले निज देह त्यांनीं ॥ राजा मनीं बहुत हर्ष विषाद मानी ॥ ३८ ॥ आर्या ॥ येवोनियां अयोध्ये सांगे वधवृत्त तें तदा गुरुतें ॥ राया खेद करिसी कां हययज्ञो दुरितनाशनं कुरुते ॥ ३९ ॥ ॥ श्लोक ॥ अ० रा० ॥ ततोऽब्रवीद्वसिष्ठस्तं भविष्यंति सुतास्तव ॥ चत्वारः सत्वसंपन्ना लोकपाला इवापराः ॥ ४० ॥ आर्या ॥ जननार्थ नंदनाच्या प्रार्थुनि तो ऋष्यशृंग आणावा ॥ अनपत्यताऽसुखद्रुम मुनिप्रसादें समूळ खाणावा ॥ ४१ ॥ ऐशी आज्ञा जेव्हां मुनि दे रायासि तों त्रिविदलोकीं ॥ दैत्येंद्रें वृषपर्वें युद्धीं अमरेंद्र पीडिला तो कीं ॥ ४२ ॥ ओंवी॥ देवगुरु वाचस्पति ॥ त्यांणीं कळविलें इंद्राप्रति ॥ आणी अयोध्येचा नृपति ॥ ऐसा योद्धा

---

वालिमकी रामा० श्लो० ३४.– इत्थं ( याप्रकारें ) आकर्ण्य ( श्रवण करून ) तद्वाक्यं ( त्या श्रावणाचें वचन ) समन्वितः ( युक्त ) ययौ ( गेला ) तयोः ( त्यांच्या ) तु ( परंतु ) ब्रुवन् ( बोलतां ) आददत् ( दिलें )

आध्यात्मरामायण श्लोक ४०.–ततः ( तदनंतर ) अब्रवीत् ( बोलला ) तं ( त्या दशरथास ) भविष्यंति ( होतील ) सत्वसंपन्नाः ( पराक्रमसंपन्न ) लोकपाला ( इंद्रादिलोकपाल ) इव ( सारखे ) अपराः ( इतर. )

दुजा नसे ॥ ४३ ॥ **आर्या** ॥ मग तो मातलि—हस्तें पाठवि रथ त्या नृपासि आणाया ॥ येऊनि तोयावर्षण वृत्त कथी इंद्रसारथी राया ॥ ४४ ॥ **ओंवी** ॥ एकोनि दैत्य प्रताप अद्भुत ॥ तत्काळ रथीं बैसे दशरथ ॥ तंव कैकेयी रायासी बहुत ॥ काय बोले तेधवां ॥ ४५ ॥ मी समागमें येईन ॥ संग्राम तुंबळ पाहीन ॥ राय ह्मण तूं सुकुमार पूर्ण ॥ युद्धकंदन ते स्थळीं ॥ ४६ ॥ येरी म्हणे तुम्ही असतां ॥ मज भय नाहीं सर्वथा ॥ ऐसा बोल तिचा ऐकतां ॥ तत्काळ घेई रथावरी ॥ ४७ ॥ निराळमार्गें रथ ते वेळीं ॥ घेऊनि जाय चपळ मातली ॥ देवदैत्यांचे रणमंडळीं ॥ सत्वर येऊनि उतरला ॥ ४८ ॥ **श्लोक** ॥ रणीं तेधवां थोर संग्राम झाला ॥ बहु त्रास तो दानवांना द्विजांला ॥ मनीं धैर्य आणी भिडे शुक्र जेव्हां ॥ नृपें सोडिले बाण पस्तीस तेव्हां ॥ ४९ ॥ शरें अक्ष एकाक्ष छेदी रथाचा ॥ त्वरें कैकयीनें दिला हस्त साचा ॥ जया पावला तोषला राव भारी ॥ ह्मणे दोन देतों वरां माग नारी ॥ ५० ॥ **ओंवी** ॥ युद्धीं जय यावयाचें कारण ॥ पितृगृहीं असतां कैकयी जाण ॥ देवपूजा साहित्य पूर्ण ॥ ऋषीतें स्वहस्तें दिधलें ॥ ५१ ॥ **श्लोक** ॥ तपस्वी बहू पीडिला बाळभावें ॥ वदे शाप तो तूं जगीं निंद्य व्हावें ॥ दिलें नित्य साहित्य पूजावयातें ॥ वरा बोलिलों या करें दे यशातें ॥ ५२ ॥ तयीं कैकयीतें ऋषीराज बोले ॥ करा वोपितां स्यंदनीं दार्ढ्य आलें ॥ असो भार्गवें सोडितां तोयजाळा ॥ अयोध्यापुरीं वर्षती मेघमाळा ॥ ५३ ॥ बहुत सुख सुरेंद्रा गौरवी तो नरेंद्रा ॥ कनकवमनरत्नें देतसे राजमुद्रा ॥ सुरगुरु वरदानीं तुष्ट बोले तयासी ॥ त्रिभुवनपति पुत्रा देखसी निश्चयेंसी ॥ ५४ ॥ **साकी** ॥ दशरथ बोले दशशतनयना गुरु आज्ञा मज ऐसी ॥ पुत्रेष्टीकारणें हरिणिजा आणावें वेगेंसी ॥ ५५ ॥ **ओंवी** ॥ इंद्रें पाचारूनि देवांगना ॥ पाठविल्या अयोध्याभुवना ॥ रंभा उर्वशी शुभानना ॥ ज्यांच्या गायनें मन भुले ॥ ५६ ॥ दशरथ गुरु इंद्राची आज्ञा ॥ घेउनि आला अयोध्याभुवना ॥ आनंद झाला सकळ जनां ॥ महोत्साह घरोघरीं ॥ ५७ ॥ **साकी** ॥ महारनमो सिंग गुसाई बैठे अंतरग्यानी ॥ जंगल छोरकर आवत नहिसो भेजो रंभारानी ॥ ५८ ॥ **ओंवी** ॥ ऐकोनि नृपाची वाणी ॥ सर्वे दिव्यांगना घेऊनि ॥ मदन वसंत सहाय करुनी ॥ सुमंत गेला तपोवना ॥ ५९ ॥ ॥ **पृथ्वीछंद** ॥ नृपोक्त परिसोन त्या सुरवधू निघाल्या परी ॥ तदीय पितृभीतिनें मनीं सशंक नाना परी ॥ तशाचि सभया तदाश्रमसमीप गेल्या वनीं ॥ द्विजात्मजहि देखिला सदनीं एकला पावनीं ॥ ६० ॥ **ओंवी** ॥ आपण राहोनियां दूरी ॥ पुढें केल्या दिव्य नारी ॥ त्यांहीं दाविली स्वचातुरी ॥ मनोहरण करावया ॥ ६१ ॥ तयाचा जनक विभांडक ॥ करूं गेला माध्यान्हिक ॥ गुहेंत ऋष्यशृंग एक ॥ देखोनि गायन आरंभिलें ॥ ६२ ॥ **घनाक्षरी** ॥ किया गायनसे दंग ॥ भया लुब्ध ओ कुरंग ॥ दिया पीछे अंगसंग ॥ रुसीसिंग भुलाया ॥ ६३ ॥ **साकी** ॥ निर्जर वनिता गया तडप तब झांज मृदंग बजावे ॥ छुमछुम नाचत पल्लव झूलत सुंदर गायन गावे ॥ ६४ ॥ ॥ **ओंवी** ॥ तया म्हणती आमुचा देश ॥ दृष्टीं पहाल चार दिवस ॥ तरी तिकडील नाना जिन्नस ॥ आणून दाखवूं तुम्हांतें ॥ ६५ ॥ पहा त्या देशींची माती ॥ म्हणूनि कस्तूरी दाविती ॥ ग्रामधुळीस बुका म्हणती ॥ खडे नाबद शर्करा ॥ ६६ ॥ हातीं घेउनियां उंस ॥ तिकडील ऐसेचि म्हणती काश ॥ देखा अपूर्व द्रुमांस ॥ वाळव्यजना दाविती ॥ ६७ ॥ थिल्लरीं सांचवणी नीर ॥ म्हणून पुढें करिती अत्तर ॥ तैसाचि तनुसंगाचा प्रकार ॥

तोहि हळू हळू दाविती ॥ ॥ घनाक्षरी ॥ नमुनि पुसत ऋषीबाळ ॥ तुम्ही कोण हो कृपाळ ॥ वदा तुमचा लडिवाळ ॥ पदीं भाळ ठेवितों ॥ ६९॥ दिंडी ॥ अमर गणिका तैं म्हणती तपोधामा ॥ सांग आधीं तूं आपुल्याचि नामा ॥ येरु बोले मस्तकीं झालें शृंग ॥ याचिसाठीं मज म्हणती ऋष्यशृंग ॥ ७० ॥ हृदयिं आमुच्याही गंड हे उदेले ॥ म्हणुनि गंडर्षी हेंचि नाम झालें ॥ असो आतां जातोंचि आश्रमातें ॥ ह्मणुनि जाती मग टाकिती श्रमातें ॥ ७१ ॥ श्लोक ॥ भारत ॥ अथर्ष्यशृंगं विकृतं समीक्ष्य पुनः पुनः पीड्यं च कायमस्य ॥ अवेक्षमाणा शनकैर्जगाम सा कृत्वाऽग्निहोत्रस्य तदाऽपदेशं ॥ ७२ ॥ तस्यां गतायां मदनेन मत्तो विचेतनश्चाभवदृष्यशृंगः ॥ स्वाध्यायवान् वृत्तसमाधियुक्तो विभांडकः काश्यप आविरासीत् ॥ ७३ ॥ पद ॥ शृंगी बोले ताता स्वामी काय सांगूं तुम्हां ॥ मोठे साधू येऊनि गेले अद्भुत त्यांचा महिमा ॥ १ ॥ पुनरपि कैचें हो, दर्शन मजला त्यांचें ॥ ॥ ध्रु० ॥ दिव्य रूपधर नागर असतां मृदु मंजुळ वाणी ॥ भाषण करितां करूं कुरवंडी वाटे पंचप्राणीं ॥ २ ॥ पुन० ॥ उदयिक येतील न येतील कीं दैवें होते आले ॥ आतां ताता काय करावें विद्युत्सम ते झाले ॥ ३ ॥ पुन० ॥ तात म्हणे त्वां जाऊं दिल्हे राहविले कां नाहीं ॥ येरु म्हणे ते अनुच्छिष्ट कीं गेले हो लवलाहीं ॥ ४ पुन० ॥ ऐशी चटपट शृंगऋषीला त्यांची जडली भारी ॥ मोहित झाला जाऊनि वार्ता सांगती त्या शुक्रारी ॥ ५ ॥ पुन० ॥ दुसरे दिवशीं विभांडक तो प्रातःस्नाना गेला ॥ शृंगी गुंफे स्नान सारुनी अनुष्ठानीं ठेला ॥ ६ ॥ पुनरपि० ॥ ७४ ॥ कटिबंध जात नदीप्रति तात, तशांतचि घात, कराया शीघ्र पातल्या, स्ववेश्या त्या पाहुनि ऋषिसुत शृंगशिरा मनिं, दंग होऊनी, संगरहित परि अनंगयोगें, रंगुनिया तद्रूपीं त्यागुनि, वर्णधर्म निजशांति वर्म, मुनिकर्म आलिंगुनि, भर्मविभूषित गर्भदेह तो धर्मसहित, मृदुचर्म विमोहित, मनीं तळमळे शांत दांत परि भ्रांत होऊनि तत्संगतिनें गेला ॥ १ ॥ ऋषिपुत्र पवित्र तयांनीं ठकवूनि अयोध्यें नेला ॥ ध्रु० ॥ ॥ ७५ ॥ पद ॥ त्यासमयीं बहु ठकण्या नारी बसती शृंगीपाशीं ॥ येरू परता गायन ऐके आंवाळिला मोहपाशीं ॥ १ ॥ सांडुनि ध्याना हो ॥ तन्मय झाला गाना ॥ ध्रु० ॥ बहु सन्मानें या जी म्हणवुनि तृणासनें त्यां दिधलीं ॥ येरी आपुल्या चित्तीं म्हणती कार्यें आमुचीं झालीं ॥ २ ॥ सांडुनि० ॥ ऋषि म्हणे काल तुमचें आतिथ्य घडलें नाहीं ॥ येरी म्हणती वचन पाळितां सर्वेही घडलें पाही ॥ ३ ॥ सांडुनि० ॥ आपण तुमच्या वचनाविरहित कांहीं नाहीं सहसा ॥ चाल अमुच्या संगें म्हणतां अवश्य उठला तैसा ॥ ४ ॥ सांडुनि० ॥ न पुसतां तो गुंफा सांडी कृष्णाजिन विसरला ॥ जपतपमाळा नेणें कांहीं विषयातें अनुसरला

---

श्लोक– ७२.–अथ ( अनंतर ). विकृत ( विकार पावला ). समीक्ष्य ( पाहून ). पीड्य ( पीडित करून ) कायं ( देहास ). अस्य ( या ऋषीच्या ). अवेक्ष्यमाणा ( अवलोकन करीत ). शनकैः ( मंदगतीनें ). जगाम ( गेली ). सा ( अप्सरा ). कृत्वा ( करून ). तदा ( त्याकालीं ). अपदेशं ( मिष ). श्लोक ७३.–तस्यां ( ती अप्सरा ). गतायां ( गेली असतां ). मत्तः ( उन्मत्त ). विचेतनः ( ज्ञानहीन ). अभवत् ( झाला ). स्वाध्यायवान् ( वेदाध्ययनसंपन्न ) वृत्तसमाधियुक्तः ( सदाचार व समाधि यांनीं युक्त ). काश्यप ( काश्यपगोत्रोत्पन्न ) आविरासीत् ( आला ).

॥ ९ ॥ सांडु० ॥ अप्सरीं सूचना करितां बाहिर आला दशरथराजा ॥ पुजूनि सन्मानें तो नेला बरवा आपुल्या काजा ॥ ६ ॥ सांडुनि० ॥ ते समयींचा आनंद मोठा दशरथ राया भारी ॥ जगजीवन प्रभु शृंगी– ज्ञातीं लाधिन मी निर्धारीं ॥ सांडु० ॥ ७६ ॥ साका ॥ अया शृंगमुनि अजोध्यापुरमो दशरथराजा दिखावे ॥ सिंहासन बैठो महाराजा सब मुनि नमन करावे॥ ७७ ॥ श्लोक ० ततो दशरथो हर्षाद्दश्यशृंगाय भूषितां ॥ स्वसख्युर्लोमपादस्य राज्ञः शांतां सुतां ददौ ॥ ७८ ॥ साकी ॥ होमशालमो बेद पढत है बिचमों बैठत राजा ॥ सब चांदनमो सागर जैसा ऐसा सोहत राजा ॥ ७९ ॥ उधारराघव श्लोक ॥ अध्वर्यु- नरपतिना वृतो वसिष्ठो ब्रह्माऽभूदपि भगवान्स वामदेव ॥ होता विधि मखमृष्यशृंग आ- सीदुद्गाता भृगुरभवत्तदोदगासीत् ॥ ८० ॥ ऐक्ष्वाक क्षितिपतिरश्वमेधनाम्ना यज्ञेन त्रिदिव- सदो तथाविधीष्ट्वा ॥ पुत्रीयं पुरुषमचष्ट संततीष्ट्या यत्राग्नेर्व्यतत विभांडकस्य सूनुः ॥ ८१ ॥ ॥ अ० रा० श्लोक ॥ श्रद्धया हूयमानोऽग्नौ तप्तजांबूनदप्रभः ॥ पायसं स्वर्णपात्रस्थं गृहीत्वो- वाच हव्यवाट् ॥ ८२ ॥ आर्या ॥ मनुजेंद्रकरीं देउनि पायस परिपूर्ण हेमपात्रातें ॥ दे भार्यांसि म्हणे हे होतिल भवसागरीं नृपा, त्राते ॥ ८३ ॥ जन्म सफळ मानुनियां स्वपायसाचे करूनि युगभाग ॥ कौसल्येला देऊनि कैकेयीलाहि दे महाभाग ॥ ८४ ॥ यद्यपि भूपें न दिला भाग सुमित्रेसि तरिहि त्या तीतें ॥ निजभागार्ध समर्पुनि आनंदविती अपार नृपतीतें ॥ ८५ ॥ अ० रामायण ॥ उपभुंज्य चरुं सर्वाः स्त्रियो गर्भसमन्विताः ॥ देवता इव रेजुस्ताः स्वभासा राजमं- दिरे ॥ ८६ ॥ अभंग ॥ कुळगुरु वसिष्ठ सांगे नृपवरा ॥ असती गरोदरा तुझ्या कांता ॥ ८७ ॥ ॥ श्लोक ॥ गर्भिणी–वांछितं द्रव्यं तस्यै दद्याद्यथोचितम् ॥ सूते चिरायुषं पुत्रमन्यथा दोषमं- र्हति ॥ साकी ॥ सुनें गुरुका बचन कैकयिके घर नृप गया अघारी ॥ जानो पीछे

---

श्लोक ७८.–ततः ( तदनंतर ) भूषितां ( अलंकृत ) स्वसख्युः ( आपला मित्र ) लोमपादस्य ( लोमपाद या नांवाच्या ) राज्ञः ( राजाची ) शांता ( शांता या नांवाची ) सुतां ( कन्या ) ददौ ( दिली ) .

उदारराघव श्लोक८०–अध्वर्यु ( अध्वर्यु नांवाचा ऋत्विज ) नरपतिना ( दशरथ राजानें ) वृतः ( वरला ) ब्रह्मा ( या नांवाचा ऋत्विज ) अभूत् ( झाला ) भगवान् ( योगैश्वर्यवान् ) सः ( तो ) होता ( होम करणारा ) असौ ( तो ) अधिमखं ( त्या यज्ञांत आसीत् ( होता ) उद्गाता ( या नांवाचा ऋत्विज ) अभवत् ( झाला ) तदा ( त्या काळीं ) उदक् ( उत्तरेकडे ) आसीत् ( होता ) श्लोक ८१–ऐक्ष्वाकः ( इक्ष्वाकुकुलोत्पन्न ) क्षितिपतिः ( दशरथ राजा ) त्रिदिवसदः ( देवांस ) यथाविधि ( यथासांग ) इष्ट्वा ( यज्ञानें तृप्त करून ) पुत्रीयं ( पुत्र देणारा ) अचष्ट ( पाहिलें ) संततीष्ट्या ( पुत्रकामेष्टियज्ञानें ) यत्र ( जेथें ) व्यतत ( विस्तारित केलें ) सूनुः ( पुत्र ) श्लोक ८२–श्रद्धया ( आस्तिक्यबुद्धीनें ) हूयमाने ( होम केलेल्या ) तप्तजांबूनदप्रभः ( तप्त केलेल्या जांबुनदसुवर्णसम कांतियुक्त ) पायसं ( दुधाची क्षीर ) गृहीत्वा ( घेऊन ) उवाच ( बोलला ) हव्याट् ( अग्नि ) श्लोक ८६.---उपभुज्य ( भक्षून ) चरुं ( तो भात ) गर्भसमन्विताः ( गर्भिणी झाल्या ) देवता इव ( देवस्त्रियांसमान ) रेजुः ( शोभल्या ) ताः (त्या कौसल्यादि स्त्रिया ) स्वभासा ( स्वकीय कांतीनें ) श्लोक ८८.---तस्यै ( तिला ) दद्यात् ( द्यावें ) यथोचितं

गमनसे उनको रोस आयेगा भारी ॥ ८९ ॥ ॥ **अभंग** ॥ ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं ॥ कैकेयी-गृहासीं येता झाला ॥ १ ॥ मंचकीं बैसली होती ते पापिणी ॥ देखतां नयनीं पहुडली ॥ २ ॥ सुंदरपणाचा अभिमान मनीं ॥ त्यावरी गर्भिणी नामा म्हणे ॥ ३ ॥ ॥ ९० ॥ ॥ **अभंग** ॥ राजा म्हणे इच्छा तुझिये मानसीं ॥ डोहाळे मजसी सांगे आतां ॥ १ ॥ येरी म्हणे ऐसें वाटतसे जीवा ॥ कनिष्ठासी द्यावा राजपट ॥ २ ॥ **श्लोक स्रग्धरा** ॥ कैकेयी तैं म्हणे मत्तनय नृप असो सर्व भूमीसि राया ॥ ज्येष्ठा पुत्रासि सांगे मम अनुवचनें काननीं संचराया ॥ ऐशी वांछा द्विधा हे पुरविशी तरी तूं सत्य भूलोकपाळा ॥ ऐकूनीं खिन्न झाला नृपति मनिं म्हणे तैं अहा धिक्कपाळा ॥ ९१ ॥ **मागील अभंग**—ज्येष्ठासी दावावें दूर वनांतर ॥ नयो समाचार कधीं त्याचा ॥ ३ ॥ जनांत हें निंद्य विरुद्धचि कर्म ॥ करितां अधर्म पाप बहू ॥ ४ ॥ माझीये मस्तकीं ठेवावा हा दोष ॥ तुम्हांकडे लेश नाहीं त्याचा ॥ ५ ॥ निंदितील जन होय मज सुख ॥ ऐकतांचि दुःख राया झालें ॥ ६ ॥ वृश्चिकाचे पेंवीं सांपडे तक्षक ॥ घालितांचि घृत अग्निमुखीं ॥ ७ ॥ ऐशी व्यथा होय नामा म्हणे त्यासी ॥ उठला त्वरेंसी तेथोनियां ॥ ८ ॥ ॥ ९२ ॥ **द्रुतविलंबित** ॥ **श्लोक** ॥ नृप तदा चिरडे मुरडे त्वरें ॥ क्षण रडे नरडेंही सुके खरें ॥ मनिं म्हणे वनिं ताप नसे असा ॥ मजसि दे वनिता स्वकृतें जसा ॥ ९३ ॥ **दिंडी** ॥ सुमित्राके मंदीर जात राजा ॥ उसे देखत रहि खडी अगे भाजा ॥ भूप दिलमो तब खूष हुवा भारी ॥ कहे मांगो जो आस है तुमारी ॥ ९४ ॥ **अभंग** ॥ येतसे दशरथ सुमित्रामंदिरीं ॥ देखतां सामोरी येती झाली ॥ १ ॥ घालोनि आसन प्रक्षाळी चरण ॥ सर्वांगीं लेपन तीर्थोदकें ॥ २ ॥ गंध धूप दीप पुष्पांचिया माळा ॥ अर्पोनि तांबूला उभी राहे ॥ ३ ॥ होती जे डोहोळे तुझीया मानसीं ॥ सांगे मज-पाशीं पतिव्रते ॥ ४ ॥ **श्लोक** ॥ शालिनीवृत्त ॥ कौसल्येच्या नंदनाचीच सेवा ॥ माझ्या पुत्रा देई हा सत्य ठेवा ॥ माझे ठायीं त्वत्कृपा ते वमावी ॥ कौसल्येची स्नेहवृद्धी असावी ॥ ९५ ॥ **मागील अभंग** ॥ येरी म्हणे ऐसें वाटतसे जीवा ॥ वडिलांची सेवा अहर्निशीं ॥ ५ ॥ आवडे हें बहू नावडे आणिक ॥ द्यावें मज एक हेंचि आतां ॥ ६ ॥ घेऊनियां हातीं रत्नांचीं भूषणें ॥ टाकी ओंवाळूनि नामा म्हणे ॥ ७ ॥ ९६ ॥ **अभंग** ॥ राजा दशरथ उठला तेथूनी ॥ कौसल्या-सदनीं येता झाला ॥ १ ॥ पहातसे दृष्टीं तेव्हां श्रावणारी ॥ न माये अंतरीं तेज जिचें ॥ २ ॥ तुझिये मानसीं होती जे डोहाळे ॥ सांगे हो वेल्हाळे मजपाशीं ॥ ३ ॥ उदरांत असे भक्तांचा कैवारी ॥ तेथें कैंची उरीं देहभावा ॥ ४ ॥ सदा समाधिस्त रामरूप झाली ॥ कौसल्या माऊली नामा म्हणे ॥ ५ ॥ ॥ ९७ ॥ **पद** ॥ राग आलियाबिलावर ॥ मन रामीं रंगलें, अवघें मनचि राम झालें ॥ सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो ॥ मन रा० ॥ ध्रु० ॥ आत्मया रामाचें ध्यान लागलें मज कैसें हो ॥ क्रिया कर्म धर्म अवघें तेणेंचि प्रकाशे हो ॥ सत्य मिथ्या प्रकृति पुरुष रामचि अवघा भासे हो ॥ मन रा० ॥ १ ॥ मनचि हरपलें अवघें चैतन्यचि झालें हो ॥ देखणें देखतां अवघें विश्व मावळलें हो ॥ पाहतां पाहणेंपणा हरिला सर्वस्वें ठकविलें हो ॥ मन० ॥ २ ॥

---

( यथायोग्य ) सूते ( प्रसवते ) चिरायुष ( दीर्घायु ) अन्यथा ( असें न केलें तर ) दोषं ( पातकास ) अर्हति ( योग्य होतो ).

ज्ञान अथवा भक्ति शांति आणिक योगस्थिती हो ॥ निर्धारितां न कळे रामरूपाचि झाली वृत्ती हो ॥ एका जनार्दनीं अवघा रामाचि आदि अंतीं हो ॥ मन० ॥ ३ ॥ ९८ ॥ **अभंग** ॥ न बोलेचि कांहीं इसी काय झालें ॥ भूतें झडपियेलें निश्चयेंसी ॥ १ ॥ माझिये अदृष्टीं नाहीं हा नंदन ॥ म्हणुनियां विघ्न ओढावलें ॥ २ ॥ निवारीं संकट वैकुंठनायका ॥ रक्षीं या बाळका सुदर्शनें ॥ ३ ॥ नामाचा उच्चार ऐकतांचि कानीं ॥ नेत्र: उघडोनि पाहतसे ॥ ॥ ४ ॥ ९४ ॥ **ओंवी** ॥ दशरथ म्हणे हो कौसल्ये ॥ तुझें माझें लग्न लागलें ॥ तयीं रावणें विघ्न केलें ॥ तें तूं विसरलीस कैसेनी ॥ १०० ॥ नाम ऐकतांचि रावण ॥ म्हणे दे दे धनुष्यबाण ॥ करूं लंकेचें निर्दालन ॥ मारूं दारुण राक्षस ॥ १०१ ॥ **दिंडी** ॥ अपर तीरे मम सखीन् कपिन्नेतुं ॥ पुरा सिंधौ बध्नामि शिलासेतुं ॥ ततःकुर्वे संग्राममरीन् जेतुं ॥ तदनु पौलस्त्यं हन्मि दुःखहेतुं ॥ १०२ ॥ **अभंग** ॥ आणारे धनुष्य मारीन रावणा ॥ लंका बिभीषणा देईन मी ॥ १ ॥ अंगद सुग्रीव जांबुवंत वीरां मारुती पाचारा लवकरी ॥२॥ टाकुनि पर्वत बुजवा सागरा ॥३॥ पायवाट करा जावयासी ॥ लंकेपुढें मोठें माजवीन रण ॥ तोडीन बंधन निर्जरांचें ॥ ४ ॥ बोलिला वाल्मीकी तैसेंचि करीन ॥ वर्तून दावीन नामा म्हणे ॥ ५ ॥ ॥ १०३ ॥ **ओंवी** ॥ राजा बोलताहे स्पष्ट ॥ वेगें पाचारा वसिष्ठ ॥ रक्षा परीक्षा करी सुभट ॥ आम्हां श्रेष्ठ कुळगुरु ॥ १०४ ॥ सादर पाहूं गेला दृष्टीं ॥ तंव चित्त–चैतन्या पडली मिठी ॥ हर्ष बाष्प दाटला कंठीं ॥ पडला मेदिनीं मूर्छित ॥ १०५ ॥ ॥ **अभंग** ॥राजा म्हणे कैसें विपरीत झालें ॥ वसिष्ठा झोंबलें महाभूत ॥ १ ॥ श्रावणवधाचें पाप नाहीं गेलें ॥ दुजें हें निर्मिलें प्रारब्धानें ॥ २ ॥ऐकतांचि ऐसें सावध होऊनी ॥ बोल-तसे वाणी नामा म्हणे ॥ ३ ॥ ॥ १०६ ॥ **ओंवी** ॥ वसिष्ठ म्हणे भाग्य श्रेष्ठ ॥ पोटा आला हो वैकुंठ ॥ पुरुषोत्तम झाला प्रगट ॥ दैवें उद्भट कौसल्या ॥ १०७ ॥ श्रीरामाचा जन्मप्रभाव ॥ पहावया आला सुरसमुदाव ॥ अजन्मा जन्मेल रामराव ॥ तो नवलाव पाहुं आले ॥ १०८ ॥ सूर्यवंशीं येईल रघुनाथ ॥ म्हणुनि माध्यान्हां आला आदित्य ॥ लग्नीं साधिला अभिजित ॥ जन्ममुहूर्त साधिला ॥ १०९ ॥ ॥ **श्लोक** ॥ श्रीरामश्चैत्रमासे दिनदलसमयादित्यभे कर्कलग्ने । जीवेंदौ कर्कराशौ मृगभगतकुजेज्ञे वृषे मेषगेर्के ॥ मंदेजूकेऽगंना-यां तमसि शफरिगे भार्गवेये नवम्यां ॥ पंचोच्चस्थे वतीर्ण प्रभवतु भवतां जन्मपत्री च यस्य ॥ ११० ॥ **अभंग** ॥ सुवर्णाचा शोभे मस्तकीं मुगुट ॥ हिरे घनदाट तयावरी ॥ १ ॥ विस्तीर्ण कपाळ उत्कटा भ्रुकुटी ॥ तिलक ललाटीं केशराचा ॥ २ ॥ कमळाकार नेत्र आकर्ण शोभती ॥ कुंडलें झळकतीं कर्णीं ज्याच्या ॥ ३ ॥ सरळ नासीक आरक्त अधर ॥ हनुवटी

---

**श्लोक** ११०—दिनदलसमयादित्यभे ( माध्यान्हसमयीं पुनर्वसु नक्षत्रावर ) कर्कलग्ने ( कर्कलग्नीं ) जीवेंदौ ( बृहस्पति व चंद्र हे असतां ) कर्कराशौ ( कर्कराशींत ) मृगभगतकुजे ( मकरराशीवर मंगळ असतां ) ज्ञे वृषे ( बुध वृषभींचा असतां ) मेषगेऽर्के ( मेषराशीवर सूर्य असतां ) मंदे जूके ( शनि तूळराशीस असतां ) अंगनायां तमसि ( कन्याराशीचा राहु असतां ) शफरिगे भार्गवेये ( मीनराशीस शुक्र असतां ) पंचोच्चस्थे ( सूर्यादि पांच ग्रह असे उच्चस्थ असतां ) अवतीर्णः ( अवतरला ) प्रभवतु ( उत्कर्ष पावो ) भवतां ( तुम्हांस ) यस्य ( ज्याची ).

सुंदर राघवाची ॥४॥ कौस्तुभ मुक्तमाला रुळे वैजयंती ॥ भ्रमर भुलती नामा म्हणे ॥ ५ ॥ ॥ १११ ॥ श्लोक वामनी ॥द्रुतविलंबितवृत्त ॥ दुमदुम ध्वनि वाजति दुंदुभी ॥ सहित-रावण राक्षसवृंद भी ॥ सुख नरां अमरां सकळां महा ॥ प्रगटतांचि रघूत्तम राम हा ॥११२॥ उदाररा० श्लोक ॥ प्रहर्षिणी ॥ कौसल्या दितिजरिपुं सुषाव पुत्रं कैकेयी तदनु सुदर्शनं कुमारं ॥ शेषांशं समजनयत्तदा सुमित्रा शंखांशं यमलतया च तौ अभूतां ॥ ११३ ॥ आर्या ॥ ते काळीं जगदीश्वर जन्मा आला पिता विलोकि मुख ॥ स्नान करूनि जातक करि मातेच्या मायिना मनांत सुख ॥११४॥ अध्यात्मरामायण श्लोक ॥ उपसंहर विश्वात्मन्नेतद्रूपमलौकिकं ॥ दर्शयस्व महानंदं बालभावं सुकोमलं ॥११५॥ ओवी ॥ वचन ऐकोनि तात्काळ ॥ माधव झाला स्वयें बाळ ॥ बाळप्रभा अतिसुनीळ ॥ तेज फांके दशदिशा ॥ ११६ ॥ पद ॥ रामदर्शनासि चला ॥ लाभ हा भला ॥ ध्रु० ॥१॥ रामजन्म रामनवमि नक्षत्र पुनर्वसु समय मध्यान्ह दिवा अवतार झाला ॥ रामद० ॥१॥ दशरथासि दाशरथी पुत्र जन्मला ॥ त्रिभुवनांत आनंद थोर जाहला ॥ रामद० ॥२॥ भजकाचे कोटि अन्याय हा क्षमा करी ॥ उद्धरितां महाराज नाहीं भागला ॥ रामद० ॥३॥ शबरिकबरिबदरिफळें पदरिं घेउनी ॥ भावबळें मुलोनियां भक्षुं लागला ॥ रामद० ॥४॥ महाविषें त्र्यंबकासि अमृत लाधला ॥ पार्वतीसी थोर आनंद जाहला ॥ रामद० ॥५॥११७॥ श्लोक ॥ करें घे बरें बाळ पायावरी तें ॥ तदा त्यास न्हाणावया आदरी ते ॥ भरी भक्तिगंगालयीं प्रेमपाणी ॥ स्नेहें माखिला तो शिशु चक्रपाणी ॥११८॥ पद ॥ न्हाणि न्हाणि त्या निर्मलातें न्हाणी ॥ खाणि तीचिया भाग्याची कोण वाणी ॥ ध्रु० ॥ ज्याच्या स्नेहें देहभाव केले परते ॥ ज्याच्या स्नेहें जाळिलीं सकळहि दुरितें ॥ ज्याच्या स्नेहें सायुज्यसौख्य--भरतें ॥ त्याच्या स्नेहें जावळ माखी करीं तें ॥१॥ न्हाणि० ॥ गंगा जन्मे ज्याचिये चरणकमळीं ॥ त्यावरी पाणी घालिते हस्तकमळीं ॥ ब्रह्मादिक वंदिती पदरज--धूळी ॥ पदिंची माती घेउनि लावि कपाळीं न्हाणि० ॥२॥ देवनाथ प्रभु अंबर या विश्वा कीं ॥ अंग त्याचें पुसोनि वस्त्रें झांकी ॥ सर्वात्मा जो व्यापक अणुरेणू कीं ॥ मुखानिळें तयाचे कर्ण फुंकी ॥ न्हाणि० ॥३॥११९॥ आर्या॥ राम असें दशरथ नृप अन्वर्थ ज्येष्ठ सुनूचें नाम ॥ ठेवी भरत असें तो कैकेयी ज्यास लब्ध निजकाम ॥ १२०॥ महदानंदें दशरथ भूप सुमित्रा-सुतांसि सुविधानें ॥ लक्ष्मण शत्रुघ्न अशीं ठेवी सारीं यथार्थ अभिधानें ॥ १२१ ॥ आल्या सुवासिनी बहु हळदी कुंकुमांची

---

श्लोक ११३.—दितिजरिपुं ( दैत्यांचा शत्रु अशा ) सुषाव ( प्रसवली ) तदनु ( त्याच्या पश्चात् ) सुदर्शनं, कुमारं ( सुदर्शनांश पुत्रास ) शेषांशं ( लक्ष्मणास ) समजनयत् ( प्रसवली ) तदा ( त्या काळीं ) शंखांशं ( शंखांशरूप शत्रुघ्नास ) यमलतया ( जुळे-पणानें ) तौ ( लक्ष्मण व शत्रुघ्न ) अभूतां ( झाले ). श्लोक ११५.—उपसंहार ( आच्छा-दित कर ) विश्वात्मन् ( हे जगदात्म्या ) एतद्रूपं ( हें रूप ) अलौकिकं ( लोकविलक्षण ) दर्शयस्व ( दाखीव ) महानंदं ( महाआनंदयुक्त ) बालभावं ( बाल्यावस्था ) आर्या १२३ यस्य ( ज्याच्या ) जगद्दृग्भीत्या ( लोकदृष्टिभयामुळें ) जननी ( माता कौसल्या ) तस्य ( त्या रामाच्या ) कपोले ( गालावर ) अदात् ( लाविलें ) मषीतिलकं ( काजळाचें गालबोट. )

घवघवती ॥ सुमनें वर्षति सुरनर विबुधांचे वदनचंद्र टवटवती ॥१२२॥ यस्य तु नमोच्या-रात्कालोपि हि बांधते न भक्तजनान् ॥ जननंद्दग्भीत्या जननी तस्य कपोले ह्यदान्मषीतिलकं ॥१२३॥ निवसंति यस्य रोम्णि ब्रह्मकटाहा यथावकाशेन ॥ चित्रं स हरिः शेते पंचवितस्तिप्रमाणकांदोले ॥१२४॥ पाळणा ॥ जोजोजोजोरे कुळभूषणा ॥ दशरथ-नंदना ॥ निद्रा करिं बाळा मनमोहना ॥ रामालक्षुमणा ॥ ध्रु० ॥ पाळणा लांबविला अयोध्येसी ॥ दशरथाचे वंशीं ॥ पुत्र जन्मला हृषीकेशी ॥ कौसल्येचे कुशीं ॥ बाळा जोजोरे० ॥१॥ रत्न-जडित पालख ॥ झळके अमोलिक ॥ वरतीं पहुडले कुळदीपक ॥ त्रिभुवननायक ॥ बाळा जो० ॥२॥ हालवी कौसल्या सुंदरी ॥ धरून ज्ञानदोरी ॥ पुष्पें वर्षती सुरवरीं गर्जति जयजयकारीं ॥बाळा जो० ॥३॥ विश्वव्यापका रघुराया ॥ निद्रा करीं बा सखया ॥ तुजवर कुरवंडी करूनियां ॥ सांडिन आपुली काया ॥ बाळा० ॥४॥ येउनि वसिष्ठ सत्वर ॥ सांगे जन्मांतर ॥ राम परब्रह्म साचार ॥ सातवा अवतार ॥ बाळा० ॥५॥ याग रक्षुनियां अवधारा ॥ मारुनि निशाचरां ॥ जासी सीतेच्या स्वयंवरा ॥ उद्धरिं गौतमदारा ॥ बाळा जो०॥ ॥६॥ पर्णिल जानकी-स्वरूपा ॥ भंगुनियां शिवचापा ॥ रावण लज्जित महाकोपा ॥ नव्हे पण हा सोपा ॥ बाळा० ॥७॥ सिंधुजलडोहीं अवलीळा ॥ नामें तरती शिळा ॥ त्यावर उतरोनी दयाळा ॥ नेसी वानरमेळा ॥ बाळा० ॥८॥ समूळ मर्दुनी रावण ॥ स्थापिल बिभीषण ॥ देव हे सोडवील संपूर्ण ॥ आनंदेल त्रिभुवन ॥ बाळा० ॥९॥ ऐशीं चरित्रें अपार ॥ करील मनोहर ॥ इतुकें ऐकुनी उत्तर ॥ हांसले रघुवीर ॥ बाळा जो० ॥१०॥ राम भावाचा भुकेला ॥ भक्ताधीन जाहला ॥ दास विठ्ठलें ऐकिला ॥ पाळणा गाइला ॥ बाळा जोजोरे० ॥११॥१२५॥ पाळणा ॥२॥ अयोध्येचा रामराजा अवतरलासे सुरकाजा ॥ अशा योगें विजयदुंदुभी वाजो ॥१॥ निज बाळा जोजोजोजोरे ॥ ध्रु० ॥ हेमकार्मुकें लावूनि बाण ॥ ओढी तोडी मोडुनि ठाण ॥ ऐसा देव रणांगणीं साजो ॥ निज० ॥२॥ जय-रामाख्य सुताचा स्वामी ॥ अवतरलासे मंगळधामीं ॥ प्रेमा त्याचा अद्भुत हृदयीं माजो ॥३॥ निज बाळा जोजोजोजोरे० ॥ १२६ ॥

सारांश, भगवद्भजनानें सहस्त्रावधि जनांचा उद्धार झाला. याचा अंत लागणें परम दुर्घट;आहे. पहा, वाल्हा हा जातीचा कोळी असून भजनानें ऋषि झाला. आणि त्यानें शतकोटी रामायण लिहून जनाचाही उद्धार केला. याप्रकारें भगवद्भजनाचा महिमा किती वर्णावा ! पृथ्वीवर दुष्ट राक्षस मदोन्मत्त होऊन सद्भक्तांस उपद्रव देऊं लागले, हें जाणून दुष्टांचा नाश करण्याकरितां प्रभूंनीं अवतार घेतला, असा प्रभु दयाळू आहे. यासाठीं आपण इतर व्यवसायांचा त्याग करून नारायण आपल्यावर कृपा करतील एतद्विषयीं नवविध भक्तिद्वारां नारायणास भजन पूजन इत्यादिकांनीं वश करून जन्ममरणरूप दुःखाचा नाश करावा. याविषयीं अमृतराय जनांस विनयपूर्वक प्रार्थना करितात. ॥ कांहिं तरी सोय धरीरे० हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥ गुण गाईन आवडीं । हेंचि

---

आर्या १२४.–निवसंति ( राहतात ) यस्य ( ज्याच्या ) रोम्णि ( एका रोमरं-ध्रांत ) ब्रह्मकटाहाः ( ब्रह्मांडें ) यथावकाशेन ( विस्तीर्णत्वेंकरून ) चित्रं ( आश्चर्य ) स हरिः ( तो राम ) शेते ( निद्रा करितो ) पंचवितस्तिप्रमाणकांदोले ( पांच वितींच्या पाळण्यांत ).

माझीं सर्व जोडी ॥ २ ॥ नलगे मुक्ति धनसंपदा ॥ संतसंग देई सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे गर्भवासीं ॥ सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥ आरती रामाची ॥ उत्कट साधुनि शिळा सेतू बांधूनी ॥ लिंगदेह लंकापुरि विध्वंसूनि ॥ कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी ॥ देहीं अहंभाव रावण निवटोनी ॥१॥ जयदेव जयदेव जय निजबोधा रामा ॥ परमार्थीं आरती परिपूर्ण कामा॥ जय० ॥ध्रु०॥ प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला ॥ लंका दहन करुनी अखया मारीला ॥ मारिला जंबुमाळी भुवनीं त्राहाटीला ॥ आनंदाची गुढी घेउनियां आला ॥ जयदेव जयदेव०॥२॥ निजबळें निजशक्ति सोडविली सीता ॥ म्हणुनी येणें झालें अयोध्ये रघुनाथा ॥ आनंदें ओसंडे वैराग्य भरता ॥ आरति घेउनि आली कौसल्या माता ॥ जयदेव जयदेव० ॥३॥ अनुहत ध्वनि गर्जति अपार ॥ अठरा पद्में वानर करिती भुभुःकार ॥ अयोध्येसी आले दशरथ—कुमर ॥ नगरीं होत आहे आनंद थोर ॥ जयदेव जयदेव० ॥ ४ ॥ सहज सिंहासनीं राजा रघुवीर ॥ सोहंभावें तया पूजा उपचार ॥ सहजाची आरती वाद्यांचा गजर ॥ माधवदासा स्वामी आठव ना विसर ॥ जयदेव जयदेव० ॥५॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ १ ॥ पावना रामा पतीतपावना रामा ॥ पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हर हर महादेव ॥ सीताकांत स्मरण जयजयराम ॥ इति रामजन्माख्यानं समाप्तम् ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

# कथा २ री.

## कृष्णजन्माख्यान पूर्वरंग निरूपण.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीमन्महागणाधिपतयेनमः ॥ श्रीहरिहरगुरुचरणारविंदेभ्या नमः ॥ इत्यादिनमन ॥ पद ॥ नारायण भजरे; मानस नारायण भजरे मा० ॥ध्रु०॥ त्रिभुवनपतिपद चिंतिसि जरि तूं ॥ काय उणें तुजरे ॥ मान० ॥ १ ॥ विषय उपेक्षुनि अनुभव लक्षुनि, आत्मपदीं वसर ॥ मानस० ॥ २ ॥ कृष्णदयार्णव कर्णपुटीं तुज ॥ हेंचि कथी बीजरे ॥३॥ मानस नारायण भजरे ॥ ४ ॥

**अर्थ**—आदौ प्रथमारंभीं भगवद्भक्त मनास उपदेश करितात कीं, हे मना षड्गुणैश्वर्यसंपन्न असा जो नारायण त्याचे ठायीं जर आसक्तता धारण करशील तर या देहाची सफलता होईल. तसें न करितां जर विषयासक्त होशील तर देहाचें साफल्य होणार नाहीं. म्हणून मनाची प्रार्थना करून म्हणतात. नारायण भजरे० ॥ कदाचित् तुम्ही म्हणाल कीं, मनाचीच प्रार्थना करण्याचें कारण काय ? तर पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें हीं सर्व मनाच्या स्वाधीन असल्यामुळें मन जसजसें इंद्रियांची योजना करितें तसतशीं तीं इंद्रियें व्यापार करितात. हें मन मनुष्यास बंधास व मोक्षास कारण आहे. कसें म्हणाल तर, अमृतबिंदु उपनिषदांत श्रुति सांगतात. ॥ श्लोक ॥ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतं ॥ १ ॥ हें मन जर पहावें तर एक आहे आणि याचे गुण दोन आहेत. ते कसे म्हणाल तर हें मन ज्या काळीं विषयासक्त असतें त्याकाळीं बंधाला

कारण होतें, तेंच मन ज्या कालीं निर्विषय होतें त्या कालीं मुक्तीस कारण होतें. यासाठीं विषयासक्त न होतां भगवद्भजनीं लीन झाल्यानें नरतनूचें साफल्य होईल, म्हणून म्हणतात, ॥ नारायण भजरे० ॥ एके समयीं एका ग्रहस्थानें मनाला विचारिलें कीं,—॥ श्लोक ॥ मनः कुत्रोद्योगः सपदि वद ते गम्यपदवीं । नरं वा नारीं वा गमनमुभयत्राप्यनुचितं ॥ यतस्ते क्लीबत्वं प्रतिपदमहो हास्यजनकं । जनस्तोमे मागात्स्वमनुसर हि ब्रह्म परमं ॥२॥ कोणी एक मनुष्य मनास प्रार्थना करतो कीं, हे मना कोणच्या उद्योगांत आहेस ? त्या काळीं मनानें सांगितलें कीं, कां बाबा विचारतोस ? तेव्हां तो ग्रहस्थ म्हणतो, विचारण्याचें कारण इतकेंच कीं, तुझें गमन जें आहे तें पुरुष व स्त्रिया यांमध्यें योग्य नाहीं. तेव्हां मन म्हणतें असें कां ? पुरुष म्हणतो तुझ्या ठिकाणीं क्लीबत्व आहे म्हणून प्रतिपदाचे ठायीं तुझें हास्य होईल. यासाठीं जनसमुदायापासून परावृत्त हो. त्या कालीं मनानें विचारिलें कीं, तर मीं कोठें जावें ? तेव्हां पुरुषानें सांगितलें कीं, तूं आपल्या जातींत जा, म्हणजे तेथें तुझा आदरसत्कार होईल. तेव्हां मनानें विचारिलें कीं, माझी जात तरी कोणची ? त्या कालीं पुरुषानें सांगितलें कीं, तूं नपुंसकी आहेस, तर तूं नपुंसक जातींत जा. नपुंसक जात म्हणशील तर हें ब्रह्म जें आहे तें नपुंसकी आहे. यासाठीं हे मना, तूं ब्रह्म जें या ब्रह्माप्रत अनुसरलेंस म्हणजे कार्याची सफलता होईल. म्हणून म्हणतात ॥ नारायण भज० ॥ हें मन नपुंसकी आहे असें पाणिनीय सूत्रकार म्हणतात,म्हणून एका ग्रहस्थानें मनाला स्त्रियेचे ठिकाणीं योजित केलें. याविषयीं ॥श्लोक॥ नपुंसकामिति ज्ञात्वा प्रियायै प्रेषितं मनः ॥ तत्तु तत्रैव रमते हताः पाणिनीना वयम् ॥३॥ हें मन नपुंसकी म्हणून स्त्रियेचे ठिकाणीं प्रेषित केलें तें मन त्या स्त्रियेचे ठिकाणीं रममाण झालें असें मानून विचार केला कीं, पाणिनीय सूत्रकार मन नपुंसकी म्हणतात, तें मन त्या ठिकाणीं लंपट झालें, त्यापेक्षां, सूत्रकारांनीं आम्हांस मिथ्या सांगितलें. यास्तव पुल्लिंग, स्त्रिलिंग आणि नपुंसकल्लिंग हें समजण्यासाठीं कांहीं तरी व्याकरणज्ञान पाहिजे. त्यावांचून यथार्थ शब्दज्ञान होणार नाहीं. म्हणून कोणी एका पुरुषानें आपल्या पुत्रास सांगितलें कीं, नानाप्रकाचीं अध्ययनें केलींस तरी तीं व्याकरणाध्ययनाखेरीज व्यर्थ होत. कारण व्याकरणाशिवाय शब्दज्ञान चांगलें होत नाहीं. ॥ आर्या ॥ यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणं ॥ स्वजनः श्वजनो माभूत् सकलं शकलं सकृत् शकृत् ॥४॥ अर्थ—हे पुत्रा, जरी बहुत अध्ययनें केलीं नाहींस तरी व्याकरणशास्त्राचें अध्ययन कर; कारण " स्वजनः श्वजनो माभूत् " स्वजन म्हणजे आपले जन, श्वजन म्हणजे कुत्र्यांचा समुदाय, " सकलं " म्हणजे सर्व " शकलं " म्हणजे तुकडा, " सकृत् " म्हणजे एकवार " शकृत् " म्हणजे विष्ठा. यासाठीं हे पुत्रा, स आणि श यांचा अर्थभेद कसा झाला तो पहा. तात्पर्य, हें मन नपुंसकी असून बहुत चंचल आहे. याविषयीं एक कवि म्हणतो ॥ श्लोक ॥ मनो मधुकरो मेघो मानिनी मदनो मरुत् ॥ मा मदो मर्कटो मत्स्यो मकारा दश चंचला ॥ ५ ॥ अर्थ—हे दहा मकार चंचल आहेत. त्यांत मन हें अति चंचल होय, म्हणून प्रथमतः मन, भ्रमर, मेघ, स्त्री, मदन, वायु, लक्ष्मी, गर्व, माकड मत्स्य, या सर्वांत मन हें अति चंचल होय. यासाठीं याची प्रार्थना करितात कीं, ज्या प्रभूंनीं पंचभूतात्मक देह दिला त्या प्रभूला विसरून स्त्री धनादिकांवर प्रीतीनें आसक्त होशील तर अंतीं यमयातना भयंकर होतील. त्या कालीं स्त्रीपुत्रादिक कांहीं उपयोगी पडणार नाहींत; यास्तव परमात्म्याचे ठिकाणीं प्रीति जर धरलीस

तर भवसागर–दुःखापासून मुक्त होशील. यासाठीं सुलभ उपायांनीं मनास बोध करितात ॥ नारायण भजरे, मानस नारायण भजरे ॥ आतां नारायणाचेंच भजन करण्याचें कारण काय म्हणालं, तर नारायणाचें भजन सर्व पातकांचें नाशक असून मुक्तीस कारण आहे. याविषयीं श्रीमद्भागवतांत शुकाचार्य परिक्षितीस सांगतात ॥ श्लोक ॥ भागवत ॥ एतावतालमघनिर्हरणाय पुंसां संकीर्तनं भगवतो गुणकर्मनाम्नां ॥ विक्रुश्य पुत्रमघवान् यदजामिलोऽपि नारायणेति म्रियमाण इयाय मुक्तिम् ॥ ६ ॥ अर्थ—भगवंताचे गुण, कर्में व नामें यांचें कीर्तनरूप भजन हें पुरुषांच्या सर्व पातकांच्या नाशास पुरे आहे; कारण महापातकी अजामिल ( दासीपति ) हा मरणोन्मुख होऊन पुत्राच्या उद्देशानें 'नारायण' म्हणून ओरडला; तितक्यानेंच तो सर्व पातकनिर्मुक्त होत्साता मुक्तीप्रत गेला. म्हणून नारायणाचेंच भजन करावें. असा अभिप्राय मनांत आणून प्रथम पदांत कवि म्हणतात ॥ नारायण भजरे० ॥ पुंडलीकवरदे हरि०॥ पार्वतीपते०॥ सीताकांत स्मरण ॥ अशा प्रकारें मन ज्यांनीं भगवच्चरणीं लीन केलें त्यांना मोठमोठ्या संकटांपासून प्रभूंनीं रक्षिलें आणि त्यांचें दुःख दूर व्हावें म्हणून नारायणांनीं त्यांचे उदरीं जन्म घेऊन अवतारनाट्य दाखविलें. याविषयीं गीतेंत भगवद्वाक्यः—

श्लोक ॥ यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ॥
॥ अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽत्मानं सृजाम्यहम् ॥ १ ॥

अर्थः-श्रीभगवान् म्हणतात, हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, ज्या काळीं धर्माची क्षीणता होते व अधर्माचें प्राबल्य होतें त्या काळीं अवतार धारण करून पुनः धर्माचें स्थापन व साधूंचें संरक्षण करण्याकरितां व अधर्म करणारे जे दुष्ट दैत्य त्यांच्या नाशाविषयीं व अधर्म नाहींसा व्हावा यासाठीं मी वारंवार प्रतियुगाचे ठायीं अनेक प्रकारचे अवतार घेतों. एतद्विषयीं कवि कृष्णजन्मचरित्रनिरूपण करितात.

---

# अथ कृष्णजन्मचरित्र.

---

दोहोरा—किसनजीको अवतार ॥ हुवा कैसा बिस्तार ॥ सुनो भाई दिलदार ॥ उतर पार परोगे ॥१॥ अभंग ॥ पापी जे अभक्त दैत्य ते मातले ॥ धरणीसी झालें ओझें त्यांचें ॥२॥ भागवत श्लोक ॥ भूमिर्दृप्तनृपव्याजदैत्यानीकशतायुतैः ॥ आक्रांता भूमिभारेण ब्रह्माणं शरणं ययौ ॥३॥ अभंग ॥ गोरूपानें भूमी ब्रह्मयापाशीं जाय ॥ नेत्रीं वाहे तोय सांगतसे ॥१ दिधलासे त्रास मुनींलागीं सर्वां ॥ न पूजिती देवा तेव्हां कोणी ॥ २ ॥ राहीयले यज्ञ मोडिलें कीर्तन ॥ पळाले ब्राह्मण दैत्यांभेणें ॥ ३ ॥ ४ ॥ आर्या ॥ मलिनो-

---

दृप्त ( गर्विष्ठ ) नृप ( राजे ) व्याज ( वेषधारी ) अनीक ( सेना ) शत ( शतावधि ) अयुत (दहा हजार ) भूरि (बहुत ) आक्रांता (पीडित ) ब्रह्माणं ( ब्रह्मदेवाला ) ययौ ( गेली )

द्भव शरणागत दितितनुजमरार्त भूमिच्या अवना ॥ प्रार्थी जाऊनि देवांसह दुग्धोदधितटीं रमाभवना ॥५॥ श्लोक ॥ क्षीरांबुधींत उरगेंद्र करूनि माचा ॥ राहे निजूनि विभु सिंधु पराक्रमाचा ॥ कंसादिकीं बहुत भूमिस ताप केला ॥ ब्रह्मा स्तवी पयनिधीतटिं: त्या अजाला ॥ ६ ॥ पद ॥ धांव रमापते ज्ञानविलासा ॥ पूर्ण परात्परशांतिनिवासा ॥ ध्रु० ॥ कंसादिक खल दुर्मद भारी ॥ गोद्विज पाहुनि येउनि मारी ॥ धर्म न ठेविति हे अविचारी ॥तोड विभो भयदायक फांसा ॥ धांव रमापते० ॥ १ ॥ राक्षस गांजिति काय करावें ॥ दुःखनिधीप्रति केविं तरावें ॥ चित्त किती कवळोनि धरावें ॥ जाणुनि पाहसि काय रमाशा ॥ धांव रमापते० ॥ २ ॥ पालय पालय सत्सुखसारा ॥ तुझिया चरणी दृढ थारा ॥ रामकृष्ण गुरुराज उदारा । पांडुरंगा निजसुख दे दासा ॥ धांव रमापते० ॥ ३ ॥ ७ ॥ अभंग ॥ नामा म्हणे ऐसें करितां स्तवन ॥ तोषे भगवान क्षीराब्धींत ॥ ८ ॥ भागवत श्लोक ॥ गिरंसमाधौगगनेसमीरितांनिशम्यवेधास्त्रिदशानुवाचह ॥ गांपौरुषीं मे शृणुतामराः पुनर्विधीयतामाशु तथैव माचिरं ॥ ९ ॥ आर्या ॥ भवशक्राद्यमरांतें मग परमेष्ठी म्हणे अहो हरिला॥ विदित असे अभय दिलें जाणा भूभार निश्चयें हरिला ॥ १० ॥ श्लोक ॥ वामनी ॥ मी उद्भवेन यदुच्याच कुळीं जसारे ॥ सारे तुम्ही सुरहि यादव व्हा पसारे ॥ मारून दुष्ट करुं पालन सज्जनांचें ॥हें एकतां सुर–समुच्चय सज्ज नाचे ॥११॥ आर्या ॥ गरुडासन अवतार क्षितिवरि धरणार साधु ताराया ॥ माराया दुष्टांतें पृथ्वीचा भार सर्व हाराया ॥ १२ ॥ अभंग ॥ देवकीं-उदरीं येईल भगवान ॥ रक्षील ब्राह्मण गाई भक्त ॥ १ ॥ उतरील भार मारील दैत्यांसी ॥ आनंद सर्वांसी करील तो ॥ २ ॥ १३ ॥ आर्या ॥ वपु धरूनि मनुप्याचें सुर हो यदुच्या कुळीं भजा देवा ॥ देवस्त्रियाहि भूवरि उपजोत करोत विष्णुची सेवा ॥ १४ ॥ वाहिलि आहे जेणें स्वफणाग्रीं हे वसुंधरा सकळा ॥ अवतार धरिल आधीं तो शेष प्रभु जगन्निवासकळा ॥ १५ ॥ पद ॥ पुरविल काम तुझा यदुराज गे ॥ ध्रु० ॥ असदनुशासनीं साधुजनावनीं ॥ अवतरेल श्रीललामगे ॥ १ ॥ सज्जनरंजन मति स्मरणीं असो॥ नयनिं दिसो गुणविश्राम गे ॥ २ ॥ १६ ॥ आर्या ॥ देउनि धीर धरेला तीच्या चिंताज्वरासि पळवूनी ॥ स्वस्थाना विधि गेला प्रभुची आज्ञा सुरांसि कळवूनी ॥१७॥ भागवत श्लोक ॥ शूरसेनो यदुपतिर्मथुरामावसन्पुरीं ॥ माथुराञ्छूरसेनांश्च विषयान्बुभुजे पुरा ॥१८॥ घनाक्षरी ॥ उरगसेनोकी नार ॥ बडी सौंदर सुकुमार ॥ हुयी पेटो गुलजार ॥ मिरुननैन देवकी ॥१९ ॥ श्लोक वामनी ॥ उग्रसेनतनया अजि देवकी ॥ नेमिला वर तिनें वसुदेव कीं ॥ वोहरे मिरवितां रथयानीं ॥ कंस सारथि वरातप्रयाणीं ॥ २० ॥ घनाक्षरी ॥ परनलीया वसुदेव ॥ तुटा मनका संदेह ॥ मौज देखत सब देव ॥ मिरवणूक जात है॥२१॥

---

श्लोक ९.—गिरं ( वाणी ) समाधौ ( समाधींत ) समीरितां ( उत्पन्न झालेली ) निशम्य ( ऐकून ) वेधाः ( ब्रह्मदेव ) त्रिदशान् ( देवांस ) उवाच ( बोलिला ) गां (वाणी) पौरुषीं ( पुरुषाची ) मे ( मजपासून ) शृणुत ( श्रवण करा ) अमराः ( देवहो ( विधीयता ( करावें ) आसु ( शीघ्र ) तथैव तसेंच ) मा चिरं ( विलंब करूं नका. ) श्लोक १८–आवसन् ( राहत होत्साता ) माथुरान् ( मथुरासंबंधीं ) शूरसेनांश्च ( शूरसेन नामक ) विषयान् ( देशांस ) बुभुजे ( उपभोगीत होता ) पुरा ( पूर्वी )

अब धुरो चढा जात ॥ कंस मौजा देखात ॥ निकल जावे दिनरात ॥ गैबबात हो गयी ॥ २२ ॥ **दिंडी** ॥महोत्साहें मिरवितां बंधुराया ॥ थोर वाटे स्वानंद कंसराया ॥ रथीं सारथि आपण जाहलासे ॥ करी कौतुकालागिं महोल्हासें ॥२३॥ **आर्या** ॥ भगिनीप्रियकर कंसाप्रति त्या परमोत्सवीं नभोवाणी ॥ ऐसें सहसा सांगुनि चित्तांत विरोध तत्क्षणीं आणी ॥ २४ ॥ गर्भ इचा जो अष्टम तो काळ तुझा विनिश्चयें जाण ॥ मूर्खा सावध हो रे कंसा हरणार कीं तुझे प्राण ॥ २५ ॥ **दिंडी** ॥ अशी गर्जे अंबरीं नभोवाणी ॥ ऐकतांची दचकला कंस कानीं ॥ म्हणे कैंची हे भगिनी मृत्युखाणी ॥ रथाखालीं पाडिली धरुनि वेणी ॥ २६ ॥ **साकी** ॥ कंस सुने असमान बान जद हतमो लेकर तेगा ॥ अपना मरण चुकाने खातर मानकू मारन लागा ॥२७॥ **आर्या** ॥ वत्सल होता परि तो भोजपति क्रूर होय वाणीनें ॥ भगिनी-वधार्थ कवळी कालव्यालाभ खड्ग पाणीनें ॥ २८ ॥ **श्लोक भागवत** ॥ तं जुगुप्सितकर्माणं नृशंसं निरपत्रपं ॥ वसुदेवो महाभाग उवाच परिसांत्वयन् ॥ २९ ॥ **दिंडी** ॥ उने झटपट जब खरग हात लिय्या ॥ बाल पकरे बे न्याय बडा किय्या ॥ वैसी दुर्जनकी रीत जब पछानी ॥ दीन मुखसे वसुदेव बदत बानी ॥ ३० ॥ **भागवत श्लोक** ॥ मृत्युर्जन्मवतां वीर देहेन सह जायते ॥ अद्य वाऽब्दशतांते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः ॥३१॥ न ह्यस्यास्ते भयं सौम्य यद्वै साऽहाशरीरवाक् ॥ पुत्रान् समर्पयिष्येऽस्या यतस्ते भयमुत्थितं ॥ ३२ ॥ **आर्या** ॥ सुतदान मान्य करितां जाय गृहा कंस शौरिही सुकवी ॥ झालें होतें प्राप्त स्त्रीप्राण-व्यसन परि सुखें चुकवी ॥ ३३ ॥ **दिंडी** ॥ उभयतांतें मग ठेवि बंदिशाळे ॥ रक्षणातें बैसवी दैत्यपाळे ॥ प्रथम झाला तिस पुत्र तये वेळे ॥ दिला कंसा नेऊनि शीघ्र काळें ॥३४॥ **ओंवी** ॥ रायें बाळ पाहोनि नयनीं ॥ दया उपजली अंतःकरणीं ॥ म्हणे मृत्यु यापासूनी ॥ आम्हांलागीं नव्हेची ॥ ३५ ॥ **आर्या** ॥वाणी मृषा न केली वसुदेवें कंस यास्तव द्रवला ॥ द्या आठवाचि हा न्या ऐसें बोलून तत्पदीं लवला ॥३६॥ नवल करीत गृहा जों शौरि अपत्यासी ने अशांत मुनी ॥ नारद सुरगुह्य कथी कंसासि विचारतां पदीं नमुनी ॥ ३७ ॥ **घनाक्षरी** ॥ नारद सुनजावे बात ॥ आया बीना ले हात ॥ नही कर्मोकी बात ॥ टारीटरी जात है ॥ ३८ ॥ **आर्या** ॥ मोहुनि आप्तपणें तुज वेढुनि दिति तनुज शत्रु आहेत ॥ त्वद्वध शीघ्र करो नरतनु हरि यांच्या मनांत हा हेत ॥ ३९ ॥ भरले व्रजांत निर्जर मथुरेंतहि वृष्णि गोप हे सारे ॥ देवचि यांच्या भार्या देवी हो सावधान कंसा रे ॥ ४० ॥ **घनाक्षरी** ॥ गर्भ डारो सब काट ॥ नही करना बोभाट ॥ चला नारद कर थाट ॥ मरन नही चुकता ॥ ४१ ॥ **श्लोक** ॥ ऋषिवर मग बोले सत्य हे चूक राया ॥

---

**श्लोक २९**—तं ( कंसास ) जुगुप्सितकर्माणं ( निंद्य कर्म करणारा ) नृशंस ( क्रूर ) निरपत्रपं ( निर्लज्ज , उवाच ( बोलला ) परिसांत्वयन् ( समाधान करीत ) **श्लोक ३१**—जन्मवतां ( जन्मास आलेल्या मनुष्यास ) जायते ( उत्पन्न होतो ) अद्य ( आज ) वा ( अथवा ) अब्दशतांते ( शंभर वर्षांनीं ) वै ( निश्चित ) प्राणिनां ( प्राणिमात्रांस ) ध्रुवः ( निश्चयेंकरून होणारा ) **श्लोक ३२**— अस्याः ( देवकीपासून ) ते ( तुला ) सौम्य ( हे कंसा ) यत् ( जें ) सा ( ती ) आह ( बोलली ) अशरीरवाक् ( आकाशवाणी ) अस्याः ( इचे ) यतः ( ज्यापासून ) ते ( तुला ) उत्थितं ( उत्पन्न झालें आहे. )

वसुंतिल अरि वर्ते कोण घाता कराया ॥ न कळुनि सुत त्याचा त्वां दिला तो कसारे ॥ विधि-सुत वदताहे मारिं हे तोक सारे ॥ ४२ ॥ आर्या ॥ वदला असें यथार्थ त्रिदशांचा कार्य-भाग साधाया ॥ गेला मुनि मग लागे तो कंसहि यादवांसि बाधाया ॥ ४३ ॥ ओंवी ॥ कंस क्रोधें धाविन्नला ॥ बंदिशाळेमाजीं आला ॥ जैसा तस्कर संचरला ॥ घनाढ्याचे निजगृहीं ॥ ४४ ॥ आर्या ॥ तेणें कंसें वधिला प्रथम सुत तसेच आणखी पांच ॥ भगिनीपति वांच-विला जाणों घेऊनि पुत्र धन लांच ॥ ४५ ॥ ओंवी ॥ आतां क्षीरसागरीं श्रीहरी ॥ कैसा यावरी विचार करी ॥ ते कथा कौतुक चतुरीं ॥ सेविजे सादर होऊनियां ॥ ४६ ॥ पाप बहुत जाहलें जाण ॥ गांजिले गाई ब्राह्मण ॥ यावरी क्षीरसागरीं जगज्जीवन ॥ काय करितां जाहला ॥ ४७ ॥ अनंतासी म्हणे अनंत ॥ चला अवतार घेऊं त्वरित ॥ करूं दुष्टांचा निःपात ॥ संत भक्त रक्षूं पैं ॥ ४८ ॥ तंव बोले धरणीधर ॥ मी न घे आतां अवतार ॥ पूर्वीं मी झालों सौमित्र ॥ कष्ट फार भोगिले ॥४९॥ हांसोनि बोले द्विसहस्रनयन ॥ अष्टाविं-शति अयनें उपोषण ॥ निरहार अरण्य ॥ तुम्हांसवें सेविलें जी ॥ ५० ॥ आतां तूं पुढें जाय सत्वर ॥ होई माझा ज्येष्ठ सहोदर ॥ मी तुझी आज्ञा पाळीन साचार ॥ बलभद्र होई तूं ॥ ५१ ॥ श्लोक भागवत ॥ सैसमो वैष्णवं धामं यमनंतं प्रचक्षते ॥ गर्भो बभूव देवक्या हर्षशोकविवर्धनः ॥ ५२ ॥ घनाक्षरी ॥ गर्भ आये फनीपाल ॥ भयी देवकी खुशीयाल ॥ बडी अखियां भई लाल ॥ मगनमस्त मेहलमो ॥ ५३ ॥ बडी सासकी ललकार मुसल नांगर दे हत्यार ॥ लावो दैतनको बिमार ॥ करूं ठार पलखमो ॥ ५४ ॥ बीरबानी बाजे चंग ॥ बसुदेव भया दंग ॥ कहे कौन कया रंग ॥ थरक अंग कांपता ॥ ५५ ॥कबु जानें रछपाल ॥ अबी होगा जंजाल ॥ लाज राखो भूपाल ॥ भुवनपालनाथजी ॥ ५६ ॥ आर्या ॥ भद्रे संप्रति आहे शोरिस्त्री देवकी सुगर्भवती ॥ तीच्या उदरीं साक्षात् मद्धाम अनंत जाणते भवती ॥५७॥ गर्भासि तिच्या नंद व्रज विवरीं शौरिच्या स्त्रिया वसती ॥ त्यांमाजीं रोहिणीच्या उदरीं घालीं दुजी न सती ॥ ५८ ॥ वरदषभे मग मी त्या देवक्युदरीं शिरेन जन्माया ॥ जन्म यशोदाजठरापासूनी धरिशील तूंहि मन्माया ॥ ५९ ॥ ओंवी ॥ तों लागला सातवा मास ॥ निद्रा आली देवकीस ॥ वसुदेवही सावकाश ॥ निद्रार्णवीं निमग्न ॥ ६० ॥ गर्भ नेउनी ते अवसरीं ॥ घातला रोहिणीचे उदरीं ॥ सप्तमासीक गर्भ अंतरीं ॥ देखून घाबरी झाली ते ॥ ६१ ॥ भ्रतार नसतां सन्निधानीं ॥ नवल परी गर्भाधानीं ॥ तों वदली आकाशवाणी ॥ चिंता रोहिणी न करावी ॥ ६२ ॥ हा वसुदेवाचा गर्भ देख ॥ पुत्र होईल दैत्यांतक ॥ ऐसें ऐकतां सम्यक ॥ झाला हर्ष रोहिणीतें ॥ ६३ ॥ आर्या ॥ देवक्युदर रिकामें होतां पौरांत जाय ती वार्ता ॥ म्हणती गर्भ गळाला हा किती सोशील ताप शोकार्ता ॥ ६४ ॥ ओंवी ॥ गर्भ गळतांचि वार्ता ॥ दूतीं निवेदिली मथुरानाथा ॥ कंस म्हणे सर्वार्थता ॥ जपा आतां आठव्यातें ॥ ६५ ॥ दिंडी ॥ आठव्यानें व्यापिल्या दिशा दाही ॥ दिसे त्यातें तो बाह्य अंतरींही ॥ कोण त्याचा योग तो असा पाहीं ॥ वर्णितां त्या भाग्यासि पार नाहीं ॥ ६६ ॥ आर्या ॥ यज्ञपति प्रभु पोटा

---

श्लोक ५२—वैष्णवं ( विष्णूचें ) धाम ( तेज ) यं ( ज्यास ) अनंतं ( शेष ) प्रच-क्षते ( बोलतात ) बभूव ( झाला ) हर्षशोकविवर्धनः ( हर्ष व शोक यांची वृद्धि करणारा. )

येतां बहु तेज देवकीस चढे ॥ आला विष्णु असा तो कंस मनीं तर्क करुनि फार कढे ॥६७॥ नव्हतें तेज असें या मागें मारीन तरि महा पाप ॥ काय करूं कंस म्हणे शिरला सदनांत दुखविला साप ॥६८॥ **दिंडी** ॥ असो ऐसा लागला छंद कंसा ॥ पुढें झाला वृत्तांत अहो कैसा ॥ दीनबंधु त्या पयोनिधीवासा ॥ दया आली योजिला योग ऐसा ॥६९॥ **ओंवी** ॥ वसुदेव म्हणे देवकीप्रती ॥ तुज चिंता न वाटे चित्तीं ॥ आठव्याची कैशी गती ॥ होईल ती न कळे पां ॥७०॥ भुजा पिटोनी बोले वचन ॥ कंसास मारीन आपटून ॥ मुष्टीक चाणुरांचा प्राण ॥ क्षणमात्रें घेईन मी ॥७१॥ वसुदेव बोले वचन ॥ देवकी आतां धरीं मौन ॥ येरी म्हणे कैंची देवकी पूर्ण ॥ ब्रह्मसनातन मी असे ॥७२॥ **दिंडी** ॥ विमानांची जाहली नभीं दाटी ॥ अमर हर्षें वर्षती सुमनवृष्टी ॥ विधिप्रमुखहि होउनी हृष्ट पोटीं ॥ बंदीशाळे पातले देव कोटी ॥ ७३ ॥ **भाग० श्लोक** ॥ त्वमेक एवास्य सतः प्रसूतिस्त्वं संनिधानं त्वमनुग्रहश्च ॥ त्वन्मायया संवृतचेतसस्त्वां पश्यंति नाना न विपश्चितो ये ॥ ७४ ॥ **आर्या** ॥ ते देवकी कुलभूषा मूर्त ब्रह्मामि सुसमयीं प्रसवे ॥ रोहिण्यक्षीं भाद्रीं रात्र्यर्धीं जेथ दुर्गुणा न सवे ॥ ७२ ॥ **वामनी श्लोक** ॥ द्रुतवि० ॥ प्रहर दोन निशा विमलक्षणीं प्रगटला निज उत्तम लक्षणीं ॥ दिसतसे भुवनत्रयपालक ॥ त्रिदशनायक अद्भुत बालक ॥ ॥७१॥ **भागवत श्लोक** ॥ तमद्भुतं बालकमंबुजेक्षणं चतुर्भुजं शंखगदार्युदायुधं ॥ श्रीवत्सलक्ष्मं गलशोभिकौस्तुभं पीतांबरं सांद्रपयोदसौभगं ॥ ७७ ॥ **पद** देवकीसी बोलिले भगवंत ॥ तुमच्या पुण्या नाहीं हो कांहीं अंत ॥ ध्रु० ॥ प्रथम जन्मीं पृश्नी हो नाम तुझें ॥ वसुदेवा सुतपा नाम साजे ॥ दिव्य बारा सहस्त्र वर्षें ओजें ॥ ध्यान धरितां प्रगट झालों सहजें ॥ देव० ॥१॥ द्वितिय जन्मीं झालीसे अदिती ॥ वसुदेव कश्यप महामती ॥ मग मी पोटा आलोंसे वामनमूर्ति ॥ लोकत्रयीं विख्यात ज्याची कीर्ति ॥ देव० ॥ २ ॥ हळुहळु देवकी स्तुति करी ॥ काय पुण्य आचरलों जन्मांतरीं ॥ योगी ज्यासी ध्याती या अवसरीं ॥ तो हा नयनीं देखिला श्रीहरी ॥ दव० ॥३॥ ७८ **आर्या** ॥ वळखावें मज आधीं प्राग्जन्मस्मरण मग तुम्हां द्यावें ॥ प्रगट करूनि दाखविलें हें दिव्य स्वात्मरूप या भावें ॥ ७९ ॥ **श्लोक वामनी** ॥ वसंततिलका ॥ ने गोकुळासि मज ये रिति देवदेवें ॥ आज्ञापिला निज पिता वसुदेव देवें ॥ विष्णुत्व दावुन शिशु जलजाक्ष जाला ॥ तो चालिलाचि उचलोनि अधोक्षजाला ॥ ८० ॥ **पद** ॥ कसा तरी उतरूं मी पार, यमुन भरली आहे ॥ ध्रु० ॥ रात्र अंधारी मार्गीं न दिसे ॥ आतां तरि कवण उपाय ॥ कसा० ॥१॥ दिवस

---

**श्लोक ७४.**– त्वं ( तूं ) एकएव ( एकच ) अस्य ( ह्या ) सतः ( जगाची ) प्रसूति ( उत्पत्ति ) सन्निधानं ( लयस्थान ) अनुग्रहः ( पालनकर्ता ) च ( आणि ) त्वन्मायया ( तुमच्या मायेनें ) संवृतचेतस ( मोहित चित्त झालेले ) त्वां ( तुम्हांस ) पश्यंति ( पाहतात ) नाना ( ब्रह्मादि अनेक रूपांनीं ) विपश्चितः ( ज्ञातसंपन्न ) ये ( जे ).

**श्लोक ७७.**–तं ( तो ) अंबुजेक्षणं ( कमलनयन ) अरि ( चक्र ) उदायुधं ( ऊर्ध्व आयुधें धारण करणारा ) श्रीवत्सलक्ष्मं ( श्रीवत्सचिन्हयुक्त ) गलशोभिकौस्तुभं ( कंठांत शोभिवंत आहे कौस्तुभमणी ज्याच्या ) पीतांबरम् ( पीतांबर नेसलेला ) सांद्रपयोदसौभगं ( सजलमेघश्याम सुंदर असा भगवान् ).

उदेल्या विघ्न मोठें ॥ कंस करील अपाय ॥ कसा ० ॥२॥ उद्धवचिद्घन भव तरण्यासी ॥ भगवन्नाम उपाय ॥ कसा० ॥ ३ ॥ ८१ कटाव॥ कोई न पावे जाको पार ॥ सब घट पुरन अपरंपार ॥ निरगुन निजानंद निजसार ॥ इह जगदंबरको करतार ॥ धरिये निजलीला अवतार ॥ तव कंसनके कारागार ॥ त्रिभुवनसुंदर ॥ मोहन माधव जलद-श्याम पीतांबरधरकर शंखचक्र शिरीं ॥ मुगुट खचित श्री ॥ वत्सहृदय ॥ गल वैजयंती कौस्तुभमनिराजित ॥ जलजकंठ भुज भ्रुकुटि घ्राण हनु ॥ भाल बालतनु कानमें कुंडल ॥ मंडितशुभश्री खंडतिलकलघु ॥ अलक कुटिल मृदु ॥ मंद हसित मुख ॥ मधुर बचन नव कमल नयन सुख ॥ सदन सगुन शशि ॥ बदन रदन छब रतन ॥ तनक हरि ॥ मदन जनक शिव ॥ सनक वरद कटि ॥ कनक बसन कर ॥ कटक प्रमुख सब ॥ अलंकारसह ॥ निरंकार ओंकार मुरत ॥ साकार मुरत वसुदेव जानकर ॥ चकित थकित ॥ स्तुति करत पुनित ॥ जुगुलउपरकृत ॥ नमस्कार बहु ॥ पुनित पुकारत ॥ देवकी उपाय ॥ जयजयकार किनो संस्कार ॥ परम कर जोर ॥ जोर निजबृत्त ॥ कहत करलेत ॥ चलत भगवंत बच-नसों ॥१॥ गोकुलकी क्या कहूं बन्हांई ॥ जहां खेलत फनिसाई माई ॥ ध्रु० ॥८२॥ पद ॥ भाग्यहीन मी देवकी वदली विनवी वसुदेवा ॥ निर्दय हृदयें नेतां उचलुनि कैसें हो देवा ॥ध्रु० ॥ सहा मारलीं बाळें कंसें सातवें गळलें ॥ आठवा हा तुम्ही नेतसां मानस कां चळलें ॥ घाबरला जिव निर्धों पाहतो करपद हे गळले ॥ जन्मांतरिंचें कोण पाप तें न कळे हें फळलें ॥ भाग्य० ॥ ॥१॥ स्नेहभरें मीं स्नेहें नाहीं जावळ माखियलें ॥ पायांवरी मीं घेउनि कुमरा नाहीं न्हाणि-यलें ॥ नाहीं दिधली गुटी स्वहस्तें नाहीं पाजियलें ॥ कुळींचें दैवत सटवी तेंही नाहीं पूजियलें ॥ भाग्य० ॥२॥ सबळ बलाहक गगनीं वळला वर्षत सूकाळीं ॥ घोर शार्वरी आजि भासते काळासम काळी ॥ सदय मृदु अति हृदय कठिण कां मातें दुःखाळीं ॥ लोटुनि नेतां चित्त द्रवेना शिशु हा ये काळीं ॥ भा० ॥ ३ ॥ देवनाथ प्रभुचि हे ऐशी अति दुर्धर माया ॥ स्रवति लोचनीं जीवनबिंदु खेद करी माया ॥ कठिण केलें मन वसुदेवें गमली सीमा या ॥ मुक्तकपाटें झालीं घेउनि निघतां अमाया ॥ भाग्य० ॥ ८३ ॥ श्लोक वामनी छंद मालिनी ॥ उचलुनि हरि जों तो होय सानंद जाया ॥ प्रसवलि गुणमाया गोकुळीं नंद-जाया ॥ त्रिभुवनपतिची ते शक्ति हो योगनिद्रा ॥ करि सकळ जनांतें भ्रांति संयोग निद्रा ॥८४॥ श्लोक शि०॥ कवाडें लोहाचीं न निघति कदां जेवीं निकरें ॥ घणीं जीं लोहारें बसवुनि खिळे ठोकुनि करें ॥ असंगाचें शस्त्र प्रभु उचलितां तीं उघडती ॥ प्रतापें कृष्णाच्या अघटित चरित्रेंचि घडती ॥ ८५ ॥ आर्या ॥ न निजति दिवाहि काराद्वारांतचि जागती जसे कुतरे ॥ ते एकदांचि निजले जागों सर्वांसि पाजिले धुतरे ॥ ८६ ॥ कटाव ॥ भगवंत बचनसो ॥ बंद तुट गये ॥ कबार खुले ॥ रच्छक भूले ॥ साय रहे सब ॥ घोर भई निशी ॥ बादल आये मलय पवन घन ॥ गरज गरज बिज ॥ दामिनि दमके अंबर चमके ॥ रुमुक झुमुक ॥ जलतुसार लाग्यो ॥ बुंद पुरे ॥ हरि भिगत जान ॥ फन सेस धरे तलछत्र खरे ॥ अहिरूप भयंकर ॥ विशाल देखें ॥ कंपन लागे ॥ करपंजर पर ॥ पंकज लोचन ॥ धर संकटमों ॥ करारसें जमुना तट पायो ॥ तब जमुना भरपूर भरी ॥ तटउमंड चली ॥ जलप्रवाह दुस्तर ॥ तरल लोल कल्लोळ ॥ भवत बिच ॥ अवर्त अगनित न्याहरके मन ॥ ऊतारको कछु पार न पायो ॥ मुरारके पद प्रतापसे नदि ॥ मुरारके द्वय भाग

भई ॥ पद बाट दई ॥ ८७ ॥ आर्या ॥ तेजेंकरुनि पूर्वी दे वाट नदीपती जशी रामा ॥ प्रभुला घेउनि आला पथ त्याची त्या न दे कशी रामा ॥ ८८ ॥ श्लोक वामनी ॥ भुजंगप्रयात ॥ यशोदेसि होतां सुता योगनिद्रा ॥ समस्त स्त्रियां युक्त ये गाढनिद्रा ॥ न जाणेचि ते पुत्रि कां पुत्र कांहीं ॥ न तें लक्षिलें आणिकां बायकांहीं ॥८९॥ कटाव ॥पद बाट दई वृज कुमारसें ॥ गोकुलमें आये ॥ जोगमाया वह ॥ जनीं जसोदा ॥ भूल रहे सब ॥ कौवन पूछे ॥ इतनें मोहर पलंगपर ॥ पोहोचाय कुमरि ले ॥ ९० आर्या ॥ देव यशोदाशयनीं ठेवुनि घेउनियां तिची तनया ॥ जाय यथागत मार्गी स्वाश्रुभरें करुनि बाहवीत नया ॥ ९१ ॥ वसुदेवेन स्वसुतो नंदगृहे निर्गुणो न्यस्तः ॥ तत्कन्याऽपि गुणवती नीता तस्मा-द्गुणाः पूज्याः ॥ ९२ ॥ भगिनी-प्रसूति-वार्ता कानीं पडतांचि तो त्यजी शयन ॥ आला काळ असें मनिं मानुनि झाला भयें भ्रमन्नयन ॥ ९३ ॥ वज्रहृदय तो जातां त्यासि म्हणे देवकी नृपा सून ॥ हे सत्य तुझी दादा निश्चय केलाचि आजपासून ॥ ९४ ॥ सुमनोहरचरणयुगीं धरुनि शिळेवरी वधार्थ जों हाणी ॥ तों ती उडोनि गगनीं जाय तिला धरील काय खळपाणी ॥ ९५ ॥ नष्टा मज मारुनि फळ काय तुझा काळ वेगळा आहे ॥ कोठें तरी वाढतसे वधिल तुला उक्ति मनिं धरीं गा हे ॥ ९६ ॥ कटाव ॥ जागृत बालक, देखत ही आल्हाद भये है, तब सब बृजजन मंगल गाये, भेरि बजाये, हरख बढाये ॥ बिप्र बुलाये, मंगल जल पशुपालक न्हाये, देव दुंदुभी नादामोद प्रमोद कर भई, सुस्वरदाई ॥ ध्रु० ॥ माई गोकुलकी क्या कहूं बऱ्हाई ॥ जहां खेलत फनसांई ॥ माई गोकुलकी क्या कहूं बऱ्हाई ॥ ९७ ॥ श्लोक ॥ करें घे बरें बाळ पायावरी तें ॥ तदा त्यास न्हाणावया आदरी ते ॥ भरी भक्ति--गंगाळयीं प्रेमपाणी ॥ स्नेहें माखिला तो शिशू चक्रपाणी ॥ ९८ ॥ पद ॥ न्हाणीं न्हाणी त्या निर्मळातें न्हाणी ॥ खाणी तीचिया भाग्याची कोण वानी ॥ ध्रु० ॥ ज्याच्या स्नेहें देहभाव केले परते ॥ ज्याच्या स्नेहें जाळिलीं सकळहि दुरितें ॥ ज्याच्या स्नेहें सायुज्य सौख्य भरतें ॥ त्याच्या स्नेहें जावळ माखी करीं तें ॥१॥ न्हाणी० ॥ गंगा जन्मे ज्याचिया चरणकमळीं ॥ त्यावरी पाणी घालिते हस्तकमळीं ॥ ब्रह्मादीक वंदिती पदरजधूळी ॥ पदिंची माती घेउनी लावी कपाळीं ॥ २ ॥ न्हाणी न्हाणी० ॥ देवनाथ प्रभु अंबर या विश्वा कीं ॥ अंग त्याचें पुसोनि वस्त्रें झांकी ॥ सर्वात्मा जो व्यापक अणुरेणू कीं ॥ मुखानिळें तयाचे कर्ण फुंकी ॥ न्हाणी० ॥ ९९ ॥ पाळणा ॥ जो जो जो जोरे ॥ घनःश्यामा ॥ निज बाळा गुणधामा ॥ जोगी आलासे विश्रामा ॥ तो मी दाविन तुम्हां ॥ ध्रु० ॥ जोगी दिसतो विचित्र ॥ त्याला तीन नेत्र ॥ चर्मा वेगळें नसे वस्त्र म्हणवी तुझा मित्र ॥ बाळा जो जो० ॥१॥ अंगीं चर्चुनिया विभूति ॥ अर्धांगी पार्वती ॥ वृषभारूढ तो पशुपती ॥ त्रिशूल डमरू हातीं ॥ बाळा जो जोरे० ॥ २ ॥ आणिक एक नवल दयाळा ॥ कंठ दिसे नीळा ॥ मस्तकीं जळ वाहे झुळझुळां ॥ नेत्रीं अग्निज्वाळा ॥ जो जो० ॥ ३ ॥ आणीक नवल परियेसी ॥ गजचर्म पाठीशीं ॥ शिक्षा लाविली दक्षासी ॥ ठकविलें देवांसी ॥

---

**आर्या ९२**—स्वसुतः ( स्वपुत्र ) निर्गुणः ( गुणरहित ) न्यस्तः ( स्थापन केला ) तत्कन्या ( नंदकन्या ) नीता ( नेली ) तस्मात् ( त्या कारणानें ) पूज्यः ( मान्य झाले आहेत ).

बाळा जो जोरे ॥४॥ जोगी आलासे आंगणीं ॥ तुळशी वृंदावनीं ॥ तुजला देखोनि नयनीं॥ घालित लोटांगणी ॥ बाळा जो जोरे० ॥ ५ ॥ उगला राहे बा जगदीशा ॥ बाहेर आला पिसा ॥ योगियां लाविलें निजध्यासा ॥ भाळीं चंद्रठसा ॥ बाळा जो जोरे० ॥ ६ ॥ आळी घेतली ना राहे ॥ जोगी दावी माये ॥ सर्वां भूषणीं तो आहे ॥ परब्रह्म तो पाहे ॥ बाळा जो जोरे० ॥७॥ गोकुळीं जन्म घेतलें निधान ॥ परब्रह्म तें जाण ॥ तयाचे चरणीं शरण ॥ एका जनार्दन ॥ बाळा जो जोरे ० ॥८॥ १०० ॥ आर्या ॥ नवपुत्रोत्सव परवश नंद करी जातकर्मकविधीतें ॥ सुकवि वदान्य मिळाला पूर्वी तैसा कधींहि न विधीतें ॥ १०१ ॥

॥ पद ॥ यशोदे बाई ऐके पुत्राचीं लक्षणें गे ॥ ध्रु० ॥ यातें म्हणतिल भगवान् परी हा होईल गाडीवान ॥ बळीचें द्वारीं द्वारवान ॥ देवडी राखील त्याची ॥ य० ॥ १ ॥ करिल दह्या दुधाची चोरी ॥ भोंदिल गोपाळांच्या पोरी ॥ अवघ्या शिंदळांचा चौधरी ॥ लाज आणील बायकां ॥ यशोदे बा० ॥२॥ पांडवराजयाचे मेळीं ॥ काढिल उच्छिष्ट पत्रावळी ॥ ढोरें तुमचे घरीं वळी ॥ गायी दुभवील निश्चयें ॥ यशोदे बाई० ॥ ३ ॥ या प्रकारेंकरून प्रभु षड्गुणैश्वर्यसंपन्न जो नारायण त्यानें दुष्ट राक्षसादिकांचा वध करावा व गोब्राह्मणां- दिकांची पीडा हरण करून धर्माची संस्थापना करावी आणि भक्तांचें संरक्षण करावें एतदर्थ श्रीकृष्णावतार धारण केला. याकरितां आपला तरणोपाय होऊन जन्ममरणरूप संकटांचा नाश व्हावा अशी ज्यांस इच्छा असेल त्यांनीं भगवद्भजन अनन्यभावेंकरून करावें यासाठीं कवि म्हणतात, नारायण भजरे मानस० ॥ हेंचि दान:देगा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥१॥ गुण० ॥२॥ नलगे० ॥३॥ तुका म्हणे गर्भवासी ॥ सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

॥ **आरती** ॥ आरती भुवनसुंदराची इंदिरावरामुकुंदाची ॥ ध्रु० ॥ पद्मसम पादयुग्मरंगा ॥ ओंवाळणी होति भृंगा ॥ नखमणी स्रवताहे गंगा ॥ जे कां त्रिजगतापभंगा ॥ चाल ॥ वर्तुळ गुल्फ भ्राजमाना ॥ किंकिणी क्वणित ॥ नाद घणघणित ॥ वांकि वर झुणित ॥ नुपुरें झणण मंजिराची ॥ झणित ध्वनी मंजिराचीं ॥ आरती भु० ॥ १ ॥ पीत पट हाटक तप्त वर्णी ॥ कांची नितंब सुस्थानीं ॥ नाभिची अगाध हे करणी ॥ विश्वजनकाची ही जननी ॥ चाल ॥ त्रिवलीललित उदर शोभा ॥ कंबुगल माळ विलंबित झळाळ ॥ कौस्तुभ- श्रीवत्स शीत मणि ॥ सरळ तरळ कंकणाची ॥ प्रीति बहु जडित कंकणाची ॥ आरती० ॥ २ ॥ इंद्रसम हास्य कुंदरदना ॥ अधर अरुणार्कबिंब सदना ॥ पहातां भ्रांति पडे नयना ॥ सजल मेघाभ दैत्यदलना ॥ चाल ॥ झळकत मकरकुंडलाभा ॥ कुटिल कुंतला मयुर- पत्रालि मुक्तें वेष्टिलीं, भाळीं शोभलीं तिलक केशरी झळाळीत कृष्ण कस्तुरीची ॥ अक्षता काळी कस्तुरीची ॥ आरती भुवनसुंदराची० ॥ ३ ॥ कल्पद्रुमातळीं मूर्ती ॥ सौदामिनी कोटिदीप्ती ॥ गोपी गोपवलय भवती ॥ त्रिविष्टप पुष्पवृष्टि करिती ॥ चाल ॥ मंजुळ मधुर मुरलि नादें ॥ चकित गंधर्व ॥ थकित अप्सरा ॥ सुरागिरिवरा ॥ कर्पुराधारा ॥ रतिनें प्रेमयुक्त साची ॥ मूर्ती ओंवाळित साची ॥ आरती भुवन॥४॥ वृंदावनींचिये हरणी ॥ सखे श्रीकृष्ण माय- बहिणी ॥ श्रमलों भवाब्धिचे फिरणीं ॥ आतां ठाव देईं चरणीं ॥चाल॥ अहा पूर्ण हे पुण्यश्लोका ॥ नमितों चरण ॥ शरण मी कवण ॥ येऊं दे विशाणपाणी ॥ कृष्ण नेणतें बाळ आपुलें राखि लाज त्याची ॥ दयाब्धे राखी लाज त्याची ॥ आरती० ॥ ५ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा० ॥

पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ।। पार्वतीपते हरहर महादेव ।। सीताकांतस्मरण जयजयराम ।। नंतर अष्टांगें करून देवास हरिदासानें नमस्कार करावा.

---

# कथा ३ री.

## हनुमज्जन्म पूर्वरंग निरूपण.

श्रीमन्मंगलमूर्तयेनमः ।। अविरलमदजलनिवहं भ्रमरकुलानीक–सेवित–कपोलं ।। अमित-फलदातारं कामेशं गणपतिं वंदे ।। १ ।। इत्यादि नमनं ।। गुरुराज माउली ।। दयाकर गुरु-राज माउली ।। पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ।। पार्वतीपते० ।। सीताकांत स्मर० ।। नंतर ध्रुवपद म्हणावें. अभंग——देव भावाचा भुकेला ।। दास सेवकाचा झाला ।। ध्रु० ।। पहा महिमा आवडीचीं ।। फळें खाय भिल्लिणीचीं ।। १ ।। पोहे सुदामदेवाचे ।। फके मारी कोर-डेच ।। २ ।। न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडें ।। तुका म्हणे भक्तीपुढें ।। ३ ।। १ ।। पुंडली-कवरदे हरिविठ्ठल ।। पार्वतीपते० ।। जानकीजीवनस्मरण ।। आदौ कीर्तनारंमीं भगवद्भक्तावतंस तुकारामाख्य साधु मनुष्यमात्रांनीं ईश्वरभजन करून चतुर्विध पुरुषार्थास पात्र व्हावें या उद्दे-शानें भगवान् भक्तिप्रिय आहे असें वर्णन करितात. ।। देव भावाचा भुकेला० ।। याविषयीं भगवंताची उक्ति आहे. भागवत ११ वा स्कंध श्लोक——न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।। न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिममोर्जिता ।। २ ।। अर्थ–हे उद्धवा, मी योगा-भ्यास केल्यानें वश होत नाहीं. तसेंच सांख्यशास्त्राचें अध्ययन केल्यानेंही मी स्वाधीन होत नाहीं. किंबहुना धर्म, वेदाध्ययन, तपश्चर्या आणि दान यांनींही माझी तशी प्राप्ति होत नाहीं. जशी एक प्रेमलक्षणा भक्ति मला वश करिते, तसा मी कोणत्याही साधनानें वश होत नाहीं. तस्मात् भक्तीवांचून जीं इतर साधनें तीं व्यर्थ होत. पहा, हा ग्रहस्थाश्रम कर्मानुष्ठानद्वारें सर्व पुरुषार्थदायक आहे. परंतु ईश्वरचरणीं भाव जर नाहीं तर व्यर्थ होय. याविषयीं कवि म्हणतात. आर्या–बल्हर्भकं महाभगमपि कांताभरसमन्वितं भवनं ।। यदि च सदाभरण-स्थलमपि भावस्थितिविवर्जितं तु वनं ।। ३ ।। अर्थ——बल्हर्भकं ( ज्यास पुष्कळ मुलें आहेत ) महाभगं ( ऐश्वर्ययुक्त ) कांताभरसमन्वितं ( सुंदर स्त्रियांनीं युक्त ) सदाभरणस्थलं ( उत्तम भूषणांनीं शोभित ) असें जरी भवनं ( गृह ) आहे तरी भावस्थितिविवर्जितं ( ईश्वराचे ठिकाणीं भाव जर नाहीं तर ) तें वनच होय. दुसरा अर्थ——भावस्थिति ( भ या अक्षराची स्थिति जर नाहीं तर ) वनच होय. पहा, भवन यांतून भ काढिला असतां वन असें राहतें. आतां वन कसें तर, ' बल्हर्भकं ' यांतून भ काढिला म्हणजे 'बल्हर्कं' असें राहतें; याचा अर्थ ज्यांत रुईचीं झाडें पुष्कळ आहेत. ' महाभगं ' यांतून भ काढिला असतां 'महागं' म्हणजे ज्यांत मोठे मोठे डोंगर आहेत. ( कांताभरसमन्वित ) यांतून भ काढल्यावर, 'कांतारसमन्वितं' म्हणजे जुनाट अरण्यांनीं युक्त ( सदाभरणस्थलं ) यांतून भ काढल्यास 'सदा रणस्थलं' ( ज्यांत नेहमीं तंटे बखेडे होतात ) असें वन होतें. याकरितां सर्वांनीं परमेश्वराच्या ठिकाणीं भक्ति ठेवावी, म्हणजे सर्व ग्रहस्थाश्रम सफळ होतो.

भक्तीवांचून ईश्वरप्राप्तीस साधन नाहीं. याविषयीं मोरोपंत म्हणतात. ॥ आर्या ॥ भक्तिविना वश नोहे वीण्यानें वा मृदंग--नादानें ॥ कन्यादान फलातें पावे कैसा मृदंगना--दानें ॥ ३ ॥ अर्थ---परमात्मा भक्तीवांचून वीण्यानें किंवा मृदंगाच्या नादानें वश होत नाहीं. यास दृष्टांत--मृदंगनादानें म्हणजे मृत्तिकेची पुतळी दान केल्यानें कन्यादानाचें फल कसें प्राप्त होईल ? होणार नाहीं. तद्वत् भक्तीवांचून इतर साधनें केल्यानें ईश्वरप्राप्ति होणार नाहीं. आपल्यास ईश्वरप्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास त्याची भक्तीच करावी, म्हणजे ईश्वर प्रसन्न होतो; कारण त्याला भक्ति फारच प्रिय आहे. हा आशय जाणून तुकाराम म्हणतात, ॥ देव भावाचा भुकेला ॥ नारायणाची भक्ति जशी तारक आहे तसें ब्रह्मज्ञानही नाहीं. याविषयीं भागवतांत ब्रह्मदेवाची उक्ति आहे--श्लोक ॥ श्रेयःश्रुतिं भक्तिमुदस्य ते विभो क्लिश्यंति ये केवलबोधलब्धये ॥ तेषामसौ क्लेशचएवशिष्यते नान्यद्यथा स्थूलतुषावघातिनाम् ॥ ४ ॥ अर्थ---हे विभो परमेश्वरा, कल्याणदायक जी तुझी भक्ति तिला सोडून केवळ परोक्ष ब्रह्मज्ञान प्राप्त होण्याकरितां जे क्लेश पावतात त्यांस शेवटीं क्लेशच अवशिष्ट राहतो. दुसरें कांहीं प्राप्त होत नाहीं. यास दृष्टांत--स्थूल तुष म्हणजे साळीचा कोंडा. त्यास कांडीत बसणाऱ्याला जसें श्रमांवांचून दुसरें फळ मिळत नाहीं, त्याप्रमाणेंच भक्तीवांचून सर्व साधनें व्यर्थ होत. भक्ति हें परमेश्वरास वश करणारें मुख्य साधन होय. भक्तिमानाचे ठायीं इतर गुणदोषांचा विचार परमात्मा मुळींच करीत नाहीं. एक भक्ति असली म्हणजे प्रभु त्यावर अनुग्रह करितात. याविषयीं कवि म्हणतात. आर्या--अयमुत्तमोयमधमो जात्या रूपेण संपदा वयसा ॥ श्लाघ्योऽश्लाघ्यो वेत्थं न वेत्ति भगवाननुग्रहावसरं ॥ ५ ॥ अर्थ--भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न असा जो नारायण तो भक्तिप्रिय असल्यामुळें अनुग्रहाचे वेळीं हा जातीनें उत्तम किंवा अधम आहे, तसाच रूपानेंही हा सुंदर आहे व हा कुरूप आहे, हा संपन्न किंवा दरिद्री आहे किंवा हा वृद्ध, हा तरुण, हा कीर्तिमान्, हा निंद्य असा कोणताच विचार मनांत न आणतां त्यावर कृपा करितो. कारण, ईश्वरास जी अत्यंत प्रिय भक्ति ती अति दुर्मिळ आहे, म्हणून त्यांच्या इतर गुणदोषांकडे लक्ष न देतां भक्तांचें कल्याण करतो. याकरितां सर्वांनीं अनन्यपणें ईश्वरभक्ती करावी, अशा अभिप्रायानें तुकाराम म्हणतात ॥ देव भावाचा भु०॥ याविषयींच सप्तमस्कंधीं प्रल्हाद म्हणतात--भागवत श्लोक---मन्ये धनाभिजनरूपतपःश्रुतौजस्तेजःप्रभावबलपौरुषबुद्धियोगाः ॥ नाराधनायहि भवंति परस्य पुंसो भक्त्या तुतोष भगवान् गजयूथपाय ॥६॥ अर्थ--धन, उत्तम कुळांत जन्म, सौंदर्य, तप, वेद, शास्त्र यांचें अध्ययन, पराक्रम, बळ, उद्योग, बुद्धी,आणि योगाभ्यास हीं सर्व साधनें जर भक्तिविरहित आहेत तर परमात्म्याच्या संतोषास कारण नाहींत. आणि यांतील कांहीं नसून एक भक्ति जर आहे तर परमेश्वर प्रसन्न होतो. यास उदाहरण.--गजेंद्र हा पशु असल्यामुळें त्यांचे ठायीं हे कोणचेच गुण नव्हते. परंतु दृढभक्तीनें भगवान् त्यास संतुष्ट झाला व नक्रापासून त्याचें संरक्षण केलें. तात्पर्य, नारायणास भक्तीसारखें दुसरें कांहीं प्रिय नाहीं. पहा, भक्तीसाठीं नारायणांनीं काय काय चरित्रें केलीं आहेत.

## कवीत.

जो परमेसर साच निरंजन जा कहते सब लोक धनी है ॥ भूसुर भूप बिर और

किन्नर ध्यान धरे जाकौं सिद्ध मुनि हैं ॥ चार बिचार करे निसबासर छे अठराकोभि अंत न पैये ॥ ओ हर हरानिकि छोकरिया चमचाभर छांचकु नाचत चैथे ॥ ७ ॥

अर्थ—जो परमेश्वर निर्गुण आहे, ज्याला सर्व लोक आपला धनि असें म्हणतात, सर्व ब्राह्मण, राजे, सिद्ध किन्नर व मुनी ज्याचें ध्यान करितात, चार म्हणजे वेद नेहमीं ज्याचा विचार करितात. सहा शास्त्रें, अठरा पुराणें यांस ज्याचा अंत लागत नाहीं, तो प्रभु श्रीकृष्ण अनंत ब्रह्मांडांचा नायक; परंतु चमचाभर ताक भिळण्याकरितां गोपीपुढें नाचून दाखवितो. कां बरें ? प्रभूला ताक मिळत नाहीं म्हणून कीं काय ? नव्हे, त्या गोपींची खरी प्रेमलक्षणाभक्ति असल्यानें नारायण त्यांच्यामुळें लंपट झाला. याकरितां ज्याला नारायणाची आपल्यावर कृपा व्हावी अशी इच्छा असेल त्यानें निर्मळ अंतःकरणेंकरून परमेश्वराची भक्ति करावी. म्हणजे त्याचे दुसरे गुणदोष न पाहतां प्रभु त्याचें कल्याण करतात. कारण, खरी प्रेमयुक्त भक्ति देवांस फार दुर्लभ आहे. म्हणून प्रथमारंभीं तुकाराम म्हणतात. ॥ देव भावाचा भुकेला० ॥ ध्रु० ॥ भजन ॥ पुंडली०॥ पार्वतीपते० ॥ सीताकांतस्मरण ॥ पहा केसरी वानराची स्त्री अंजनी ही जातीनें, रूपानें आणि संपत्तीनेंही हीन असून एक ईश्वराचे ठिकाणीं खरी भक्ति असल्यामुळें परमात्म्यानें तिजवर कृपा केली आणि तिच्या पोटीं अवतार धारण करून व तिचे मनोरथ पूर्ण करून तिची सर्व जगतांत ख्याती केली, एतद्विषयीं कवि हनुमज्जन्म आख्यान वर्णन करितात.

---

# अथ हनुमज्जन्मप्रारंभः



श्रीगणेशायनमः ॥ श्लोक ॥ वसंततिलका ॥ वंदुनियां पद तया पवनात्मजाचे ॥ वर्णीन जन्ममहिमा बहु गोड वाचें ॥ जो अंजनीं-उदरिं गर्भ विराजमान ॥ शास्त्र-श्रुतींस नकळे गुणरूप-मान ॥१॥ उपजाति ॥ भूभार हा सर्व हरावयासी ॥ साधूजना तोष करावयासी ॥ हरीकुळीं जन्म वरी कपाली ॥ जो उद्धरोनी त्रिजगांसी पाळी ॥ २ ॥ शार्दूल० ॥ अक्रावे स्वरूपा कसें नटुनियां लीला जहाली कशी ॥ तीं मातें अजि हो सविस्तर कथा सांगा कृपा फारशी ॥ तैं बोले शिव तो स्वयें निजमुखें मक्ती धरीं मानसीं ॥ ऐकें देवि तुज स्वयेंचि वदतों जी ही कथा सारसी ॥ ३ ॥ आर्या ॥ पृथ्वी जर्जर झाली गेली ब्रह्मयासि वृत्त कळवाया ॥ अळवाया परमात्मा स्तवुनि बळें तन्मनासि वळवाया ॥ ४ ॥ सूरभूसुरकार्यार्थी धरितो अवतार दुष्ट माराया ॥ शेषश्रीनारायण सायुधही पार्वतीस ताराया ॥ ५ ॥ ज्याचा प्रताप ऐकुनि अवनींतील धाकतात योद्धे ते ॥ त्या दशरथरायानें पुत्रेष्टी मांडिली अयोध्येतें ॥ ६ ॥ श्लोक ॥ स्रग्धरा पुर्वी तेणें सुरांना बहु सुख दिधलें त्या निमित्तें तयाला॥ होतील श्रेष्ठ राया म्हणतिल सुगुणी पुत्र चौघे नृपाला ॥ शृंगर्षी आणि यत्नें मग करिं करि तो पुत्रकामेष्टि याग ॥ त्या अग्नीच्या प्रसादें सकळ तव निघे पुत्रहीनत्वडाग ॥ ७ ॥ मालिनीवृत्त ॥ दशरथ नृप यागीं ऋष्यशृंगावरून ॥ करित हवन कुंडीं पुत्रकामा धरून ॥ बहत मजन तेथें यज्ञकर्मी सहाय ॥ असति गुरु वसिष्ठादि स्वकर्मीत आर्य ॥८॥ आर्या ॥ हव-

नांतीं सत्वर नृप पायसघृतभाजना त्रिचरणाला ॥ पाहुनि होउनि हर्षित साष्टांगीं नमित सत्रि चरणांला ॥ ९ ॥ **श्लोक** ॥ शार्दूल० ॥ क्षिप्रापात्र भरोनियां दशरथा अग्निप्रसादार्थ दे ॥ त्याचे भाग करोनि तीन नृप तो तीघीं स्त्रियांसींच दे ॥ घ्या स्वीकार करा विलंब न करा ऐसें तिघींना कथी ॥ तों कैकेयि रुसे वदे भलतसें घेईन पिंडाप्रती ॥ १० ॥ **साकी** ॥ कौसल्येला प्रथम दुजा दे भाग सुमित्रेलागीं ॥ मागुति भाग विभागुनि कैकैयीलागुनि देत सुरागी ॥ ११ ॥ **ओंवी** ॥ मागुनि भाग दिधला ॥ तेणें कैकैयीस रोष आला ॥ वरी हस्त अधोमुखाला ॥ करूनि मुग्धा बोलतसे ॥ १२ ॥ **आर्या** ॥ अपमानें दिधला जो भाग जळो परि नको मला हो हा ॥ या भूमींतून रविकुळ तनयसुतरुचा न कोम लाहो हा ॥ १३ ॥ **ओंवी** ॥यापरी बोले सुंदरी ॥ तों अकस्मात एक घारी ॥ येऊनि पिंड झडपी झडकरी ॥ जाय अंबरीं तात्काळीं ॥ १४ ॥ **साकी** ॥ भाग झरपके घार गयी जद कैकयि करत अंदे-सा ॥ मैं अकेली मयी निपुत्री मेरा नसिबहि ऐसा ॥ १५ ॥ **आर्या** ॥ तेव्हां ती कौसल्या आणि सुमित्रा निजार्ध भाग तिला ॥ देती कीं स्निग्धेपणें[1] वांटिति हो सप्तधां[2] सभाग तिला ॥ १६ ॥ **ओंवी** ॥ घारीनें जो पिंड झडपिला ॥ त्याचा वृत्तांत काय झाला ॥ श्रोतयानीं आक्षेप केला ॥ कथा समूळ सांगू तयां ॥ १७ ॥ **आर्या** ॥ सुग्रीव-सैन्य-नायक वीरेश्वर एक केसरी नाम ॥ वानर असोनि जेणें, केले अभ्यस्त ऋग्यजु:साम ॥ १८ ॥ त्याची स्त्री अंजनि जे सुकुमारी सुंदरी पतिप्राणा ॥ ती ऋष्यमूक शैलीं आराधी शंकरा जगत्राणा ॥१९॥ ॥ **पद** ॥ केसरीनामें वानर त्याची हृद्रंजनि अंजनि ॥ सती बहु विश्रुत जे सज्जनीं ॥ नंदन व्हाया पवित्रकीर्ति, वीर बलाढ्य जनीं ॥ तपातें करि गिरिवरीं निर्जनीं ॥ गौरीवल्लभ मनीं चिंतुनी विषयभोग त्यागुनी ॥ करी वाङ्‌नियमातें साजणी ॥ १ ॥ हनुमंताचें जन्म सांगतों ऐका सावध मनीं ॥ कथिति जें रामायणीं सन्मुनी ॥ ध्रु० ॥ २० ॥ प्राणायाम करुनि षडिंद्रिय जय केसरी-वल्लभा ॥ करी धरि हृदयिं उमावल्लभा ॥ कधिं नीराशन कधीं निरशनें करी परी गल्लभा ॥ प्रफुल्लित जिची इतर दुर्लभा ॥ नत करुणाकर शंकर बघुनी तिची तपस्या शुभा ॥ प्रगटुनी होय तिजपुढें उभा ॥२॥ हनुमंताचें० ॥२१॥ **ओंवी** ॥ सात सहस्र वर्षेपर्यंत ॥ मौन धरोनि तपा करीत ॥ आराधिला उमाकांत ॥ प्रसन्न झाला तपांतीं ॥ ॥ २२ ॥**आर्या**॥ हें वृत्त धूर्जटीला कळलें चित्तीं म्हणोनि गिरिबाळा ॥ घेउनि अंकीं श्वेतीं वृषभा बैसुनी तिच्या जवळ आला ॥२३ ॥ तिजला पशुपति वदला अंजनि मजला अभिष्ट वर मागे ॥ भक्तांचा कल्पद्रुम वरदेश्वर मी तिला असें सांगे ॥ २४ ॥ नेत्रें उघडुनि अंजनि पाहे प्रभुतें करी त्वरा पाणी ॥ जोडी पदाब्ज वंदी तैं विश्वंभर अशी वदे वाणी ॥२५॥ **पद** ॥ वरं वरय वरवर्णिनि म्हणतां म्हणे जोडुनि करा ॥ मनोरथ पूरित इतका करा ॥ तनय विनय-संपन्न बलाधिक चिरायु शशि-भास्करां ॥ समचि द्या मजसि विभो शंकरा ॥ असुर विमर्दुनि सहाय होउनि वैदेही-प्रिय-करा ॥ तदर्चनिं धर वामन किंकरा ॥३॥ हनुमंताचें० ॥ २६ ॥ **ओंवी** ॥ म्हणे अंजनी माग इच्छित ॥येरू म्हणे दे अक्षयी सुत ॥ परम प्रतापी यशवंत ॥ महाभक्त वज्रदेही ॥ २७ ॥ **आर्या** ॥ सद्गुणशाली अक्षय दृढतनु सुत दे मला महादेवा ॥ रविकुलमंडन सीतापतिची त्याला घडो सदा सेवा ॥ २८ ॥

---

१ स्नेहानें. २ सात ठिकाणीं.

**ओंवी** ॥ मग बोले उमावर ॥ अकरावा मी महारुद्र ॥ तुझिये उदरीं अवतार ॥ धरितों अक्षयीं जाण पां ॥ २९ ॥**आर्या** ॥ शंभु म्हणे रामाचें मजला करणें असेचि पददास्य ॥ देवद्रोही दशानन गृह हाळुनियां तदीय शिरिं लास्य ॥ ३० ॥ यास्तव तुझिया उदरीं येतों मी सर्व लोक सुखवाया ॥ त्वचित्त तुष्ट करुनी राक्षस कुलमूळ तूर्ण दुखवाया ॥ ३१ ॥ परि या भूधरें शिखरीं कर पसरुनि अंजनी पहा स्वस्थ ॥ देइल तुझिया हस्तीं लोकप्राणेश पिंड तो खस्थ ॥३२॥ **ओंवी** ॥ ऐके शुभवदनें अंजनी ॥ तूं अंजली पात्र पसरुनी ॥ बैसें सावध माझिये ध्यानीं ॥ अंतर्दृष्टी करूनियां ॥ ३३ ॥ सुटेल अद्भुत प्रभंजन ॥ साक्षाल्लोक-प्राणेश आपण ॥ प्रसाद देईल आणून ॥ तो तूं भक्षीं अविलंबें ॥ ३४ ॥ **आर्या** ॥ तो यत्नें करुनि तुवां ठेवावा भाग आपुल्या उदरीं ॥ त्या सत्कर्में तुजला होइल सुत संहरावया सदरीं ॥ ३५ ॥ ऐसें सांगुनि सुखकर प्रभु गेला रामचंद्र-यश गात ॥ त्याची आज्ञा वंदुनि अंजनि त्या स्थळीं बसे तया ध्यात ॥ ३६ ॥ **ओंवी** ॥ स्वस्थळा गेला शूळपाणी ॥ ध्यानस्थ बैसली अंजनी ॥ नयन झांकिले निज मनीं ॥ ब्रह्मानंदें उचंबळे ॥३७॥ **आर्या** ॥ इकडे दशरथ-पत्नी-करिंचें पायस हरोनी ने घारी ॥ वैश्वानर सुखकारी तें अर्पी अंजनीस मेघारी ॥ ३८ ॥ हरिहर समीर वंदुनि पायास भक्षी प्लवंगपति-महिला ॥ अहिला सामरशक्री वंद्या जी सिंधुशैलवती महिला ॥३९॥ गर्भिणि झाल्ये ऐसें चित्तीं वाटे करीतसे ध्यान ॥ तो मदनारी पावो ऐसें सतिलागिं लागलें ध्यान ॥ ४० ॥ तूं पुच्छरूप मी हरि होतों हें शंभु सुचवी शक्तीस ॥ गर्भस्थ अंजनीच्या झाले ते लौकिकार्थ नवमास ॥ ४१ ॥ जन्मांतरीं सुवर्च्या स्वर्वेश्या नाचतां विधिद्वारीं ॥ चुकली म्हणोनि तिजला शापूनि करी तत्क्षणींच तो घारी ॥ ४२ ॥ जेव्हां कैकयिपासुनि पायस अंजनी--करांत देशील ॥ तेव्हां शापविमुक्ता होउनि तूं मत्समीप येशील ॥ ४३ ॥ **ओंवी** ॥ घारी ब्रह्मवरें करोनी ॥ उद्धरोनि गेली स्वस्थानीं ॥ इकडे नवमास भरतां अंजनी ॥ प्रसूत झाली ते काळीं ॥४४॥ **श्लोक** ॥ चैत्रे मासि सिते पक्षे पौर्णमास्यां शनैश्चरे ॥ अंजन्यां वायुतो जातः परमात्मा स्वयं हरः ॥४५॥ **पद** ॥ पवन-तनय परम विनय राम सेवनीं ॥ ध्रु० ॥ उपजतांचि अर्क-बिंब घेतलें करीं ॥ फळ विभावतां विरिंचि सोडावी ॥ प्रयत्न करूनि स्तवुनि सज्जनीं ॥ पवनत० १ ॥ अंबुधी तरूनि जाय जंबुचे पुरीं ॥ जंबुमाळी दमुनि अर्पि जनकजेसि ॥ मुद्रिका अशोक उपवनीं ॥ पवतन० ॥ २ ॥ कालनेमि दमुनि आणी द्रोणपर्वता ॥ वांचविलें लक्ष्मणासि लाधली सुपुत्र माय धन्य अंजनी ॥ पवनतन० ॥ ३ ॥ कल्पतरुतळीं विराजमान तो हरी ॥ मुख्य पाय सद्-गुरुचे वंदुनी ॥ आनंदतनय चिंतितो मनीं ॥ पवनतन० ॥ ४ ॥ ४६ ॥ **ओंवी** ॥ ऋषि-पत्न्या पाहती डोळां ॥ तों बाळिया बाळ जन्मला ॥ कीं वासरमणी प्रगटला ॥ वानरवेषें दैदीप्य ॥ ४७ ॥ **आर्या** ॥ गगनांत लक्ष गांवें केलें उड्डाण जनन--समयास ॥ उपमा काय वदावी या ब्रह्मांडांत जन न सम यास ॥४८॥ सत्राणें जाउनियां धरिलें प्रत्यक्ष सूर्य-किरणास ॥ ऐसा कोण असे हो आणी प्रत्यक्ष सूर्य किं रणास ॥ ४९ ॥ वक्षस्थळीं तयाचे देतां मुष्टीस रक्त वमताहे ॥ मानी मनांत राहू मुष्टि नव्हे आजि वज्र गमताहे ॥ ५० ॥ मग त्याच्या कैवारें धांवुनि आलाचि रुष्ट तो केतु ॥ अद्भुत बळासि पाहुनि सोडुनि गेलाचि युद्ध-

१ नृत्य. २ लवकर. ३ पर्वत. ४ आकाशांत राहणारा. साधुद्वेष्टे.

संकेतु ॥९१॥ राहु क्रोधावेष्टित गेला शक्रासि वृत्त कळवाया ॥ जैसा वृषपर्व्यातें शक्रमुनी तद्यशासि मळवाया ॥ ९२ ॥ मग इंद्रानें ऐकुनि घेतां क्रोधायमान झाला तो ॥ दूत प्रेरी सत्वर सुरगण--समुदाय सिद्ध आला तो ॥ ९३ ॥ ऐरावतासि आणुनि त्याचे स्कंधावरी बसे मघवा ॥ राहू सन्निध सांगे पुच्छपतीचा प्रताप तो अवघा ॥ ९४ ॥ सवित्या सन्निध येतां वानररूपीच बैसला दिसला ॥ इंद्रबळें तो राहु पुनरपि येतांचि देखिला हंसला ॥९५॥ मुष्टि-चपेटें मारुनि भूमिवरी तोचि पडिला राहू ॥ प्राणा मुकलोंचि म्हणे केतु तरी दूर दवडिला राहू ॥ ९६ ॥ **साकी** ॥ वज्री कुलिशा प्रेरी तेव्हां ते हनुवटीस लागे ॥ मूर्च्छित मारुति पाहुनि तात भरलासे बहु रागें ॥ ९७ ॥ **आर्या** ॥ या त्रिजगामाझारीं जो दोषिजनास दंड करणार ॥ त्या यमधर्मासह मीं सर्वांचे प्राण आज हरणार ॥ ९८ ॥ **साकी** ॥ वाताकर्षण होतां उदरें फुगलीं त्या अमरांचीं ॥ सर्वहि पळती तेव्हां वार्ता सोडुनि त्या समराची ॥ ९९ ॥ **आर्या** ॥ बहु यत्स्मरणें मनुजां वीर्य यशहि शौर्य बुद्धिबल होतें ॥ संग्रामीं या स्मरतां निर्मळ जें शौर्य-युक्त बळ होतें ॥ १०० ॥ **पद** ॥ अंजनि उदरीं शंकर जन्मुनि वानर झाले हनुमान ॥ ध्रु० ॥ वसंतऋतु मधुमास पौर्णिमा दिनकर उदयाचे वेळीं ॥ बुभुःकारची जन्मुनि केला उड्डाणातें करि गमन ॥ अंजनि उदरीं० ॥१॥ क्षुधा लागली कपिला म्हणुनी रवि फळ जाणुनि करीं धरिलें ॥ सुंदर रूप तनु बहु चांगली सर्वां लागलें तें ध्यान ॥ अंजनि उदरीं० ॥२॥ युद्ध करितां राहू केतु इंद्रें टाकुनि वज्रातें ॥ मूर्च्छित सुत मग वायु आकर्षित सर्वांचें गेलें तैं भान ॥ अंजनि उदरीं० ॥ ३ ॥ रामकृष्ण म्हणे माते अंकीं मारुती करि स्तनपान ॥ तत्समयीं बहु आनंद झाला ध्या नामामृत करूं पान ॥ अंजनि —उदरीं शंकर जन्मुनि वानर झाले हनुमान ॥ ४ ॥ या प्रकारें अंजनीच्या भक्तीमुळें साक्षात् शंकरांनीं तिच्या उदरीं जन्म घेऊन सर्व जगतांत तिची ख्याति केली व तिचे सर्व मनोरथ पूर्ण केले. त्यापेक्षां नारायणाला जाति, रूप व संपत्ति इत्यादि गुणांची कांहीं अपेक्षा नाहीं. एक दृढ प्रेमलक्षणाभक्ति असली म्हणजे प्रभु अनुग्रह करितात. हा अभिप्राय मनांत आणून सर्व जीवांच्या कल्याणार्थ ज्यांची वाणी ते तुकारामाख्य साधु म्हणतात. बाबांनो, जन्ममरणादि संकटांतून मुक्त व्हावें आणि याच देहांत परमानंद प्राप्त व्हावा अशी जर इच्छा आहे तर नारायणाची अनन्यभक्ति करा; म्हणजे प्रभु अनुग्रह करतील व अविनाशी जें मोक्षसुख तें तुम्हास देतील. कारण नारायण अनन्यभावाचा फार भुकेला आहे. देव भावाचा भुकेला ॥ दास सेवकाचा झाला ॥ ध्रु० ॥ हेंचि दान देगा देवा० ॥ **आरती मारुतीची** ॥ जयदेव जयदेव जय जय हनुमंता ॥ तुमचेनि प्रसादें न भिऊं कृतांता ॥ ज० ॥ ध्रु० ॥ सत्राणे उड्डाणे हुंकार वदनीं ॥ करि डळमळ भूमंडळ सिंधुजळ गगनीं ॥ गडगडिलें ब्रह्मांड धोका त्रिभुवनीं ॥ सुरवर नर नीशाचर त्यां झाली पळणी ॥ जयदेव० ॥१ ॥ दुमदुमलीं पाताळें उठिला प्रतिशब्द ॥ थरथरिला धरणीधर मानीला खेद ॥ कडकडिले पर्वत उडुगण उच्छेद ॥ रामीं दासदासा शक्तीचा शोध ॥ जयदेव जयदेव जयजय हनुमंता ॥ तुमचेनि प्रसादें न भिऊं कृतांता ॥ २ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा० ॥ अच्युतं केशवं रामनारायणं० ॥ राम राम सीताराम रामराम ॥ पुंडलिकव० ॥ पार्वती० ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ इति मारुति—जन्म समाप्तम् ॥

---

# कथा ४ थी.

## दत्तजन्म पूर्वरंग निरूपण.



श्रीमन्महागणाधिपतयेनमः ॥ इत्यादि नमन ॥ दत्तराज माउली दया कर दत्तराज मा० ॥ पुंडलीकव० ॥ पार्वतीप० ॥ सीताकांतस्म० ॥ श्रीगुरुदेवदत्त ॥ पद ॥ मत्तयौवनाभरें नटुं नको मुला ॥ लक्षयोनि हिंडतांचि नरतनु तुला ॥ ध्रु० ॥ आरसा करीं धरुनि रूप पाहसी ॥ श्रेष्ठ भाळिं कुरळ केश तैल माखिसी ॥ मौक्तिकें अमोल्य निजश्रवणीं घालसी ॥ स्वरुपवंत मीच एक दंभ मानिसी ॥ मत्तयौ० ॥ १ ॥ घट्ट लांब पीन सरळ बाहु चांगले ॥ राघवाचेनीं क्षणार्ध ते न लागले ॥ उंच वक्ष भव्य त्रिवळि दोंद लोंबलें ॥ अजागलस्तनापरी निकाम जाहले ॥ मत्तयौ० ॥२॥ चरणगती शरण हरी-मंदिरीं धरीं ॥ सर्व इंद्रियें मदर्थ देह हा करीं ॥ निरालस्य होउनि पूर्ण सत्व आंवरीं ॥ विनायकावरी कृपा करील श्रीहरी ॥ मत्तयौ० ॥३॥ भजन ॥ नारायणविधि अत्रिनाथ ॥ दत्तजनार्दन एकनाथ ॥पद॥ मत्तयौवनाभरें नटुं नको मुला ॥ लक्षयोनि हिंडतांचि नरतनू तुला ॥ ध्रु० ॥ आदौ प्रथमारंभीं जगदुद्धारार्थ भगवज्जन जनस्थिति अवलोकन करून दयाळू होत्साते भवसमुद्रापासून मुक्त होण्यासाठीं उपदेश करितात कीं, हे मानवा, पहा, लक्ष चौऱ्यांयशी योनि भ्रमण करून अंतीं नरतनु ही तुला प्राप्त झाली. तर षड्गुणैश्वर्यसंपन्न असा जो प्रभु नारायण त्याला विसरून या यौवनावस्थेंत तल्लीन होऊं नकोस. तूं तर देह हा शाश्वत मानून त्याचे सौख्यार्थ जीं काय आचरणें करितोस तीं कशीं म्हणशील तर ' आरसा करीं धरुनि रूप पाहसी ' हस्ताचे ठायीं आरसा धारण करून आपलें सर्व मुखादि अवलोकन करून मनामध्यें आनंद मानतोस. मस्तकाचे ठायीं जे काय कुरळ केश त्यांना सौगंधिक तैल लावतोस. कर्ण जे त्या कर्णांत बहुत मोलाचीं मौक्तिकें; चौकडे व भिगबाळी आदिकरून धारण करतोस, त्या कालीं असें मानितोस कीं, मी स्वरूपवान्, अत्यंत सुंदर आहें. या गर्वाच्या योगानें सर्वांमध्यें श्रेष्ठ असें मानितोस; परंतु असें मानूं नको. कारण, प्रभु जो नारायण त्या नारायणानें नरदेह कशासाठीं दिला ? तर अन्य देहामध्यें परमेश्वर-प्राप्तीचीं साधनें होणें नाहींत, म्हणून नरदेह नारायणांनीं दिला. तेव्हां असा नरदेह अति दुर्लभ तो तुला प्राप्त झाला आहे आणि तूं जर विषय-व्यापार करून त्यांतच रममाण होशील तर प्रभूंनीं नरदेह दिल्याचें सार्थक काय ? यासाठीं वामन पंडित म्हणतात—श्लोक ॥ स्वागतावृत्त ॥ ईश्वरें तुज दिली नरकाया ॥ साधनें करिसि तूं नरका या ॥ भोगिशी निशिदिनीं विषयांतें ॥ मानिसी न मनिं तूं विष यातें ॥ १ ॥ अर्थ—ईश्वरानें तुला नरकाया दिली असतां तूं भगवत्प्राप्तीचें साधन न करितां नरकसंबंधीं साधनें करितोस; कशीं म्हणशील तर सांगतों एक-प्रतिदिवशीं विषयांचें सेवन करितोस; परंतु असें मानीत नाहींस कीं, हें विष आहे. यापासून कांहींही आपणास सुख होणार नाहीं; यासाठीं कवि, जनांची प्रार्थना करून म्हणतात—मत्तयौवनाभरें० ॥ नरदेहास येऊन जर भगवत्प्राप्तीचें साधन न करशील तर काय होईल ? ॥श्लोक॥ ॥ शालिनीवृत्त ॥ आला आला प्राणि जन्मासि आला ॥ झाला झाला वाढला थोर झाला ॥

केला केला व्यापहि सर्व केला ॥ गेला गेला बापुडा व्यर्थ गेला ॥ २ ॥ **अर्थ**—प्राणी जन्मास आला म्हणजे मातापितरांस आनंद होतो; त्या आनंदास पारावार नाहीं ! ! मग पिता काय करितो. ॥पद॥ प्रसूत झाली बाळा ॥ वाजवी म्हणती थाळा ॥ ध्रु० ॥ दूध पाजुनी केला थोर ॥ झाला शिंदळ चहाड चोर । राजद्वारीं लाउनि दोर ॥ दरोडखोर दिवसांचा ॥ प्रसू० ॥ घरीं उपास करी माय ॥ परनारीतें द्रव्य जाय ॥ भांग पिउनि झुलत जाय ॥ झुलपें सोडी मोकळीं ॥ प्रसू० ॥ २ ॥ ऐसे दुर्व्यसनांचे ढंग परनारीचा करी संग ॥ कोटि पूजा होती भंग ॥ ब्रह्महत्या पदोपदीं ॥ प्र० ॥ ३ ॥ असा जन्मास आल्यापासून प्रभूला विसरून नाहीं नाहीं ते व्यापार करून नरदेहावसान झालें तर मग दुसरी हानि कोणची पाहिजे. यासारखी हानि नाहीं. तर कवि जनांची प्रार्थना करून म्हणतात.—पहा, या संसारांत सुख मानून निमग्न झालास तर या सुखापासून तुला दुःखांत घालवण्याकरितां तुझ्या पाठीस चोर लागला आहे. कोणता म्हणशील तर ऐक. ॥ **श्लोक** ॥ स्वागतावृत्त ॥ काळ चोर घिरट्या बहु घाली ॥ पामरा तुज कशी निज आली ॥ जाग तूं निजरुपीं लवलाहे ॥ जातसे वय अमोलिक पाहें ॥ ३ ॥ **अर्थ**—काळरूपी चोर तुझ्याभोंवतालीं घिरट्या घालीत आहे. तर तूं काय कर कीं, परमेश्वरस्वरूपांत जाग, कारण जो प्रभूनें देह दिला तो हा देह कसा व कोठून उत्पन्न झाला ? व या देहापासून काय करणें ? याचा विचार कर. जर न करशील तर हें वय अमूल्य असून तें फुकट गेलें म्हणजे नरदेहाचें सार्थक होणार नाहीं; कवि म्हणतात॥ पद॥ निर्लज्जा साधिलें काज काय रे ॥ गर्भवासें शिणविली माय रे ॥ ध्रु० ॥ पीयूषाचे ताटी जाणा॥कांजीं ओगळोनी प्राण॥रक्षणासी केली रससोय रे॥निर्ल०॥१॥ मानवदेहाचें भाग्य ॥ कैवल्यपदासी योग्य ॥ धिक्कारिलें केंवी तृणप्राय रे ॥ निर्ल० ॥२॥ इंद्रिया देउनी लळे ॥ कासया झांकिसी डोळे ॥ काळवेळ साहिली नवजाय रे॥ निर्ल० ॥ ॥ ३ ॥ कामाची आंदणी दासी ॥ केवळ क्रोधाची ती राशी॥मोहें नडिलासी हाय हाय रे॥ निर्ल० ॥४॥ निजानंदें राहें रे सार हा उपाय रे ॥ प्रेमरंगीं धरीं श्रीगुरुपाय रे ॥ निर्ल० ॥५॥ यासाठीं हे प्राण्या, विषयव्यापाराचा त्याग करून भगवान जो अनंत ब्रह्मांडाधीश त्याचें सेवन कर. म्हणजे तुला नारायण जन्ममरणापासून मुक्त करतील. " घट्ट लांब पीन सरळ बाहु चांगले " तूं म्हणशील मी शक्तिमान् आहें, माझे दंड कसे सुशोभित दिसतात, असें वाटत असेल;परंतु सुशोभित केव्हां दिसतील ? ज्या कालीं या हस्तेंकरून प्रभु नारायण जो त्याचें पूजन होईल त्या कालीं हस्ताचें सार्थक;नाहींपेक्षां जसे कांहीं बकरीच्या गळ्याजवळ दोन सडांसारखे दिसतात परंतु त्यांतून दूध निघत नाहीं; तद्वत हे हस्त असून निर्फळ होत. तसेच चरण जे या चरणांनीं प्रभूच्या दर्शनाकडे जाण्याची इच्छा करावी. ती न करून रात्रीचे ठायीं विषयव्यापाराकडे योजले तर उपयोग काय ! तर हीं इंद्रियें भगवंताकडे योजित केलीं असतां प्रभूंनीं नरदेह दिल्याचें सार्थक होईल. नाहींपेक्षां होणार नाहीं. म्हणून कवि म्हणतात. हे प्राण्या, तूं यौवनाच्या भरेंकरून नटूं नको, कवि म्हणतात—" मत्तयौवन भरें " तूं म्हणशील तारुण्य गेल्यावर वृद्धपणीं भगवद्भजन करतां येईल; तर याविषयीं कवि म्हणतात कीं,—**कवित** ॥ पीतेथे दूध तब सोतेथे पाटीमों ॥ खेलने लगे अंगनमों तब खातेथे बाटीमो ॥ जब आये जानीमों तब रहतेथे आटीमो ॥ कहने लगे बाबा तब दीन आये साठीमो ॥हलने लगी मान तब सरा चित्त काठीमो ॥ झि-

रपन लगी अखियां तब कफ दाटे घाटीमों ॥ गीरगये दांत जब देह चला मट्टीमों ॥ अशी अवस्था झाल्यावर तूं ईश्वरभजन केव्हां करणार ? शंकराचार्य म्हणतात, **श्लोक** ॥ बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्तः ॥ वृद्धस्तावच्चिंतामग्नः परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ ॥ १ ॥ **अर्थ**—जोंपर्यंत मनुष्य बाल्यवयांत असतो तोंपर्यंत विटीदांडू इत्यादि क्रीडा करण्यांत सक्त असतो. तेथून तारुण्य प्राप्त झालें म्हणजे तरुण स्त्रियांचे ठायीं प्रीति धारण करितो. वार्धक्य प्राप्त झाल्यावर माझ्या स्त्रीपुत्रादिकांचें कसें होईल, अशा अनेक चिंतांमध्यें निमग्न असतो. याप्रमाणें तिन्ही अवस्थांत कोणीही पुरुष परब्रह्माचे ठिकाणीं संलग्न होत नाहीं. व्यर्थ अन्य व्यापारांतच आयुष्याचा व्यय होतो. याविषयीं भर्तृहरी म्हणतात. ॥ **श्लोक** ॥ आयुर्वर्षशतं नृणां परिमितं रात्रौ तदर्धं गतं, तस्यार्धस्य परस्य चार्धमपरं बालत्ववृद्धत्वयोः ॥ शेषं व्याधिवियोगदुःखसहितं सेवादिभिर्नीयते, जीवे वारितरंग बुदबुदचले सौख्यं कुतः प्राणिनाम् ॥ १ ॥ **अर्थ**—बाबांनो, हा नरजन्म कांहीं तरी मोठ्या पुण्यसंचयानें तुम्हाला प्राप्त झाला आहे. परंतु त्यापासून वास्तविक आपलें जें साधावयाचें तें न साधतां व्यर्थ जात आहे, याचा विचार करा. ईश्वरानें मनुष्यास शंभर वर्षें आयुष्य नेमलें आहे. त्यांत अर्धें म्हणजे पन्नास वर्षें निद्रेंत जातात. मग राहिलेलें अर्धें—पन्नासांतून अर्धें म्हणजे पंचवीस बालत्व वृद्धत्व यांत जातें. बाकी राहिलेला आयुष्याचा चतुर्थांश हा अनेक व्याधि, स्त्रीपुत्रादिकांचा वियोग इत्यादि दुःखानें युक्त असून कोणाची सेवा ( चाकरी ) वगैरे प्रपंचोपजीविकेकरितां धनार्जन करण्यांत नाहींसा होतो. याप्रमाणें सर्व आयुष्याचा व्यय होतो. तस्मात् कवि म्हणतात. पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें चंचल जें जीवित तें क्षणांत केव्हां नाहींसें होईल याचा भरंवसा नाहीं. मग या प्राण्याला सुख कोठून लागणार ? तात्पर्य, असें हें आयुष्य क्षणिक आहे. मग यांतील दोन दिवस राहणारें जें तारुण्य त्याचा अंतःकरणांत ताठा धरून जें आपलें वास्तविक कर्तव्य त्याला विसरणें फार अयोग्य आहे. कां कीं, ही नरतनु वारंवार मिळत नाहीं. तर तूं यौवनांत नटून प्रमत्त होऊं नकोस. म्हणून कवि म्हणतात. मत्तयौवनाभरें० ॥ पुंडलीक० ॥ पार्वती० ॥ सीताकांत० ॥ आणखी यौवनाचा गर्व जर तूं धारण केलास तर तुलाच संकट प्राप्त होईल. इतकेंच नाहीं तर तुझे इतर जे कोणी स्वजन त्यांसही दुःख होईल. पहा, ज्या कालीं पार्वती, सावित्री व लक्ष्मी यांस जेव्हां यौवनाचा व पातिव्रत्याचा गर्व झाला, तेव्हां साक्षात् जे प्रभु विष्णू, ब्रह्मदेव आणि शंकर यांना तो गर्व सहन न होऊन अवतार धरण्याचें संकट सोसावें लागलें. याविषयीं कवि दत्तजन्माख्यान वर्णन करितात.

---

# अथ दत्तात्रेयजन्म प्रारंभः



श्रीगणेशाय नमः ॥ **दिंडी** ॥ एक दिवशीं नारद सत्यलोकीं ॥ जातां माता बहु प्रीतिनें विलोकी ॥ म्हणे फिरसी नारदा तिहीं लोकीं ॥ आम्हा ऐशा पतिव्रता पाहिल्या कीं ॥ १ ॥ मुनी बोले कासया हे अहंता ॥ मृत्युलोकीं पाहिली अत्रिकांता ॥ धन्य धन्य अनसूया पति-

तिव्रता ॥ तुम्हीं न सरा पदनखें नीरखितां ॥२॥ आर्या ॥ तत्पातिव्रत्य किती वर्णूं नाहींच तप तसें कोणा ॥ घडलें भयें रविहि यद्देहाच्या त्यजूनि तपतसे कोणां ॥ ३ ॥ मानवंती जीतें सुर किन्नर गंधर्व सिद्ध मानवती ॥ मानवती सकल सतीप्रवरा नाचि यत्समा रमा नवंती ॥ ४ ॥ ओंवी ॥ सावित्री म्हणे नारदातें ॥ कोण उपाय करावा तियेतें॥जेणें भंगोनी गर्वातें ॥ शरण आम्हांतें येईल ॥ ५ ॥ प्रार्थुनियां चतुरानना ॥ पाठवावें अत्रि—भुवना ॥ नग्न मागावें भोजना ॥ तेणें गर्व भंगेल ॥ ६ ॥ सावित्रीस सांगुनी उपाय॥नारद स्वयें वैकुंठा जाय ॥ देखोनि लक्ष्मी संतुष्ट होय ॥ मग पुजी आदरें ॥ ७ ॥ दिंडी ॥ बरें येतों हो म्हणूनि मुनी नेटें ॥ जाय वैकुंठीं लक्ष्मीस भेटे ॥ फार सत्कारुनि रमा म्हणे कोठें ॥ तुम्हा ऐसा कधिं सिद्ध आम्हां भेटे ॥ ८ ॥ तुम्हां फिरतां थोडकी ब्रह्मसृष्टी ॥ नवल सांगा देखिलें काय दृष्टीं ॥ म्हणे नारद ऐकतां व्हाल कष्टी ॥ पाहिलें तें मज न बोलवे ओष्ठीं ॥ छंद ॥ बोलली रमा सिद्ध नारदा ॥ सांग गा मला ऐकूं एकदां ॥ ऐकुनी तदा बोलिला मुनी ॥ धन्य या जगीं अत्रिकामिनी ॥ १० ॥ आर्या ॥ नोहे विमुख अतिथिला स्वप्नीं वाढी यथेच्छ जेवाया ॥ तेच सती पतिसेवेवांचुनि पळही न सारिजे वांया ॥ ११ ॥दिंडी॥ शैलकन्या सावित्रीही न पावे ॥ जिच्या उपमेला तीस नित्य गावें ॥ भूमि राहे तीच्याचि आश्रयानें ॥ पूत जग हें होतसे तिच्या गानें ॥ १२ ॥ आर्या ॥ नाहीं त्रिजगामाजीं दुसरें ऐसें पतिव्रता रत्न ॥ टाकुनियां तनुलोभा पतिसेवेचा करी महा यत्न ॥ १३ ॥ ओंवी ॥ म्हणे धन्य अनसूया पतिव्रता ॥ तुम्हां तिघींहूनी सामर्थ्यसत्ता ॥ तुमचे पुतळे करोनी तत्वतां ॥ तिनें तोडरीं बांधिले ॥ १४ ॥ छंद ॥ शुद्ध कामदा ॥ करुनि तुमचे पुतळे तिणें ॥ चरणिं बांधिले कीं सती म्हणे ॥ न गणिते तुम्हां गर्व जाहला ॥ विषम वाटलें पाहतां मला ॥ १५ ॥ आर्या ॥ झाला अग्निहि शीतळ यच्चित्ता अनुसरोनि पवन वहे ॥ तेव्हां वदे विधिसुता त्वां मज कथिलेंस काय नव नव हें ॥१६॥ छंद ॥ खोंचली रमा अंतरीं म्हणे ॥ कांहीं नारदा युक्ति सांगणें ॥ बोलिला मुनी ऐक लक्ष्मी ॥ योजितों मनीं युक्ति लक्ष मी ॥१७॥ युक्ति सूचली सांगतों तुम्हां ॥ प्रार्थुनी पती अत्रि—आश्रमा ॥ विप्रवेष घेऊनि धाडिजे ॥ नग्न भोजना तीस मागिजे ॥ १८ ॥ ओंवी ॥ सांगोनि ऐसा वृत्तांत ॥ कैलासा जाय ब्रह्मसुत ॥ पार्वती तयासी पुसत ॥ काय अपूर्व देखिलें ॥ १९ ॥ पार्वतीसि विधिकुमार ॥ सांगे तोचि समाचार ॥ म्हणे अनुसूया सती साचार ॥ जगीं प्रवर अवलोकिली ॥ २० ॥ ऐकोनि नारदाची वाणी ॥ गदगदां हांसे भवानी ॥ म्हणे आम्हांपरती त्रिभुवनीं ॥ विशेष कोणी असेना ॥२१॥ तुम्हां तिघींचे पुतळे करूनी ॥ बांधिले असती वामचरणीं ॥असंख्य सामर्थ्य त्रिभुवनीं ॥ तत्तुल्य कोणी दिसेना ॥२२॥ पार्वती झाली चिंताग्रस्त ॥ नारदातें उपाय पुसत ॥ तो म्हणे प्रार्थावा विश्वनाथ ॥ तो तेथवरी जाईल ॥२३॥ आर्या ॥ कैलासा मुनि जाउनि गिरिजेप्रति करुनि हाचि उपदेश ॥ जाय मुनी स्वच्छंदे स्वरूपरत फिरत देश उप-देश ॥२५॥ उद्विग्न बहुत झाल्या चतुराननहरिहरांचिया प्रमदा ॥ म्हणती नारद-शिक्षित मंत्र करुनि उतरूं अत्रिविप्र-मदा ॥ २५ ॥ ओंवी ॥ऐसें नारद सांगोनि गेला ॥ मग तिघीं करोनि निश्चयाला ॥ हृदयीं धरोनि नारदोक्तीला ॥ रुसत्या झाल्या तात्काळ ॥२६॥

---

मान देतात. २ सर्व स्थळीं जन्मास पावणारी. ३ नव्वद.

झूला ॥ अये घरमो जब कांत ॥ करत सबही आकांत ॥ रोस होत नहीं शांत ॥ कोईभी बात ना करे ॥२७॥ **ओंवी** ॥ देखोनियां चतुर्मुखाला ॥ न बोलेचि सावित्री बाला ॥ चित्तीं धरूनी कोपाला ॥ परती होय ते काळीं ॥२८॥ **पद** ॥ आतां सर्व सुखा मुकलों ॥ ध्रु० ॥ प्रतिदिनिं येतां मज नमिसी ॥ आजचि बोलसि कां न मशीं ॥ सांगें काय तुझें चुकलों ॥ आतां० ॥ १ ॥ त्वन्मुख पूर्ण सुधाकरे हा ॥ याच्या सोसूं किति विरहा ॥ विरहें कैरवसा सुकलों ॥ आतां स० ॥२॥ तुज हा रोष कसा गमला ॥ याचें कारण सांग मला ॥ विनवुनि तुज मी बहु थकलों ॥ आतां स० ॥ ३ ॥ तूं मासि बोल वामनयने ॥ माझें सर्व सुखीं वय ने ॥ तव प्रेमें आजवर टिकलों ॥ आतां सर्व० ॥ ४ ॥ २९ ॥ **पद** ॥ कां न मशीं तूं बोलसि कमले ॥ काय तुझ्या मनीं गमलें गे ॥ ध्रु० ॥ मन्मानस षट्चैरणसरोजिनि ॥ चित्त तुझें कां भ्रमलें गे ॥ काय तुझें मी चुकलों सुंदरी ॥ शीघ्र कथीं मज विमले गे ॥ कां न मशीं० ॥१॥ म्लान तुझें मुख पाहुनि माझें ॥ मृदु मन फारच श्रमलें गे ॥ त्रैणापरि हें बोलें त्या हरिपदिं वामन–मन रमलें गे ॥ का न मशीं० ॥ २ ॥ ३० ॥ **केका** ॥ भवानि मज सांग कीं तुज आला कसा कोप हा ॥ तुझ्याविण सुदीन मी सुदति जाहलों गे पहा ॥ तुला कवण बोलला कठिण सांग तें तूर्ण गे ॥ करीन तव इष्ट जें जरि असाध्यही पूर्ण गे ॥३१॥ ॥ **आर्या** ॥ सावित्री ब्रह्मयाप्रति विनवि शिवाप्रति उमा हरिप्रति मा ॥ म्हणती मिरवे बांधुनि अनुसूया स्वपदिं आमुच्या प्रतिमा ॥३२॥ **अंजनीगीत** ॥ कीर्तन समयीं नारदवाणी ॥ अनुसूयेतें बहुतचि वाणी ॥ कीं ते सौभाग्याची खाणी ॥ सर्वसती-रत्न ॥१॥ एका श्रेष्ठत्वें वंदिलें ॥ दुज्या सहजचि निंदिलें ॥ यास्तव आम्हां त्यानें दिधलें ॥ असतीपण साच ॥ २ ॥ ३३ ॥ **आर्या** ॥ मान्य विनंती करितां जा धरुनि क्षिप्र विप्रवेष करा ॥ जोडुनि म्हणति छळाया आज मुनि-स्त्रीगृहीं प्रवेश करा ॥३४॥ तद्गेहीं तुह्मि जाउनि भोजन तीप्रतिच नग्न मागावें ॥ हेंचि अभीप्सित आम्हां भगवन् भक्तौघहृद्दशा पावे ॥ ३५ ॥ **छंद** ॥ वाढिं भोजना नग्न होउनी ॥ मागतां असें ब्रीद सोडुनी ॥ टाकितां अम्हां सौख्य तेधवां ॥ प्रार्थिती तिघी ये रितीं धवां ॥ ३६ ॥ **अभंग** ॥ आतांच जाऊनी घरास सतीच्या ॥ सत्वा नाश तिच्या करा वेगीं ॥१॥ तरीच आमुचा शांत होय रोष ॥ देऊनियां भाष जावें वेगीं ॥ २ ॥ ३७ ॥ **आर्या** ॥ सत्व हराया मग ते स्त्रीवचनें क्रोध सेवुनी सजले ॥ दृढबंध पर्वताला फोडाया जेविं बंधकांसें जलें ॥ ३८ ॥ **साकी** ॥ औरतोका बचन सुने विधि शंकर और गोपाला ॥ धरे फकेरी भेस छांड दे हरि कौस्तुभ वनमाला ॥ १ ॥ माई भिच्छा माई भिच्छा रस्तोरस्त पुकारे ॥ अत्रिमुनीका आश्रम देखत तीनोभी व्हां ठैरे ॥ २ ॥३९॥ **ओंवी** ॥ मग ते पवनवेगें ते अवसरीं ॥ तिघे प्रवेशले आश्रमाभीतरीं ॥ वहनें ठेवोनियां दूरी ॥ माध्यान्हकाळीं पातले ॥ ४० ॥ **आर्या** ॥ जरि फसवाया आले सकपट सुर वृत्ति धरुनि भिक्षूचि ॥ तरि ती पूजी त्यां रुचि मित्रामित्रीं समान इक्षूची ॥ ४१ ॥ **ओंवी** ॥ ते म्हणती अनुसूयेसी ॥ तूं पतिव्रता आपणा म्हणविशी ॥ तरी मागतों तें दे आम्हांसी ॥ म्हणोनि भाकेसी गोंविली ॥ ४२ ॥ **आर्या** ॥ वदतां विकळ भुकेनें आम्ही आलों तुझ्याचि ओकास ॥ अर्थीप्सिता न पुरविल सुरभीची काय म्हणूनि ओकास ॥ ४३ ॥ सिद्ध असे

---

१ चंद्र. २ चंद्रविकासि कमळ. ३ भ्रमर. ४ प्रतिबंधकास. ५ गृहास.

अत्र तुह्मीं जा स्नानातें करूनि सत्वर या ॥ बोले तीं तों तेही करिति हराया तदीय सत्व रया ॥४४॥ **झूला** ॥ माई किया अस्नान ॥ भया पुरण सब ध्यान ॥ छुधा बिकल करत प्रान ॥ भिच्छादान तुम दियो ॥ ४५ ॥ **आर्या** ॥ तितकेंहि सिद्ध करितां सत्व तिचें तें करावया भग्न ॥ वदले तरि जेवुं आह्मीं जरि तूं होऊनि वाढिसी नग्न ॥ ४६ ॥ **झूला** ॥ दूर छांडो तुम वसन ॥ जबहि पायोगे अशन ॥ नहिंतो ह्यांका अब असन ॥ और घरमों धरावू ॥ ४७ ॥ **साकी** ॥ अथिति बचन सुने सति अनुसूया दिलमों करत अंदेसा ॥ उस बम्मनका कठिन मनोरथ पूरन करूं मै कैसा ॥ ४८ ॥ **केका** ॥ द्विजोक्त परिसोनियां स्मरुनि मानसीं तेधवां ॥ स्वकांत-पदतीर्थ घे करिं करोनियां तेधवां ॥ तयांवरिहि सिंचितां शिशु लहान होती तिघे ॥ क्षुधा विकल होउनी रडति त्यांस अंकीं ति घे ॥ ४९ ॥ **ओंवी** ॥ ठेवी तिघांचे मस्तकीं कर ॥ तव तिघे तेही झाले कुमार ॥ मग नग्न होउनी सत्वर ॥ पाजी स्तन तयांतें ॥ ५० ॥ करूनि तयांची उदरतृप्ति ॥ वसन नेसली शीघ्रगती ॥ मग घालोनि पालखांप्रति ॥ पैंयेदती ते जाहली ॥ ५१ ॥ **पद** ॥ ब्रह्मा, विष्णु, आणि हर तिघे झाले कुमर ॥ बाळ शब्दें रडतां ऐकूनि कळवळली ती सुकुमार ॥ ध्रु० ॥ १ ॥ नग्न होउनी आली मुखीं त्यांच्या स्तन घाली ॥ मुख कुर्वाळुनि म्हणे श्रमलां क्षुधेनें व्याकुळता झाली॥२॥ लांबवुनी पाळण्यामाजी घाली तिघांजणा ॥ निजवी जैसा कौसल्या ते परमप्रीतीनें रघुराणा ॥ ३ ॥ ५२ ॥ **पाळणा** ॥ जोजोरे निज बाळा ऐसें बोले अनुसूया ॥ जिचे मानसीं मुळींच नाहीं तिळतुल्यही असूया ॥ ध्रु० ॥ उद्भिज स्वेदज अंडज जारज ज्या चारी खाणी ॥ जल-चर भूचर खेचर इत्यादिक नाना योनी ॥ सृजतां बहु श्रमलासी बाळा तूं तंव रजोगुणी ॥ बुद्धिमान तूं जग बुद्धीचा अधिष्ठाता असूनी ॥ जोजो० ॥१॥ पालन या विश्वाचें वसनाशन जिवनें करिशी ॥ निर्गुण नित्य निरामय परि तूं सगुणरूप होसी ॥ खळ दुष्टांच्या हनना नाना अवतार धरिसी ॥ अनन्य शरणागत झाले त्या भक्तां उद्धरिसी ॥ जोजो० ॥ २ ॥ कल्पांतीं या चराचराच्या करितां संहारा ॥ श्रमलासी निज बाळा पंचानना उमावरा ॥ नाग भूषणा गजचर्मांबरधरा दिगंबरा ॥ राघवचरितें गिरिजेप्रति सांगसि जगदुद्धारा ॥ जोजो० ॥ ३ ॥ ५३ ॥ **दिंडी** ॥ कुश समिधा घेऊनि मुनी आला ॥ म्हणे काय हा खेळ मांडियेला ॥ बाळस्वभाव नाहीं तुझा गेला ॥ सर्व वृत्तांत तिणें निवेदीला ॥५४॥**छंद**॥ आणुनी पुढें बाळ ठेविले ॥ पाहुनी मुनी फार हर्षले ॥धन्य हो म्हणे भाग्य हें तुझें ॥ पुत्र जाहले तीन देव जे ॥ ५५ ॥ बाळ घेउनी नाचतो मुनी ॥ हुंगि मस्तकीं गाल चुंबुनी ॥ दृष्टि होय या साजिरेपणा ॥ नेइं आंत गे दिव्यलक्षणा ॥ ५६ ॥ **ओंवी** ॥ ऐसे गेले बहु दिवस ॥ परि मार्ग नाहीं जावयास ॥ न सुटे बाळपणाचा वेष ॥ सामर्थ्यें विशेष अनुसूया ॥ ५७ ॥ नारद सांगे तिघींप्रती ॥ काय निश्चिंत बैसल्याती ॥ बालकें करूनी तिघांप्रती ॥ अनुसूया सती खेळवीत ॥५८॥ **साकी** ॥ कहत मुनीसर अनुसूयाके घरमों कंथ तुमारे ॥ सत हरनकू गये उने तों सबही शिशु कर डारे ॥ ५९ ॥ **ओंवी** ॥ तरी आम्हींच आमुचे पती ॥ सोडवूं आपले सामर्थ्यस्थितीं ॥ अनुसूया ते बापुडी किती ॥ कायशी कीर्ति आम्हां पुढें ॥ ६० ॥ ऐसें बोलोनि अभिमानें ॥ तिघी निघाल्या तत्क्षणें ॥ लगबगां धांविन्नल्या

---

१ हालविती.

जाणें ॥ अनुसूया-भवनीं पातल्या ॥ ६१ ॥ झूला ॥ सुनो नारदकी बात ॥ गया तीनोबी सात ॥ जहां थाये निजकांत ॥ कहत हात जोरके ॥ ६२ ॥ अंजनीगीत ॥ तंव ती पातली सत्वर ॥ केले तिघींसी नमस्कार ॥ काय आज्ञा पुसे सत्वर ॥बहु मार्ग्ये आलां॥६३॥ तिघी म्हणती आमुचे पति ॥ आणून देई शीघ्रगती ॥ येरी बाळकांच्या मूर्ती ॥ आणूनियां ठेवी ॥ ६४ ॥ ओंवी ॥ तंव सारखे बाळ तिन्ही ॥ बोलों नेणतीं वचनीं ॥ तिघी चकित झाल्या मनीं ॥ परि कोणी नयनीं लक्षेना ॥ ६५ ॥ सर्वेही सामर्थ्य वेंचलें ॥ अभिमानें धैर्य गेलें ॥ मग लोटांगण घातलें ॥ चरण वंदिले तियेचे ॥ ६६ ॥ दिंडी ॥ म्हणती देवी दे आमुच्या वरांतें ॥ सती बोले घ्या ओळखुनी यांतें ॥ आम्ही नेणों दे तूंच अशा बोलें ॥कर-स्पर्शें सुर तिनें प्रगट केले ॥ ६७ ॥ ओंवी ॥ जैसे होते आमुचे पती ॥ तैसे करुनि द्या निश्चितीं ॥ धन्य धन्य तुमची कीर्ति ॥ पूर्ण सती पतिव्रता ॥ ६८ ॥ ऐकोनि शक्तित्रयाची वचनें ॥ कृपायुक्त अनुसूयेनें ॥ तिघांचे मस्तकीं स्पर्शितां करानें ॥पूर्वचिन्हें त्या आलीं॥६९॥ आर्या ॥ आलों होतों ईच्या तेजा कपटें करूनि पळवाया ॥ परि केली इणें आमुची सुर-तो[1] हो लागतां न पळ वांया ॥ ७० ॥ झालों प्रसन्न आतां दंपति इच्छित वरास हो मागा ॥ शाश्वत अस्मच्चरिता स्वस्थ करुनियां अविघ्न होमा गा ॥७१॥ बोले अत्रिमुनी तों सुत मज बरवा असो तुम्हांसम जो ॥ होचि मनांतलि माझ्या इच्छा ऐशी असें तुम्हां समजो ॥७२॥ बोलती सरवर न दिसे कवणा आम्हांसमान थोरपण ॥ यास्तव आम्हींच तुझे होऊं आत्मज तिघे स्वयें आपण ॥ ७३ ॥ दिंडी ॥ असो देउनि यापरी त्या वरातें ॥ पुसुनि सत्कारुनि देव मुनिवराते ॥ जाति सकळहि सकलत्र निजपदातें ॥ नमुनि मुगुटीं अनुसूया मृदुपदातें ॥ ७४ ॥ आर्या ॥ मग होय विष्णु अंशें दत्त तसा ब्रह्मदेव तो चंद्र ॥ दुर्वासामुनि झाला ज्याच्या अंशें करूनि तो रुद्र ॥ ७५ ॥ ओंवी ॥ मग देवत्रयांची मूर्ति ॥ करकमळी झाली निश्चिती ॥ दत्तात्रेय ऐशी ख्याती ॥ तिहीं लोकीं विशेष ॥ ७६ ॥ आर्या ॥ मार्गीं[2] प्रदोष-काळीं राकी[3]मृगशीर्षयुक्त बुधवारीं ॥ अत्रिगृहीं अवतरुनी जाला प्रगट स्वभक्तकैवारी ॥७७॥ नाहाणा ॥ न्हाणी न्हाणी दत्तराया ॥ बहुत कौतुकें अत्रिजाया ॥ ध्रु० ॥ घेउनि अंकीं चक्रपाणी ॥ घालित सुरभी उष्ण पाणी ॥ दत्तप्रभुवरी निजपाणी ॥ फिरवीत अनुसूया न्हाणी ॥ न्हाणी० ॥ १ ॥ लावुनी यत्स्वरूपीं स्नेहा ॥ मुकती भक्तराज मोहा ॥ अनुसूयेनें शिशु तो हा ॥ घालुनी माखियला स्नेहा ॥ न्हाणी० ॥ २ ॥ क्षम जो त्रिभुवन निर्माया॥न धरी जननादिक माया ॥ निजवुनि पदीं त्या निर्माया ॥ हरि मळ अनुसूया माया ॥ न्हाणी ॥३॥ यद्गुण गणन नव्हे अंकीं ॥ घेउनी दत्तराज अंकीं ॥ त्याचे श्रवण माय फुंकी ॥ निजवी मणिमय पर्यंकीं ॥ न्हाणी०॥४॥ जो मखभोक्ता घे हविला ॥ भक्तजनीं हृदयीं राहविला ॥ तो अनु-सूयें नाहविला ॥ वामन तत्पदीं मोहविला ॥ न्हाणी० ॥५॥ ७८॥ पाळणा ॥ जोजोजोरे सुकुमारा ॥ दत्तात्रेय अवतारा ॥ निद्रा करीं आतां उदारा ॥ अद्भुत वर दातारा ॥ जोजो जो० ॥ ध्रु० ॥ कमलासन विष्णु त्रिपुरारी ॥ अत्रिमुनीचे घरीं ॥ सत्त्व हरू आले नवलपरी॥ भ्रम दवडिला दूरी ॥ बाळाजो० ॥ १ ॥ प्रसन्न त्रयमूर्ती होउनी ॥ पुत्रत्वा पावुनी ॥ हर्ष जाहलासे त्रिभुवनीं ॥ दाटे ऋषिचे सदनीं ॥ जोजोजो०॥२॥ पालख बांधिला सायासीं ॥

---

१ देवपणा. २ मार्गशीर्ष. ३ पौर्णिमा.

निर्गुण ऋषिचे वंशीं ॥ पुत्र जन्मला अविनाशी ॥ अनुसूयेचे कुशीं ॥ जोजोजो० ॥ ३ ॥ षट्दश नामांसी आधार ॥ दत्तात्रेय अवतार ॥ कृष्णदासासी सुख थोर ॥ आनंद होतो फार ॥ जोजो० ॥ ४ ॥ ७९ ॥ तेव्हां एवढेंच सांगावयाचें कीं, यौवनदशा अतिक्रमून जाणें हें फार दुर्घट आहे, आणि तिची बाधा न होणें हें फार श्रेयस्कर आहे. तेव्हां संसार-समुद्र तरून जाण्याचा उपाय पाहूं गेलें असतां ज्याच्या कृपेनें तनु प्राप्त झाली त्याला अनन्यभावें शरण गेल्यानें जन्माचें सार्थक होईल, असा भाव मनांत आणून कवि म्हणतात, मत्तयौवनाभरें नटुं नको मुला०॥ नंतर, हेंचि दान देगा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥१॥ गुण गाईन आवडी ॥ हीच माझी सर्व जोडी ॥२॥ नलगे मुक्ति धनसंपदा ॥ संतसंग दे गा सदा ॥३॥ तुका म्हणे गर्भवासीं ॥ सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥ आरती दत्तात्रेयाची ॥ त्रिगुण त्रयमूर्ती दत्त हा जाणा ॥ त्रिगुणी अवतार त्रैलोक्य राणा ॥ नेतिनेति शब्दें नये अनुमाना ॥ अखंड समाधी ध्यान मुनिजनां ॥ जयदेव जयदेव जय श्रीगुरुदत्ता ॥ आरती ओंवाळूं हरि संसारव्यथा ॥ १ ॥ ध्रु० ॥ सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त ॥ अभाग्यासी कैंची कळे ही मात ॥ पराही परतली तेथें कैंचा हेत ॥ जन्ममरणाचाही पुरलासे अंत ॥ २ ॥ दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान ॥ हरपलें मन झालें उन्मन ॥ मीतूंपण यासी झाली बोळवण ॥ एका जनार्दनीं श्रीदत्तध्यान ॥ ३ ॥ जयदेव जयदेव जय० ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वा नृसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ अच्युतं केशवं० ॥ भजन ॥ दत्तराजमाउली दया कर दत्तराजमाउली ॥ पुंडलीकव०॥ पार्वतीपतेहर०॥ सीताकांतस्मरण जय०॥ श्रीदत्तात्रेयमहाराजकी जय । इति दत्तात्रेयाख्यानं समाप्तम् ॥

---

## कथा ५ वी.

# परशुरामजन्म पूर्वरंग निरूपण.



श्रीमन्महागणाधिपतये नमः ॥ अविरलमदजलनिवहं० ॥ इत्यादिनमनम् ॥ रामचंद्र हरि सांवळ्या रामचंद्र हरि ॥ इति भजनम् ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर-महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ पद ॥ संत दयाळु कसे हो ॥ राजा रंक जया सरिसे हो ॥ ध्रु० ॥ देउनि भेटी तोडिती माया ॥ नेऊनि दाविती निजपद ठाया ॥ संत द० ॥१॥ श्रवणीं पाजुनि अमृतवाणी ॥ नयनीं दाविती चिन्मयखाणी ॥ संत द० ॥२॥ शिवरामाचें अभिनव लेणें ॥ लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ संत० ॥३॥ पुंडलीकव०॥पार्वती०॥ सीताकांत० ॥ ध्रुवपद म्हणावें ॥ जानकीजीवनस्मरण० ॥ आदौ कीर्तनारंभीं ब्रह्मवित्कुल-शिखामणि शिवरामस्वामी हे जीवांनीं आपल्या उद्धारासाठीं सत्संगति करावी, या उद्देशानें साधूंच्या दयाळूपणाचें व समदृष्टीचें वर्णन करितात. ॥ संत दयाळू कसे०॥ साधु हे किती दयळू आहेत कीं ज्यांना राजा व रंक हे दोन्ही सारखे आहेत. अर्थात् भूतदया व सर्व ठिकाणीं समत्व हीं साधूंचीं मुख्य लक्षणें होत. याविषयीं प्रसंगरत्नावलीकार म्हणतात.

॥ श्लोक ॥ ये दीनेषु दयालवः स्पृषति यानल्पोति न श्रीमदो, व्यग्रा ये च परोपकारकरणे हृष्यंति ये याचिताः ॥ स्वस्थाः संति च यौवनोन्मदमहाव्याधिप्रकोपेपि ये तैः स्तंभैरिव सुस्थिरैः किल मरक्रांता धरा धार्यते ॥ १ ॥ अर्थ—ये दीनेषु दयालवः ह्मणजे जे दीनाविषयीं दयालु असतात, ज्यांना लक्ष्मीचा मद अल्पही स्पर्ष करीत नाहीं, नेहमीं परोपकार करण्याविषयीं जे उद्युक्त असतात, कोणीं काहीं याच्ञा केली तर ज्यांना मोठा आनंद वाटतो आणि तारुण्यमदरूप महाव्याधीचा प्रकोप झाला असतांही ज्यांच्या स्वस्थतेस बाध येत नाहीं, ते सत्पुरुष भारानें पीडित झालेल्या पृथ्वीस सुस्थिर अशा स्तंभाप्रमाणें धारण करितात. यांत प्रथमच भूतदया सांगितली आहे. दयेविषयीं श्रीज्ञानेश्वर म्हणतात—ओंवी ॥ जीवाचेनि नांवें ॥ तृणातेंही नोलांडावें ॥ मग न लेखितां जावें ॥ हेकें गोठी ॥ १ ॥ ऐशी जयाची चाली ॥ कृपा फुलीं फळा आली ॥ देखसी जियाली ॥ दया वाचे ॥ २ ॥ पुढां स्नेह पाझरे ॥ मागां चालती अक्षरें ॥ शब्द पाठीं अवतरे ॥ कृपा आधीं ॥ ३ ॥ अर्थ—जीवाचेनि० ॥ साधु हे जीवदृष्टीनें तृणाचेंही उल्लंघन करीत नाहींत. मग कोणीं जीव मार्गांत भेटल्यास त्याला न पाहतां अवज्ञा करून जाणें ही गोष्ट कधींच घडावयाची नाहीं. १ अशी चालतांना ज्याची दया उघड प्रफुल्लित दिसते, वाणींत तर जसें कांहीं दयेनें जन्मच घेतलें आहे २ वाणींतून अक्षरें निघण्यापूर्वीं स्नेहच पाझरतो, ह्मणजे ऐकणारांस त्यांची कृपा आधीं प्रत्यक्ष दिसते, मग शब्द ऐकूं येतात. आतां ज्यांना राजा आणि रंक सरिसे (सारखे), अर्थात् समता हें एक साधूनें लक्षण होय. समता ही दोन प्रकारची आहे त्यांत एक प्रकारची समता श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितली आहे. ॥ श्लोक ॥ भगवद्गीता ॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनी ॥ शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः॥ अर्थ विद्वान् आणि नम्र अशा ब्राह्मणाचे ठिकाणीं, बैल, हत्ती व श्वान यांवर आणि चांडाळावरही ज्ञानी पुरुषाची समदृष्टि असते, अर्थात् अशा रीतीनें ज्ञान्यास राजा व रंक हे समान असतात. आतां दुसऱ्या प्रकारची समता ती अशी– ॥ श्लोक ॥ यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रियाः ॥ चित्ते वाचिक्रियायां च साधूनामेकरूपता ॥ १ ॥ अर्थ-जसें मनांत असतें तसेंच वाणींत, आणि जशी वाणी तशी क्रिया. एवंच मनांत, वाणींत आणि क्रियेंत साधूंची एकरूपता म्हणजे समता असते ॥ १ ॥ ज्यांच्या मनांत सच्चिंतन, वाणींत सद्वचन, आणि क्रियेंत सत्कर्म आहे ते साधु होत. साधूच्या समत्वाविषयीं ज्ञानेश्वर अन्य प्रकारें वर्णन करितात. ॥ ओंवी ॥ महा सिंधु जसे ॥ ग्रीष्म वर्षीं सरिसे ॥ इष्टानिष्टीं तैसें ॥ जयांसी गा ॥ १ ॥ कां तिन्ही काळ होतां ॥ त्रिधा नव्हे सविता ॥ तैसा सुखदुःखीं चित्ता॥ भेदु नाहीं ॥ २ ॥ अर्थ—समुद्राला जसा उन्हाळा व पर्जन्यकाळ सारखे तसें ज्याला इष्ट म्हणजे सुख, अनिष्ट म्हणजे दुःख हें सारखेंच. ॥१॥ अथवा तीन काळ प्रातर्मध्यान्ह आणि सायंकाळ हे किंवा शीतकाळ, उष्णकाळ आणि पर्जन्यकाळ प्राप्त झाले असतां सूर्य तीन प्रकारचा होत नाहीं, तसा सुखदुःखांत ज्याच्या मनास पालट होत नाहीं ॥ २ ॥ या दोन गुणांनीं संपन्न असलेल्या साधुजनांचे ठिकाणीं स्वाभाविकच अन्यही सद्गुण असतात. त्याविषयीं शार्ङ्गधरांत कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ स्रग्धरा ॥ नम्रत्वेनोन्नमंतः परगुणकथनः स्वान्गुणान्ख्यापयंतः स्वार्थान् संपादयंतो विततबहुतरारंभयत्नः परार्थे ॥ क्षांत्यैवाक्षेपरूक्षाक्षर मुखरमुखान् दुर्मुखान् दूषयंतः,संतश्चाश्चर्यचर्याजगति बहुमताः कस्य नाभ्यर्चनीयाः ॥ १ ॥

**अर्थ**–नम्रत्वेनोन्नमंतः म्हणजे जे नम्रपणानेंच आपला मोठेपणा दाखवितात. दुसऱ्याच्या गुणवर्णनानें आपले गुण प्रसिद्ध करतात. स्वार्थ–संपादन करीत असतांनाही परोपकारार्थ अनेक प्रकारें झटतात, निंदायुक्त दुःसह दुर्वाक्यांनीं टोंचणाऱ्या दुर्जनांस क्षमेच्या योगानेंच दूषण देतात, असें ज्यांचें आचरण लोकांस आश्चर्यकारक आहे, ते सर्वमान्य साधु या जगांत कोणास पूज्य नाहींत ? तर ते सर्वांस पूज्य होत ॥ १ ॥ यांत नम्रता, परगुणप्रीति, परोपकार आणि क्षमा हे स्वाभाविकच साधूंचे सद्गुण वर्णन केले आहेत परंतु दया व समता या दोन गुणांतच सर्वांचा समावेश होतो. म्हणून शिवरामस्वामी आरंभीं त्या दोहोंचाच स्वीकार करून म्हणतात. संत दयालु कसे० ॥ १ ॥ आतां कसे या शब्दानें साधूंचा दयाळूपणा लोकोत्तर आहे असें सुचवितात. अन्य लोकांची दया तारतम्यानें कोठें कमी कोठें अधिक अशी असते, साधूंची तशी नाहीं. याविषयीं तुकाराम म्हणतात ॥ **अभंग** ॥ दया करणें जे पुत्रासी ॥ तेच दासा आणि दासी ॥ १ ॥ तोचि साधु ओळखावा ॥ देव तेथेंचि जाणावा ॥ ध्रु० ॥ ज्यासी आपंगिता नाहीं ॥ त्यासी धरी जो हृदयीं ॥ २ ॥ तुका म्हणे सांगू किती ॥ तोचि भगवंताची मूर्ती ॥ ३ ॥ याप्रमाणें वैषम्यविवर्जित दयेनें युक्त साधूंचें हृदय अति कोमल असतें, याविषयीं कवि म्हणतात ॥ **श्लोक** ॥ स्वागता ॥ सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदंति कवयस्तदलीकं ॥ अन्यदेहविलसत्परितापात्सज्जनो द्रवति नो नवनीतं ॥ ३ ॥ **अर्थ**–साधूंचें हृदय केवळ नवनीतच असें जें कवि म्हणतात, तें अगदीं खोटें आहे; कारण दुसऱ्याचे देहांत झालेल्या तापानें साधु द्रवतात तसें लोणी अन्य तापानें द्रवत नाहीं, तर त्याला जेव्हां अग्नितापच होतो, तेव्हां तें पाझरतें ॥४॥ अथवा लोकोत्तर म्हणण्याचें कारण दुसरें असें कीं, कोणी श्रीमान् पुरुषानें दया केली तर कांहीं यत्किंचित द्रव्य देतील; किंवा देवांची दया झाली तर स्वर्गवास, अमृतपान, रंभासंभोग इत्यादि विषयसुख मिळणार परंतु साधूंची दया झाल्यास ते तत्काळ सच्चिदानंदघन आत्मस्वरूपच देतात, म्हणून साधूंची दया ही लोकोत्तर आहे, याविषयीं ज्ञानेश्वर म्हणतात ॥ **ओंवी** ॥ कैवल्य कनकाचिया दाना ॥ जो न कडसी थोर साना ॥ द्रष्ट्याच्या दर्शना ॥ पाढाऊ जो ॥ १ ॥ जयाचेनि कृपासलिलें ॥ जीव हा ठाववरि पाखाळे ॥ जें शिवपणही ओंविळें ॥ आंगीं न लवी ॥ २ ॥ अर्थ—मोक्षरूप सुवर्ण देण्यास जो लहान, थोर अशी निवड करीत नाहीं आणि आत्मस्वरूपाच्या दर्शनास जो पाठबळ होतो ॥ १ ॥ ज्याच्या कृपारूप उदकानें हा जीव इतका शुद्ध होतो कीं, ज्याप्रमाणें जीवत्वाचा कंटाळा मानतो त्याप्रमाणेंच मी शिव (ईश्वर) आहें या अभिमानाचाही तो विटाळ मानतो ॥ २ ॥ तर अशा प्रकारचे जे साधु त्यांची संगति या जीवांनीं अवश्य करावी. कां म्हणाल तर–देउनि भेटी० ॥ साधु हे दर्शनाबरोबर जन्ममरणास कारणभूत जी माया ती नाहींशी करतात. अर्थात् जीवन्मुक्तता देतात. इतर तीर्थें किंवा दैवतें हीं पापक्षयद्वारा मुक्तीस परंपरेनें कारण आहेत, परंतु त्यास फार काळ लागतो. याविषयीं श्रीकृष्णाची उक्ति आहे ॥ **श्लोक** ॥ भागवतांतील ॥ नह्यम्मयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयः ॥ ते पुनंत्युरुकालेन दर्शनादेव साधवः ॥ १ ॥ **अर्थ**—उदकमय तीर्थें आणि मृण्मय किंवा पाषाणमय देवता पवित्र करीत नाहींत असें नाहीं; परंतु बहुत काळानें पवित्र करतात, आणि साधु हे दर्शनाबरोबर मुक्त करतात, याविषयीं मोरोपंत म्हणतात ॥ **आर्या** ॥ देती फळ बहु दिवसां देव शिलादारुमृण्मय प्रण-

तां ॥ जलमयतीर्थेंहि तशीं संताचि फळती नमोस्तुते म्हणतां ॥ १ ॥ याकरितां ज्यांना आपण भवबंधांतून त्वरित मुक्त व्हावें अशी इच्छा असेल त्यांनीं साधूंची संगति करावी, म्हणजे ते तात्काळ कृपा करून मुक्त करतील. कारण त्यांची सर्व भूतांवर दया आणि समदृष्टि हीं स्वाभाविक असतात, म्हणून शिवरामस्वामी म्हणातात—संत दयाळु कसे ॥ राजा रंक जयां सारिसे ॥ ध्रु० ॥ **गोष्ट**—आतां साधु केवळ निरपराध्याविषयीं दयाळू असतात असें नाहीं. तर सापराध जनाविषयींही त्यांचे मनांत दया असते. कवि म्हणतात ॥ **श्लोक** ॥ उपकारिषु यः साधु साधुत्वे तस्य को गुणः ॥ अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते ॥ १ ॥ **अर्थ**—उपकार करणाऱ्याविषयीं जो साधु आहे त्याच्या साधुत्वांत काय गुण आहे ? तर जो अपकार करणाऱ्याविषयीं साधु त्याला मात्र साधु असें म्हणतात. याविषयीं रामदासस्वामींची एक गोष्ट आहे ती अशी:—एकदां रामदासस्वामी एक दोन शिष्यांसहित ग्रामांतराहून सज्जनगडास येत होते. तेव्हां वाटेंत शेतांतून जोंधळ्याचीं पिकें होतीं तीं त्यांच्या दृष्टीस पडून ते शिष्यांस म्हणाले, या शेतांत हुरडा चांगला दिसत आहे, आणि आपल्यास क्षुधा लागली आहे, याकरितां यांतून दहा पांच कणसें घेऊन येथेंच भाजून आपण खाऊं. असें गुरुजींचें वाक्य ऐकून शिष्यांनीं कांहीं कणसें तोडिलीं आणि तेथेंच विस्तव करून कणसें भाजीत आहेत, तोंच तो शेतकरी फिरत फिरत तेथें आला. आणि पाहतो तों आपले शेतांतील कणसें त्यांनीं तोडिलीं आहेत, आणि तीं भाजण्याचा क्रम चालू आहे. तें पाहून तो अडाणी व दांडगा शेतकरी अतिशय रागावला. मग त्या आवेशांत त्याला अगदीं विचार न राहतां त्यानें गोफणीच्या चऱ्हाटानें प्रथम गुरुजीस व नंतर शिष्यांस चार चार तडाखे मारले. त्या वेळीं रामदासस्वामींनीं त्या दुष्ट शेतकऱ्याचा कांहीं दुरुत्तरानें सुद्धां निषेध न करतां त्यानें आपल्या जिव्हालंपटपणामुळें केलेली शिक्षा उपदेशतुल्य मानून शिष्यांसह तेथून निघून सज्जनगडाचा मार्ग धरिला. पुढें सज्जनगडास स्वामी पोंचल्यानतर गुरुवारीं शिवाजी राजा हा सद्गुरुदर्शनास आला. त्यानें षोडशोपचारें गुरुपादपूजन करून हात जोडून उभा राहिला. त्या वेळेस स्वामींनीं ज्यापासून आपल्याला उपदेश मिळाला त्या शेतकऱ्याचा पत्ता सांगून त्यास आणण्याविषयीं राजास आज्ञा केली. शिवाजीच्या मनांत महाराज मार्गानें येत असतां त्यानें कांहीं सेवा केली असेल; म्हणून त्यानें त्या शेतकऱ्यास बोलावण्याकरितां शिपायांस पाठविलें. त्या वेळीं शिष्यांच्या मनांत ती गोष्ट शिवाजीराजास कळविण्याविषयीं घोळत होती. परंतु समर्थांनीं मार्गांतच आज्ञा केली होती कीं, ही गोष्ट शिवाजीच्या कानावर अगदीं घालूं नका, त्यामुळें त्यांचा उपाय चालेनासा झाला. इकडे शिपायांनीं त्या शेतकऱ्यास राजाज्ञा कळविली कीं, स्वामी महाराजांच्या आज्ञेवरून तुला सरकारांनीं बोलाविलें आहे. तेव्हां मात्र त्या शेतकऱ्याचे मनांत धस्स होऊन त्याला गोफणीनें भगवे वस्त्रांच्या बावास मारल्याची आठवण झाली. परंतु करतो काय, राजाज्ञा अनुल्लंघनीय आहे असें जाणून तसाच सभयांतःकरणानें त्या शिपायांबरोबर सज्जनगडास परत आला. शिपायांनीं राजास कळवितांच राजा हात जोडून म्हणाला, महाराज तो शेतकरी आला आहे. काय आज्ञा असेल ती दासास कळवावी. स्वामींनीं त्यास जवळ येण्याविषयीं सांगितलें. शेतकरी जवळ येऊन पाहतो तों तेच बुवा येथें आहेत आणि राजा हात जोडून

पुढें उभा आहे. मग तर काय, त्याचें काळीज ठिकाणावर राहिलें नाहीं ! ! दे माय धरणी ठाय ! अशी त्याची धांदल झाली. हें सर्व स्वामींनीं पाहून राजास आज्ञा केली कीं, जें शेत याजकडे आहे तें यास वंशपरंपरा इनाम करून दे. अशी त्याला गुरूची आज्ञा होतांच मुतसद्याकडून सनद करविली. मोहोर करण्यापूर्वीं राजानें विचारलें कीं, महाराज, यानें काय आपली सेवा केली ती ऐकण्याची माझी इच्छा आहे. स्वामींनीं सांगितलें कीं, यानें आम्हावर मोठा उपकार केला आहे. तो सांगण्यासारखा नाहीं, तथापि तुझा आग्रहच असल्यास तुला सांगेन; परंतु सनद पुरी करून त्याच्या स्वाधीन कर. राजानें मोहोर करून सनद शेतकऱ्यास दिली. नंतर स्वामींनीं त्यास जाण्यास आज्ञा केली. शेतकऱ्यास त्या वेळेस मोठा विस्मय वाटला, व लज्जायमान होऊन तो स्वामींस नमस्कार करून चालता झाला. पुढें शिवाजीचा आग्रहच पडला कीं, त्यानें काय सेवा केली हें कळवावें. तेव्हां समर्थांनीं सांगितलें कीं, सेवा नव्हे; त्यानें आम्हांस उपदेश केला. तो कोणता म्हणून विचारतांच स्वामींनीं आपली पाठ दाखविली. राजा काय म्हणून बघतो तों पाठीची सालटीं निघालीं आहेत. तीं पाहून राजानें शिष्यांस विचारिलें. तेव्हां त्यांनीं सविस्तर हकीकत सांगितली. ती ऐकून शिवाजी राजा त्यास कांहीं भयंकर शिक्षा केली पाहिजे म्हणून शिपायांस सांगत आहे तों समर्थांनीं त्यास निवारण करून सांगितलें. राजा, हें जिव्हेंद्रिय फार दुर्जन आहे. कारण भागवतांत म्हटलें आहे, ‘ जितं सर्व जिते रसे ’ म्हणजे एक रसनेंद्रिय जिंकलें म्हणजे सर्व इंद्रियें जिंकिलीं. तर त्यानें रसनेंद्रियाविषयीं आम्हांस शिक्षा केली यांत क्रोधाचें कारण काय ? असें सांगून राजाचें निवारण केलें. तात्पर्य—तो शेतकरी असा अपकारी असतां त्यावर रामदासस्वामींनीं अशी कृपा केली कीं, त्याचें तें इनामी शेत.अद्याप चालू आहे. तर खरोखरच जे साधु असतात, ते समदृष्टि असून दयाळू असतात, या अभिप्रायानें शिवरामस्वामी म्हणतात ॥ संत दयाळु कसे० ॥ आतां साधूंची समदृष्टीच असते. पण शरण जाणारा जर आपल्या मनानें त्यांचे ठिकाणीं वैषम्य कल्पील आणि कांहीं कृत्रिम करील तर त्याचें फल त्याचे अनुभवास येईल. अशाविषयीं परशुरामजन्माख्यान कवि निरूपण करितात.

---

# अथ परशुरामजन्मप्रारंभः



श्रीगणेशायनमः ॥ श्लोक ॥ स्रग्धरा ॥ ऐका श्रोते सुगाथा कथित सुरस जो जन्म हा भार्गवाचा ॥ साहित्यें युक्त बोले रसयुत कविची हे यथामार्ग वाचा ॥ व्यासोक्ती आदिपर्वीं पसरली बहु मी सांगतों मुख्य सार॥ गाथा संक्षिप्त येथें कथिलि निजमतीं सांडुनीयां पसार ॥ १ ॥ शार्दूल ० ॥ वैशंपायन बोलला परिस तूं राजर्षि पारीक्षिता[1] ॥ पूर्वीं जो भृगु-पुत्र कीं च्यवन तो झाला मनीं लक्षिता ॥ गेलें मद्वय आपणास वनिता आतां असावी बरी ॥ ऐसें कल्पुनि कान्यकुब्जप-गृहीं[2] आला ऋषी लौकरी ॥ २ ॥ मालिनीवृ० ॥ कुशिक नृपति भावें पूजितो ब्राह्मणातें ॥ च्यवन वदत आहे मागणें आपणातें ॥ नरवर मग बोले

---

१ हे जन्मेजया. २ कुशिकराजा.

काय आज्ञा दयाळा ॥ च्यवन कथि तदा दे त्वत्सुता दिव्य बाळा ॥ ३ ॥ आर्या ॥वच-कुनि भूपति कल्पी कन्या द्यावी परंतु हा जीर्ण ॥ नास्ति श्रवणें शापिल राजा चित्तांत होय संकीर्ण ॥ ४ ॥ पटु राय मनीं कल्पी ब्राह्मण हा आर्ष शीघ्र अडवावा ॥ कन्या देणें न घडे ऐसा सारांश योग घडवावा ॥५॥ म्हणतो स्वामी द्यावे चार शतें श्यामकर्ण आजि मला ॥ मग मी दुहिता आर्पिन हें ऐकुनि विप्र अंतरीं श्रमला ॥ ६ ॥ श्लोक ॥ चामर ॥ विप्र धैर्य मानसें म्हणे नृपास यावरी ॥ श्यामकर्ण अश्व शीघ्र आणितों पहा तरी ॥ स्वाश्रमास पातला तदाच तेथ दिक्पती ॥ बोलवी नृपोक्ति सर्व सांगतो तयाप्रती ॥ ७ ॥ तोषला दिगीश अश्व देत चारशी शत ॥ श्यामकर्ण घेउनी मुनींद्र शीघ्र पावत ॥ घे नृपा तुरंग दिव्य कन्यका मला दिजे ॥ विस्मित प्रभु सुताहि दे गृहास नेइजे ॥ ८ ॥ लग्न लाविलें यथोक्त येतसे गृहीं मुनी ॥ राहिला सरस्वतीतिरास विप्र येउनी ॥ साध्वि सेवनांत दक्ष तोषला मुनि स्वयें ॥ लालनादि पालनादि तो करीत निश्चयें ॥ ९ ॥ बालदा छंद ॥ श्रावणी द्विजें साध्वि वाहिली॥ ती कृपाभरें पूर्ण पाहिली ॥ सांगतो तिला कीं उभी रहा ॥ योग्य आसनीं बैसतों पहा ॥ १० ॥ वायु रोधुनी विप्र बैसला ॥ तो समाधिचें सौख्य पावला ॥ येरि ते उभी चंपकी कळी ॥ जेंवि मांडिली काष्ठपूतळी ॥ ११ ॥ यापरी पहा वत्सरें किती ॥ खांबेरें दुये होय नों क्षिती ॥ तो न ऊठला ती न बैसली ॥ धन्य धन्य ते माउली भली ॥ १२ ॥ शार्दू०॥ आनंदोर्मि विसर्जिली द्विजमणी पावे प्रबोधाद्वय ॥ तन्वी सन्मुख पाहिली कृश दिसे मांसासृकाचा लय ॥ वर्षे शंभर राहिली सति उभी ही धन्य मत्कामिनी ॥ आलिंगी करुणाब्धि पाद विनयें वंदी करीगामिनी ॥ १३ वसंततिलकावृत्त ॥ झाला प्रसन्न मुनि इच्छित माग बोले ॥ सानंद ते वचन ऐकुनि शीघ्र डोले ॥ येरी वदे कुशिक तात तयासि ऐसा ॥ व्हावा सुपुत्र कुलदीपक सूर्य जैसा ॥ १४ ॥ कांता निरिच्छ अति शुद्ध बहु प्रसन्न ॥ हें पाहुनी च्यवन होय अति प्रसन्न ॥ बोले सखे तरि तुझे जननीस आणी ॥ देतों तिलाहि तुजला सुत ऐक वाणी ॥ १५ ॥ विबुधप्रिया ॥ मंत्रुनी चरुदान ते तयि दाखवी सुमुखी-प्रती ॥ हा तुझा चरु हा तिचा चरु पाहते सति सन्मती ॥जाय आपण तेथुनी अवगाहनास नदीतटीं ॥ आणिते जननीस ते मग कौशिकी बहु गोमटी ॥ १६ ॥ दाखवी तव हा चरू मम हा चरू करि रक्षणा ॥ स्नान मीं करितें करूं दोघिही सह भक्षणा ॥ जाय ती जननी मनीं गमलें तिचा चरु चांगला ॥ ते चरू बदली पहा क्षिती लोभ अंतरीं दाटला ॥ १७ ॥ पातली च्यवनांगना चरु दोघि सत्वर भक्षिती ॥ भेदले द्वय भाग हे ऋषिराज अंतरीं लक्षिती ॥ पातला सदनास सांगत कामिनीप्रति उत्तर ॥ भेदले चरु यापुढें साध्वि कर्म होईल दुस्तर ॥ १८ ॥ साकी ॥ च्यवन विलोकुनि चरु-च्यवन तें सदनिं वदे सुदतीला ॥ भाग यथाविधि सेवुनियां निज दिधला कीं वद तीला ॥ १९ ॥ होय म्हणे तैं मुनींद्र बोले सुंदरि चरु बदलीका ॥ जननीनें जननिंद्य युवतींची न प्रणयास्पद लीला ॥ २० ॥ आर्या ॥ त्वद्भाग तिणें नेला भाग तिचा भक्षिलास तूं नारी ॥ अस्ताव्यस्ताचि घडलें ओढवलें कर्म यापुढें भारी ॥ २१ ॥ साकी ॥ यास्तव होईल दारुण तुज सुत क्षत्रिय उग्र स्वभावें ॥

---

१ संशयपयुक्त. २ चतुर. ३ वरुण. ४ शंभर. ५ अद्वयज्ञानस्वरूपास. ६ मांसरक्ताचा. ७ गजगति. ८ अदलाबदल. ९ प्रीति ठेवण्याजोगी.

त्वज्जननीस अति शांततपोरत द्विज उपरत नृपभावें ॥२२॥ ॥आर्या॥ जो क्षात्रधर्म तो तव वंशज करतील विप्र होऊनी ॥ द्विज कर्मीं रत तव पितृसुत सर्व भूसुरांहूनी ॥ २३ ॥ साकी ॥ ऐकुनि राजसुता पति-वचना होय मनीं बहु दीना ॥ कर जोडुनि करि पुन्हां विनंति च्यवन-पदांबुज-लीना ॥२४॥ नसो विगेतनय तनय असा मज लांछन होय मला जें॥ कीं मुनिदयिता असुनि विपर्यय संततिचा मन लाजे ॥ २५ ॥ वाचा तुमची मृषा न व्हावी विफला नचि मम याच्ञा ॥ आचारान्वित होवो मत्सुत क्षत्रियसुत जननीचा ॥२६॥ तुमचें वचनहि सत्य व्हावया होवोत तसे नातू ॥ माझा क्षत्रिय तिचाहि मुनिवर मानीं या वचना तूं ॥ २७ ॥ ओंवी ॥ आयकोनि पत्नीचें वचन ॥ तथास्तु म्हणे च्यवन ॥ होतील यथोचित नंदन ॥ पौत्र जाण विपर्ययें ॥ २८ ॥ आर्या ॥ कुशिकात्मज गाधी मग झाला राजर्षि यावरी पाहीं ॥ च्यवनात्मज जमदग्नी शूर हा वंदिला समग्रांही ॥ २९ ॥ घनाक्षरी गाधिपुत्र तपी फार ॥ विश्वामित्र अनिवार ॥ तपश्चर्येचा विचार ॥ सर्व जना ठाउका ॥३०॥ पुढें जमदग्नी वेद ॥ जाणे सर्व कळा भेद ॥ आकळीत धनुर्वेद ॥ महाशूर उग्र ॥ ३१ ॥ जाणें शस्त्र अस्त्र सर्व ॥ झाडी शत्रूचे गर्व ॥ तपी देव जसा शर्व ॥ महा क्रोध अंतरीं ॥३२॥ श्लोक ॥ शार्दूलविक्रीडित ॥ रेणूराय अनंगकाय–विजयी त्याची सुता रेणुका ॥ साक्षाच्छ्री जगदंबिका अवतरे राजा करी कौतुका ॥ योजी लग्न तिचें नरेश गजरें केला असे हो पण॥ ते काळीं जमदग्नि जाय बळिया जो आयुधी आपण ॥ ३३ ॥ इंद्रवज्रा ॥ जिंकोनि राजे वधु आणियेली ॥ तैं शौर्यवल्लीप्रति वृद्धि केली ॥ नाना विलासें बहु काळ गेला ॥ ऐका पुढें पुण्यरवी उदेला ॥ ३४ ॥ कालाख्य शंभू--सुत एक झाला ॥ कामाख्य धाता उदरासि आला ॥ विष्णु स्वयें आत्मज रामनाम ॥ जाले तिघे नंदन पूर्णकाम ॥ ३५ ॥ गर्भभ्रांती घातली रेणुकेला ॥ गर्भामध्यें भासतो देव ठेला ॥ शूरत्वाचा दीसतो सर्व भाव ॥ नाहीं शब्दीं संयुगावीण नांव ॥ ३६ ॥ दिंडी ॥ मुनी जाय डोहळे पुसायासी ॥ मूर्ति देखे सांवळी तेजराशी ॥ म्हणे कांते आवडी काय बोल ॥ येरि बोले ऐकतां येति डोल ॥ ३७ ॥ मी तों आहें सच्चिदानंद राम ॥ वर्ण आश्रम पाळितां सौख्यधाम ॥ तपश्चर्या आदरें आचरावी॥ शूरतेची पूर्णता दाखवावी ॥ ३८ ॥ श्लोक ॥ पृथ्वीछंद ॥ म्हणे द्विज परेश हा सबळ गर्भवासी हरी ॥ पुढें निजपराक्रमें नृपतिचीं कुळें संहरी ॥ विशेष मम भाग्य हें सुफळरूप झालें असे ॥ तरीच जगदीश हा धरुनि आवडीं येतसे ॥ ३९ ॥ दिने दिन कळा चढे नवहि मास झाले बरे ॥ मुनी बहुत हर्षला मनिं न तोष तो सांवरे ॥ तदा सुदिनिं देतसे चपळ दर्शन श्रीपती ॥ पिता जननि हर्षुनी सुखहि सर्वदा पावती ॥ ४० ॥ आर्या ॥ त्रेतायुगप्रमाथीं सुवसंतीं माधवाख्य शुक्ल तिजे ॥ शनि रोहिणीस रात्रीं एकादशि घटिस जन्म आयकिजे ॥ ४१ ॥ नाहणी ॥ तया नाहणी ॥ न्हाणी ते रेणुका हीं ॥ नुरवि जनिं अघ यच्चरणरेणु कांहीं ॥ तयीं जननीच्या अंकि भार्गवासी॥ देव–वनिता पाहती स्वर्गवासी ॥ १ ॥ स्नेह लावुनी मस्तकीं परशुरामा ॥ शुद्ध उदकें वर घालिती सुरामा ॥ परी न कळे कीं स्नेह या अमाया ॥ नसे मालिन्यहि नित्य विमल काया ॥ २ ॥ चरण शरणागत लोक पाप वारी ॥ तया अनपेक्षित अन्य तीर्थ वारी ॥ वामना हें आश्चर्य फार वाटे ॥ परी युक्त-

---

१ विरक्त. २ अन्यायी. ३ ऋषिभार्या. ४ मिथ्या. ५ मदनाचें रूप जिंकणारा. ६ युद्धावांचून

चि कीं भक्तिवाटें ॥ ३ ॥ ४२ ॥ **आर्या** ॥ ते काळीं जगदीश्वर जन्मा आला पिता विलोकि मुख ॥ पुत्रावण तात करी मातेचे माइना मनांत सुख ॥ ४३ ॥ आल्या सुवासिनी बहु हळदी बहु कुंकुमेंचि घवघवती ॥ सुमनें वर्षति सुरवर विबुधांचे वदनचंद्र टवटवती ॥४४॥ षष्ठीपूजन झालें द्वादश दिनिं राम ठेविलें नाम ॥ सद्गुण गाती वनिता घालुनियां पालखांत सुखधाम ॥ ४५ ॥ **पाळणा** ॥ जोजोजोजोरे सुखधामा ॥ भार्गव पूर्णकामा ॥ ध्रु०॥ क्षत्रियसंहारी रणांगणीं ॥ उग्रस्वभावकरणीं ॥ भारी श्रमलासी खेळणीं ॥ उद्धरितां ही धरणी ॥ जोजोजो० ॥ १ ॥ धेनू द्विजांचे पाळणा ॥ करितां धरि अवतरणा ॥ तुजला निजवीतें पाळणा ॥ दीनावरि करि करुणा ॥ जोजो० ॥ २ ॥ देव अवतरले हृषीकेशी ॥ भृगुऋषीच्या वंशीं ॥ संगें घेउनियां हरविधिसी ॥ रेणुकेच्या कुशीं ॥ जोजो० ॥ ३ ॥ सागर सारुनियां वसविलें ॥ कोंकण जन पाळीले ॥ दुष्टाचरणांतें दंडीलें ॥ यश हें प्रसिद्ध झालें ॥ जोजो० ॥ ४ ॥ स्वस्थ निजावें भार्गवा ॥ अखंडित चिरंजीवा ॥ योगमाया ती करि सेवा॥ परशुरामा देवा ॥ जोजो० ॥ ५ ॥ हालवी रेणुका पाळणा ॥ गाई त्या आचरणा ॥ सखया रामाच्या आभरणा ॥ चुकवी जन्ममरणा ॥ जोजो०॥ ६ ॥ ४६ ॥ **श्लोक** ॥ स्वागता ॥ वृक्षवल्लिस फलोदय दृष्टी ॥ कूजती पिक सुखी ॥ पग सृष्टी धान्य वृष्टि टळले अपघात ॥ रामजन्म बरवा सकळांत॥ ४७॥ **व. ति. वृत्त**॥ ऐसा असे परशुराम सुजन्म राया ॥ तो ऐकतांचि जग पावत पूर्ण ठायां ॥ श्रीरामकृष्ण गुरुचाचि धरूनि संग ॥ वर्णी सुधासम रसाद्भुत पांडुरंग ॥ ४८ ॥ असो—तात्पर्य इतकेंच कीं, च्यवन ऋषींनीं समदृष्टीनेंच भाग दिले असतां सत्यवतीच्या मातेनें कपट केलें, त्याप्रमाणें संततींत व्यत्यय झाला हें फल तिला प्राप्त झालेंच. पुढें सत्यवतीनें प्रार्थना केल्यावर च्यवन ऋषींनीं दयाळूपणानें तें कांहीं काळावर घातलें, यावरून च्यवनासारखे जे महात्मे साधु त्यांच्या ठिकाणीं समदृष्टि आणि दयालुता हे गुण मुख्यत्वेंकरून असतात. हाच आशय मनांत आणून शिवरामस्वामी प्रथम पदांत म्हणतात.संत दयाळु को ॥ राजा रंक जयां सरिसे ॥ ध्रु०॥ कृष्णरामारामारामाहो, रामराया ( भजन ) पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहरमहादेव ॥ जानकीजीवन स्मरण जयजयराम ॥ तव कथामृतं तप्तजीवनं० ॥ **आरती परशुरामाची** ॥ जयजयजय जमदग्निज भृगुकुल कुमुदविधो ॥ अवलोकय नीराजनमगणितगुणसिंधो ॥ ध्रु० ॥ पितुरपराधविधायिनि हैहयभूमिपतौ ॥ अवहता क्रुधमचिराद् भवता यदिह मतौ ॥ क्षितिरक्षत्रियानिवहाऽक्रियतेयममितौ तत्रहिपार्श्वसहायौ स्वभुजावेवमतौ ॥ जयजय० ॥ क्वाभिजनोवाकतपः क्वचसंगरवार्तो ॥ क्वदयाक्वारिवधूनांक्षितिरार्तरवार्ता ॥ ननुपितृचरणपरायण धर्मावनकर्ता ॥ युक्तं तदपियदांसिः- किलनृपमदहर्ता ॥ जय० ॥२ ॥ इष्टंनानायागैः पर्यटिताच रसा ॥ दत्ताचदक्षिणायैऋत्विग्भ्यस्तरसा ॥ इत्यखिलाच कृतिस्ते भगवन्निहसुरसा ॥ तद्धामनोनमतिशुभपदयुगलंशिरसा ॥ जयजय० ॥ ३ ॥ कायेनवाचामन० ॥ अच्युतं० ॥ हरेराम० ॥ पुंडलीकव० ॥ पार्वती० ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ इति परशुरामजन्माख्यानं समाप्तम् ॥

शब्द करिती.

# कथा ६ वी.

# नृसिंहजन्म पूर्वरंग निरूपण.



श्रीगणेशायनमः ॥ अविरलमदजल इत्यादि नमनं ॥ नारायण हरी ॥ सांवळया नारायण हरी ॥ इति भजनम् ॥ पुंडलीकवरदे० ॥ पार्वतीप० सीत कांतस्म० ॥ पद ॥ अवघा तूंचि हरी तूंचि हरी ॥ तूं जीवन मी लहरी ॥ धृ० ॥ जननि जनक तूं बंधू ॥ सखा जिवलग करुणासिंधू ॥ अव० ॥ १ ॥ सद्विद्या निजधन तूं ॥ देउनि तोडिशि भवबंधन तूं ॥ अव० ॥ २ ॥ निजरंगा तूं पाही ॥ अवघा तूंचि मी तूं नाहीं ॥ अव० ॥ ३ ॥ आदौ कीर्तनारंभीं भगवज्जनावतंस रंगनाथस्वामी हे परोक्ष ज्ञानानें सर्व ब्रह्म आहे अशी भावना ज्यांस झाली आहे, परंतु अपरोक्ष साक्षात्कार नसल्यामुळें स्वानंदजन्य तृप्तिरहित अशा साधनचतुष्टयसंपन्न मुमुक्षु अधिकाऱ्यांस सच्चिदानंदघन परमात्म्याची सर्व जगांत व्याप्ति आहे हें स्वानुभावानें समजून अखंडित तृप्ति व्हावी या उद्देशानें इश्वराचें सर्वरूपत्व वर्णन करतात. ॥ अवघा० ॥ हे परमेश्वरा, सर्व तूंच आहेस. तुजवांचून या जगांत कोणी नाहीं. आतां यांत " वदतो व्याघातः " याप्रमाणें दोष येतो. कारण सर्व तूंच असें म्हणणारा एक वेगळा आहेच. तर याविषयीं म्हणतात. ॥ तूं जीवन० ॥ तूं जल आणि त्यावर उत्पन्न होणारी लहरी म्हणजे लाट मी. अर्थात् उदकावर लहरी असून ती उदकाहून भिन्न नाहींत तद्वत् हें जगत् तुझ्यावरच असून भिन्न नाहीं. तूंच सर्व आहेस. याविषयीं नृसिंहचंपूकार म्हणतात.॥श्लोक॥ पृथ्व्यां पाथसि पावके च पवने दिक्ष्वंतरिक्षे पुनर्मार्तंडे शशिमंडलेऽस्ति सुतले यश्चेतनेऽचेतने ॥ यश्चांतर्बहिरप्यनंतविभवो भावेप्यभावेऽपि यः सर्वत्रास्ति सदास्ति किं बहुगिरा त्वय्यस्ति मय्यस्ति च ॥ १ ॥ अर्थ--परमात्मा हा पृथ्वी, उदक, अग्नि, वायु आणि सर्व दिशा यांचे ठायीं आहे.तसाच आकाश, सूर्य, चंद्र, व पाताळ या ठिकाणीं आहे. चेतनांत आणि अचेतनांतही आहे. आंत व बाहेर सर्व व्यापून आहे. ज्याचें ऐश्वर्य अनंत असून भाव व अभाव या सर्व स्थळीं त्याची व्याप्ति आहे, तो सर्व ठिकाणीं व सर्व काळीं आहे. प्रल्हाद म्हणतो, पित्या, फार बोलून काय उपयोग ? परंतु तात्पर्य हेंच कीं, सर्वव्यापक तोच परमात्मा तुझे ठायीं व माझे ठायींही आहे. मोरोपंत म्हणतात–आर्या ॥ भू जल तेज समीर ख रवि शशि काष्टादिकीं जसे भरला ॥ स्थिर चर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुळें उरला ॥ अर्थ—पृथ्वी, जल, अग्नि, वायु आणि आकाश, तसेंच चंद्र--सूर्य व दिशा यांच्या आंत परमात्मा ओतप्रोत भरला आहे. किंबहुना स्थावरजंगम सर्व व्यापून जगदंतर्यामी जो ईश्वर तो आणखी दशांगुळें म्हणजे अनंतपणानें स्वरूपीं उरलाच आहे. परमात्म्याची जगांत व्याप्ति कशी आहे व जग परमेश्वराचे ठायीं कसें आहे, याविषयीं शंकराचार्य म्हणतात. ॥ आर्या ॥ दंतिनि दारुविकारे दारु तिरोभवति सोपि तत्रैव ॥ जगति तथा परमात्मा परमात्मन्यपि जगत्तिरोधत्ते ॥१॥ अर्थ–ज्याप्रमाणें लांकडाचा हत्ती जर केला तर हत्ती आहे अशा दृष्टीनें पाहाणारास लांकूड दिसत नाहीं. कारण त्याची दृष्टि हत्तीकडे असल्यामुळें हे पाय, ही सोंड अशीच त्याची समजत असते. त्याच हत्तीकडे

लांकडें विकत घेण्याच्या इच्छेनें कोणी मनुष्य गेला, त्याची दृष्टि मुळींच हत्तीवर नाहीं. तर हें लांकूड आहे, याचें वजन किती भरेल इत्यादि विचारांत त्यास तें लांकूडच दिसतें, हत्ती दिसत नाहीं. याप्रमाणें जगांत परमात्मा व परमात्म्याचे ठिकाणीं जगत् आहे. ज्याची दृष्टि हत्तीसारख्या या कृत्रिम जगतावरच आहे त्याला काष्ठासारखा परमात्मा त्यांतच व्यापक असूनही दिसत नाहीं आणि जे आत्मानात्मविचार करून सर्वत्र परमात्म्याची व्याप्ति आहे असें जाणतात त्यांस हें मायिक जग मुळींच दिसत नाहीं; तर सर्व काय आहे तें एक परमात्माच आहे असा त्यांचा अनुभव असतो. अतएव हें भासमान जें जग तें मिथ्या होय. वास्तविक पहातां परमात्माच सर्व आहे. अशा अभिप्रायानें रंगनाथस्वामी म्हणतात---अवघा तूंचि हरी० ॥ आतां कोणी म्हणेल, जर याप्रमाणें परमेश्वराची सर्व ठिकाणीं व्याप्ति आहे, तर सर्वांस त्याची प्रतीति का येत नाहीं ? तर याविषयीं कवि दृष्टांत सांगतात ॥ श्लोक ॥ नहि निर्मथनं विनेंधनाग्निः परिलभ्यो निकटे वसन्नपि ॥ गुरुशास्त्रनिषेवणंविना नहि लभ्यं निजरूपमात्मनः ॥ १ ॥ अर्थ--- जसा अग्नि सर्व इंधनांत अंतर्गत असून मंथन केल्यावांचून प्राप्त होत नाहीं, तसें परमात्म्याचें स्वरूप सर्वव्यापक आहे खरें, परंतु सद्गुरूला शरण जाऊन सच्छास्त्र जें वेदांत व उपनिषद यांचा विचार केल्यावांचून त्याची प्रतीति होत नाहीं. ज्यांनीं शमदमादि साधनें संपादन करून सद्गुरूची कृपा संपादन केली आहे, त्यांना परमात्म्यावांचून जगांत कांहीं एक दिसत नाहीं. तर जिकडे जिकडे त्यांची वृत्ति जाते तिकडे तिकडे परमात्म वस्तुच दिसते. याविषयीं आचार्य म्हणतात, ॥ श्लोक ॥ देहाभिमाने गलिते विज्ञाते परमात्मनि ॥ यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधयः ॥ १ ॥ अर्थ---सत्पुरुषाचें मन जेथें जेथें जातें तेथें तेथें परमात्मस्वरूप असल्यामुळें समाधिच आहे. तात्पर्य---एक परमात्माच विश्वरूप आहे याविषयीं निपटनिरंजन म्हणतात. कवीत ॥ नर भयो नारी भयो पशु पंछी असवार भयो, घोडेका स्वरूप भयो, हत्ती हो दिखायो है ॥ फूलहो फूल्यो, कहां भव रहो भूल्यो, कहां पवनहो झुल्यो, कहां पानीहो बहायो है ॥ बोलत है वेदनमों, डोलत है कुंजनमों, लोलत है बनमों, ओ अपहि आप बनो है ॥ साहेब रच्छो अजब थट्ट, आपहि लीला आपहि नट्ट, निपटा कहे हो परगट्ट घटघट बीच छायो है ॥ १ ॥ याप्रमाणें एक परमेश्वरच सर्व रूपानें नटला आहे. भीष्मोक्तीचाही असाच अभिप्राय आहे. ॥ श्लोक ॥ नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ॥ सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटी युगधारिणे नमः ॥ १ ॥ अर्थ--- हे परमेश्वरा, सहस्र म्हणजे अनंत आहेत मूर्ती ज्याच्या त्या तुला माझा नमस्कार असो. ज्याचे पाय, डोळे, मस्तकें, मांड्या आणि बाहू हे अनंत आहेत, तशींच अनंत नामें ज्यास आहेत आणि अनंतकोटि युगांस धारण करणारा, कालस्वरूपी अखंड दंडायमान् सर्वांतर्यामी असा जो तूं त्या तुला श्री अनंता, माझे नमस्कार असोत. याप्रमाणें अर्जुनोक्ति---भगवद्गीता ॥ श्लोक ॥ अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १ ॥ अर्थ---ज्या वेळीं भगवंतांनीं विश्वरूप अर्जुनास दाखविलें त्या वेळीं अर्जुन तें विश्वव्यापि रूप पाहून म्हणत आहे; हे विश्वेश्वरा, जगन्नियंत्या परमेश्वरा, तुला बाहू, उदरें, वक्त्र म्हणजे मुखें आणि नेत्रही अनंत आहेत; आणि तुझ्या स्वरूपाला मर्यादा नाहीं असें मी पाहतों परंतु याचा आदि, मध्य आणि अंत हे

मला दिसत नाहींत. ज्ञानेश्वर म्हणतात. ॥ **ओंवी** ॥ तैसें एकाचि निरंतर ॥ देवा देखत असें तुझे कर ॥ करीत अवघेचि व्यापार ॥ एकेचि काळीं ॥ १ ॥ मग महाशून्याचेनि पैसारें ॥ उघडलीं ब्रह्मकटाहाचीं भांडारें ॥ तैशीं देखतसें अपारें ॥ वदनें तुझी ॥२॥ तैशीं वक्त्रें जेउतीं तेउतीं ॥ तुझी देखतसें विश्वमूर्ती ॥ आणि तयाची परी नेत्रपंक्ति ॥ अनेका सैंघ ॥ ३ ॥ हें असो स्वर्गपाताळ ॥ कीं भूमी दिशा अंतराळ ॥ हे विवक्षा ठेली सकळ ॥ मूर्तिमय देखतसें ॥४॥ किंबहुना आतां ॥ तुझें तूंचि आवघे अनंता ॥ हें पुढत पुढतीं पाहतां ॥ देखिलें मीया ॥५॥ परी या तुझ्या रूपा आंत ॥ जी उणीव एक असें देखत ॥ जे आदि मध्य अंत ॥ तिन्ही नाहीं ॥ ६ ॥ याप्रमाणेंच रंगनाथस्वामींनींही पदांत म्हटलें आहे ॥**पद**॥ चित् उदधी निजरंग ॥ भासे जगदाकार तरंग ॥ ध्रु० ॥ माया मृगजळ शाश्वत नसतां ॥ धांवति जीव कुरंग ॥ भा० ॥ १ ॥ दृक्‌भ्रमयोगें रज्जु न जाणे ॥ वाटे तीव्र भुजंग ॥ भा० ॥ २ ॥ पुत्रकलत्रगणगोत्रमित्रधन ॥ गजरथधेनुतुरंग ॥ भा० ॥ ३ ॥ पूर्णरंग निजरंग रंगुनि ॥ होय सहज भवभंग ॥ भासे० ॥ ४ ॥ सच्चिद्‌घन परमात्मा समुद्रच आहे. जग हें त्यावर तरंगाप्रमाणें आहे. त्याप्रमाणेंच सर्व जग ईश्वरस्वरूपावरच कल्पित आहे. याविषयीं अक्रूरोक्ति आहे ॥ **भागवत श्लोक** ॥ त्वय्यनन्तात्मन्पुरुषे प्रकल्पिता लोकाः सपाल बहुजीवसंकुलः ॥ यथा जले संजिहते जलौकसोप्युदुंबरे वा मशका मनोमये ॥ १ ॥ **अर्थ**— हे अविनाश स्वरूपा परमेश्वरा, जसें—पाण्यांत जलचरें ( मत्स्यादिक ) अथवा उंबराचे फळांत किडे राहतात, परंतु त्या पाण्याची अथवा उंबराची इयत्ता त्यांस कळत नाहीं; तद्वत् सर्व जीवांसह हे लोक व लोकपाल तुझ्या ठिकाणींच कल्पिले आहेत. यावर वामनपंडित म्हणतात ॥ **श्लोक** ॥ किडे उंबराच्या फळामाजि कोटी ॥ असे अंडकोटीमधें जीव कोटी ॥ किडे नेणती आणिका उंबरासी ॥ तसे जीव हे नेणती अंडराशी ॥ २ ॥ अनेकें अशीं उंबरें एक वृक्षीं ॥ तसा अंडकोटीस तूं एक साक्षी ॥ फळाच्या त्रिकाळीं तरू एक जैसा ॥ अनित्या जनां नित्य तूं एक तैसा ॥ ३ ॥ इत्यादि अभिप्राय मनांत आणून कविप्रवर रंगनाथस्वामी म्हणतात ॥ अवघा तूंचि हरी ॥ **भजन** ॥ जयहरी नारायण ॥ पुंडलीकवर० ॥ पार्वतीप० ॥ सीताकांत०॥ आतां जग म्हणजे काय आणि परमात्मा कोणता, त्याची जगद्रूपता कशी याविषयीं आचार्य वर्णन करितात. ॥ **श्लोक** ॥ अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकं ॥ आद्यत्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयं ॥ १ ॥ **अर्थ**—सर्व जगांत अस्ति म्हणजे आहे, भाति ह्म० भासते, प्रियं ह्म० सुख, रूप म्हणजे आकार आणि नाम असे पांच अंश आहेत. त्यांत आद्यत्रय म्हणजे पहिले तीन अंश ब्रह्मरूप होत; आणि शेष राहिलेले दोन अंश म्हणजे नाम आणि रूप हें मायेचें रूप होय. आतां नाम आणि रूप हे ब्रह्मस्वरूपावर विवर्त म्हणजे भ्रमरूप होत. कारण ब्रह्मस्वरूप जें अंशत्रय म्हणजे अस्ति, भाति आणि प्रिय किंवा सत्, चित् आणि आनंद याला वेगळें करून पाहिलें असतां नामरूपें अनुभवास गोचर होत नाहींत. जसें रज्जूवर भासलेला सर्प हा रज्जू वेगळी करून कधींही भासत नाहीं, तद्वत् अर्थात् सर्पाप्रमाणें नाम, रूप हें मिथ्या होय. याविषयीं उपनिषद्वाक्यांतही नामरूप वाचारंभण म्हणून सांगितलें आहे. आतां कोणी म्हणेल कीं, ब्रह्मरूपें तीन आहेत. एक सत्, दुसरें चित् आणि तिसरें आनंद. तर रंगनाथस्वामींच्या आरंभींच्या पदास विरोध येतो. कारण ‘ अवघा तूंचि हरी ’ यांत तूं या एकवचनावरून

तीन स्वरूपें आहेत असा बोध होत नाहीं, एकच स्वरूप असा बोध होतो. तर याविषयीं ज्ञानेश्वरांनीं विरोध-परिहार केला आहे. ॥ ओंवी ॥ सत्ता प्रकाश सुख ॥ या तिहींतेंही उणे लेख ॥ जैसें विखपणेंचि विख ॥ विखासी नाहीं. ॥ १ ॥ **अर्थ**—सत्, चित् आणि आनंद हे तीन शब्द आहेत. परंतु यांच्या अर्थात तीनपणा नाहीं. जसें विष इतरांस विष आहे खरें, परंतु विषाला विष विषपणानें नाहीं यास दृष्टांत—॥ **ओंवी** ॥ कांति काठिन्य कनक ॥ तिन्हीं मिळोनि एक ॥ द्राव गोडी पीयूख ॥ पीयूखचि जेवीं ॥ २ ॥ **अर्थ**—तेज, कठिणपणा, आणि सोनें मिळून सोनें एकच. तसेंच ओलेपणा, गोडी आणि अमृत मिळून अमृत एकच, त्यांत तीनपणा होत नाहीं ॥१॥ याप्रमाणेंच सच्चिदानंद हेही तीन नाहींत, तर तिन्ही मिळून एकच स्वरूप आहे. याकरितां रंगनाथस्वामी म्हणतात. ॥ अवघा तूंचि० ॥ एवंच नामरूपात्मक मिथ्याभूत जगांत सच्चिदानंदरूपानें एका परमात्म्याचीच व्याप्ति आहे. आतां कोणी म्हणेल कीं जगद्दर्शनानेंच परमात्मदर्शन होऊन जीवांस सहज मोक्षप्राप्ति व्हावी. तसें कां होत नाहीं, तर याविषयीं आचार्य म्हणतात ॥**श्लोक** ॥ सत्ता स्फुरत्ता परमात्मनो या नाच्छादयेत्तामुपजीव्यभावात् ॥ आनंदमाच्छादयतीव केवलं तन्नाशने तत्त्वमसीति वाक्यम् ॥ **अर्थ**—परमात्म्याची जी सत्ता म्हणजे आस्तित्व आणि स्फुरता म्हणजे चित्शब्दवाच्य प्रकाश ह्या दोहोंस माया आच्छादन करीत नाहीं. कारण त्या दोन्हींवरच मायेची उपजीविका आहे. म्हणजे नामरूपात्मक मायेला सत् आणि चित् हे आधार आहेत. म्हणून यांचें आच्छादन तिच्यानें करवत नाहीं. तर ती केवळ आत्मस्वरूपभूत जो आनंद त्याला मात्र आच्छादन केल्यासारखें करते. याकरितां मायाकृत आनंदाच्छादनाचा नाश करण्यासाठीं तत्त्वमस्यादि वाक्यें आहेत. ॥ तात्पर्य— जगद्दर्शनांत परमात्म्याचे सत् व चित् हे अंश सर्वांस गोचर आहेतच, परंतु आनंद मात्र मायेनें आच्छादन केल्यामुळें गुप्त आहे. तो सद्गुरु—कृपेनें प्रगट झाला ह्मणजे सच्चिदानंदघन परमात्माच सर्व जगांत घनदाट भरला आहे, अशी ज्यांस दृष्टि झाली ते मुक्तच आहेत. असा आशय मनांत आणून मुक्तदृष्टया रंगनाथस्वामी वर्णन करितात ॥ अवघा तूंचि० ॥ नारायण हरि० ॥ भजन पुंडलीकव० ॥ पार्वतीप० ॥ जानकीजी० ॥ एवं स्थावरजंगमात्मक सर्व जगांत परमात्माच अंतर्यामी आहे. त्यावांचून अणुरेणूही नाहीं. हेंच प्रतिपादन करण्याकरितां श्रीनृसिंहावतार-चरित्र कवि निरूपण करितात.

---

# अथ नृसिंहजन्म प्रारंभः



॥ **श्लोक** ॥ प्रहर्षिणी ॥ वंदूनी नरहरिराजपादपद्मा ॥ ज्या सेवी त्रिभुवनसुंदरीहि पद्मा ॥ प्रल्हाद प्रथितें चरित्र वर्णितों कीं ॥ तें होवो सुगमहि मान्य वृद्धतोकीं ॥ १ ॥ पूर्वी ने जयविजयाख्य विष्णुलोकीं ॥ त्यां झाला सनकमुखर्षि शाप तो कीं ॥ दैत्यांच्या कुळिं उपजाल जाल भूतें ॥ तें जन्मत्रय सरतां भजा प्रभूतें ॥ २ ॥ **आर्या** ॥ ते प्रथम कनककै-

---

१ कमळ. २ लक्ष्मी. ३ प्रसिद्ध. ४ आबालवृद्धांस. ५ हिरण्यकशिपु.

शिपु कनकाक्ष असे प्रसिद्ध दितिगर्भी ॥ आले ज्येष्ठ सुदुश्चर करूनि तपा तोषवी कनकगर्भा ॥ ३ ॥ **श्लोक** ॥ भुजंगप्र० ॥ कनिष्ठासि विष्णू वराहावतारीं ॥ वधूनी मही बुडतां तीस तारी ॥ तयीं पासुनी वाढलें वैर ज्याचें ॥ करी ज्येष्ठ तो अर्चन श्रीअजाचें ॥ ४ ॥ ॥ **साकी** ॥ चरणांगुठसे देह धरनिपर उप्पर नजर धरी है ॥ प्रान जीतके अलग रह्या अजि पवन पिया करता है ॥ ५ ॥ **दिंडी** ॥ अशी दारुण पाहुनी तपश्चर्या ॥ प्रगट झाला विधिवरद असुरवर्या ॥ मनीं मानी बहु तया प्रबळवीर्या ॥ ह्मणे मागें जें इष्ट अचळ-धैर्या ॥ ६ ॥ **लोक** ॥ मालिनी ॥ अमर अजर काया आपुली तो कराया ॥ तप करि वर मागे धातया लोकराया ॥ न मृति मज म्हणे हो चेतनाचेतनांहीं ॥ मरण हरी असे कीं, दीस रातींत नाहीं ॥ ७ ॥ **श्लोक** ॥ भागवत ॥ नांतर्बहिर्दिवा नक्तमन्यस्मादपि चायुधैः ॥ न भूमौ नाम्बरे मृत्युः नरैरपि मृगैरपि ॥ ८ ॥ **अर्थ**—मला मृत्यु आंत व बाहेर नसावा. रात्री आणि दिवसही नसावा. तूं उत्पन्न केल्यापासून आणि अन्य सृष्टापासूनही नसावा. आयुधांनीं नसावा. मनुष्यांपासूनही नसावा, पशूकडूनही न व्हावा, तसाच भूमीवर आणि आकाशांतही येऊं नये ॥ ८ ॥ **आर्या** ॥ झाला भक्तविरोधी विष्णुद्वेषी सुराधिकारांसी ॥ हरुनी खल संस्थापी त्या त्या स्थानीं स्वकीय चारांसी ॥ ९ ॥ **श्लोक** ॥ भागवत ॥ स एवं वर्णाश्रमिभिः क्रतुभिर्भूरिदक्षिणैः ॥ इज्यमानो हविर्भागानग्रहीत्स्वेन तेजसा ॥ १० ॥ **अर्थ**—सर्व वर्णाश्रमी लोक प्रचुर दक्षिणादियुक्त यज्ञेंकरून हिरण्यकशिपूचेंच आराधन करूं लागले. आणि तोहि आपल्या तेजानें सर्व हविर्भाग ग्रहण करिता झाला.॥ १०॥ ॥ **श्लोक** ॥ स्वागता ॥ त्या वरें अमर मानवलोकीं ॥ स्वामि तोचि फळ हें अवलोकीं ॥ देववृंद अवघाच पळाला ॥ भीति सर्वहि तया चपळाला ॥ ११ ॥ **अभंग** ॥ त्रासले अंतरीं न चाले उपाय ॥ आठविती पाय गोविंदाचे ॥ १ ॥ झालासी निष्ठुर कां रे कृपावंता ॥ सोडवी अनंता तुका ह्मणे ॥ २ ॥ १२ ॥ **श्लोक** ॥ इंद्रवज्रा ॥ ते सर्वही प्रार्थिती देवदेवा ॥ कीं आपुलें घे पद देवदेवा ॥ झाली बहू बुद्धि अधीरवाणी ॥ तों बोलली हो अशरीरवाणी ॥ १३ ॥ **श्लोक** भागवत ॥ माभैष्ट विबुधश्रेष्ठाः सर्वेषां भद्रमस्तु वैः ॥ मद्दर्शनं हि भूतानां सर्वश्रेयोपपत्तये ॥ १४ ॥ **अर्थ**—हे देवश्रेष्ठहो, भिऊं नका तुह्मां सर्वांचें कल्याण असो; माझ्या दर्शनापासून जीवांस सर्व कल्याणाची प्राप्ति होते ॥ १४ ॥ निर्वैराय प्रशांताय स्वसुताय महात्मने ॥ प्रल्हादाय यदा द्रुह्येद्धानिष्येपि वरोर्जितम् ॥ १५ ॥ **अर्थ**—निर्वैर शांत, महात्मा, असा आपला पुत्र जो प्रल्हाद त्याचा जेव्हां तो दुष्ट द्रोह करील तेव्हां तो जरी ब्रह्मवरानें इतका प्रबल झाला आहे तरीही मी त्याचा वध करीन ॥ १५ ॥ **श्लोक** ॥ उपजाति ॥ कीं हा तपें तोषवि अब्जजाला ॥ त्याच्या वरें सर्व अवध्य झाला ॥ तथापि मारीनचि दुर्धरा या ॥ गांजील माझ्या जयिं भक्तराया ॥ १६ ॥ शिखरि० ॥ कयाधूचे पाटीं सुत सुमति झाला गुणानिधी ॥ तयाला देखोनी जनक सुख मानी निरवधी ॥ म्हणे याचीं चिन्हें सकळ दिसतीं सुंदर बरीं ॥ असो हा दीर्घायु असुरकुळींचा दीपक घरीं ॥ १७ प्रकर्षे आल्हादें रमविल तुम्हांला निशिदिनीं ॥ ह्मणोनि पाचारी गुरु ह्मणति प्रल्हादवचनीं ॥ द्विजां द्या गोदानें गज तुरग यानें रथ धनें ॥ अनंता वाद्यांचे गजर गुण गाती त्रिभुवनें ॥ १८॥

---

१ हिरण्याक्ष. २ कश्यपस्त्री. ३ ब्रह्मदेवास. ४ ब्रह्मदेवाचें. ५ मरण ६ [illegible]स, हेरांस.

दिंडी ॥ पांच वर्षे प्रल्हादवया झाली ॥ पिता शाळेमाझारिं तयां घाली ॥ गुरुहि शिकविति कौतुकें युक्त काळीं ॥ प्रथम ओनामा त्यास तपःशाळी ॥ १९ ॥ पद ॥ प्रल्हादाचें सुजनाल्हादक रुचिर चरित परिसा ॥ जयास्तव होय हरी हरिसा ॥ ध्रु० ॥ जनक विलोकुनि कनकंकशिपु त्या हर्षजनक सुतनया ॥ म्हण जगीं तुल्य दिसे सुत न या ॥ कवाळि असे मति तोंवरि कवळिल सकळांही नृपनया ॥ बळें मग करील त्रिभुवन-जया ॥ असें वदुनि गुरुसुता असुरपति पाचारुनि सविनया ॥ म्हणे त्या शिकवा या मत्प्रिया ॥ चाल ॥ हा बाळ विशाळप्रज्ञ असे या जी ॥ रुचि गमेल तें तें आरंभा त्या जी ॥ ऐकतांचि हर्षित झाले नृपयाजी यजमानतनय धृतविनय गृहातें नेति मुदित फारसा ॥ विलोकिति तन्मति जणूं आरसा ॥ १ ॥ प्रल्हा० ॥ प्रथम करुनि आरंभ तयाला शिकविति ओनामा ॥ धरुनि नृपसूनुवरी प्रेमा ॥ तो गुरुवर्णित आकर्णित जरि कर्णीं हृदयीं प्रभा ॥ सुनिर्णित चिंती हरिनामा ॥ गुरु शिक्षित वरि वरी म्हणे परि अंतरीं निष्कामा ॥ रुचेना त्या गुरुची गरिमा ॥ चाल ॥ तो करी पाठ जरि मुखीं ओनामासी ॥ अंतरीं न विसरे श्रीहरी--नामासी ॥ ती विरक्ति नुरवी विषयत्रामाशीं ॥ सदुक्ति-योगें सक्ति रमापतिचरणिं भक्ति सौरसा ॥ सुलंपट तसा नसे नवरसां ॥ प्रल्हा० ॥ २ ॥ २० ॥ आर्या ॥ जें जें गुरु शिकवीती लेखन मोडी लिहीहि ओनामा ॥ चित्तीं म्हणे विफळ हें मज शिकविति अंतरेन हो नामा ॥ २१ ॥ सारे वर्ण पुसावे एक हरी हेचि चार वगळावे ॥ करितां शासन हरि घे कीं दासाश्रू महीस न गळावे ॥ २२ ॥ पद ॥ जाय नियत शाळेंत प्रतिदिनीं पुत्र म्हणुनि तो करी ॥ पिता बहु प्रेम मनें त्यावरी ॥ एके दिवशीं कांचनकशिपु घेउनि अंकावरी ॥ पुसे त्या संतोषुनि अंतरीं ॥ आवडतें तुज काय शिकसी जें त्यांतिल वद लौकरी ॥ म्हणुनि तद्वदनातें सांवरी ॥ श्लोक ॥ उपजातिवृत्त ॥ एकें दिनीं घे सुत दैत्य अंकीं ॥ तो स्नेह त्याचा गणवे न अंकीं ॥ पुसे तया भागवतोत्तमातें ॥ कीं आवडे जें तुज सांग मातें ॥ २३ ॥ ओंवी ॥ माझे आवडीची कथा ॥ तुवां पुशिली गा नृपनाथा ॥ भावें भजावें भगवंता ॥ अन्य सर्वथा नावडे ॥ २४ ॥ भावें करावें हरिपूजन ॥ साष्टांगेंशीं अभिवंदन ॥ नित्य नमावे साधूजन ॥ अनन्य भजन हरिभक्ती ॥ २५ ॥ श्लोक ॥ उपजातिवृ० ॥ प्रल्हाद बोले सदन त्यजावें ॥ तपोवनालागिं अगत्य जावें ॥ तिथें भजावें हरिच्या पदातें ॥ जो आपदातें हरि दे पदातें ॥ २६ ॥ दैत्येश्वरा आवडि हेचि मातें ॥ कीं सेवणें श्री पुरुषोत्तमातें ॥ त्यजून विष्णूस भजे गृहातें ॥ तो आपुला घात करी स्वहातें ॥ २७ ॥ दुःखार्णवीं जो धरि कास याची ॥ चिंता तयाला मग कास-याची ॥ ना विसिरावेंचि कदापि त्याला ॥ प्रल्हाद इत्यादि वदे पित्याला ॥ २८ ॥ चाल ॥ प्रल्हाद धरुनि आल्हाद म्हणे जनका ॥ गृहसंग त्यजुनि सेवणें जगज्जनका ॥ भुलूं नयेचि सुझें या कांता कनका ॥ परिसे कनकंकशिपु मग हांसे गुरुसि म्हणे सहसा ॥ मुला न विसंबुनि रक्षित असा ॥ प्रल्हा० ॥ ३ ॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित ॥ परिसतां असुरेश्वर हांसिला ॥ मग म्हणे कवणें शिशु नाशिला ॥ शिकविलें बरवें अथवा जसें ॥ वदति तेंचि मुलें अशि राजसें ॥ २९ ॥ श्लोक ॥ भुजंगप्र० ॥ म्हणे हा करावा गुरूनें विचार ॥ स्वयें ठाउके लेंकरा काय चार ॥ हरी आमच्या वाइटाचा भुकेला ॥ तयाचा जनीं हा कुळीं भेद केला

---

१ हिरण्यकशिपु. [illegible] गुरु. ३ आनंदयुक्त. ४ ऐकत. ५ यथार्थज्ञान. ६ श्रेष्ठता. ७ आंकड्यांनीं. ८ हिरण्यकशिपु.

॥ ३० ॥ गुरूतें असें दैत्य सांगूनि धाडी ॥ तया वाटली गोष्ट ही देव-धाडी ॥ भिऊनी मनीं तर्क नाना करीती ॥ तया पूसती विप्र सामादि रीतीं ॥ ३१ ॥ **पद** ॥ **गुरू** पुसति तुज कुमति कुठुनि अशी सांग असे लाधली ॥ म्हणे तो हरिकरुणें साधली ॥ धिक्कारुनि बहु पुनः गुरूंनीं असुर-नीति बोधिली ॥ शिके मनीं त्याज्यपणें बाधिली ॥ **दिंडी** ॥ राज-पुत्रा तुज बुद्धि अशी कोणीं ॥ दिली सांगे ही त्वरित कपटवाणी ॥ स्वकीयांनीं कीं बोल परकियांनीं ॥ जिला त्वद्गुरु गुरु—शिक्षिताचि मानी ॥ ३२॥ **श्लोक** ॥ **शिखरिणीवृ०** ॥ म्हणे श्रीप्रल्हाद स्वपर म्हणुनी भ्रांति उकली ॥ केली ईर्ष्या मूळें असुर अमरीं आणि सकळीं ॥ कळी हृत्पद्माची उकलिल कशी मोहरजनी ॥ जनीं ऐशा मूढी मति न धरितां विष्णुभजनीं ॥ ३३ ॥ **ओंवी** ॥ चुंबक संन्निधि लोह जैसें ॥ चंचळ होतसें अपैसें ॥ श्रीहरि सान्निध्यें उल्हासे ॥ माझी मति हे तैशी ॥ ३४॥ **श्लोक** ॥ इंद्रवज्रा ॥ तों बुद्धि कोपें खवळे द्विजाची ॥ जाची म्हणे टाकि कथा अजाची ॥ बाभूळ हे चंदनकाननासी ॥ नाशील भेटून निरं-जनासी ॥ ३५ ॥ **ओंवी** ॥ म्हणे आणारे माझें वेत्रें ॥ वाचाळ बोले हा अपवित्र ॥ ऐसा निर्भर्त्सुन राजपुत्र ॥ पुनः निजविद्या शिकविती ॥ ३६ ॥ **साकी** ॥ शिकविति कविसुत राजसतामस कविता बहु निज नीति ॥ परिसे तो गुरु जवळि म्हणे परि वमनापरि मानी ती ॥ ३७ ॥ गुरु पढवुनि मग नेति नृपात्मज भेटविती जनकातें ॥ तोहि विलोकुनि मुदित-हृदयें त्या बैसवि निज अंकातें ॥ ३८ ॥ **श्लोक** ॥ वसंत० ॥ बा शीकलासि गुरुपासुनि जो पसारा ॥ सारा असो तुज रुचे वद त्याच सारा ॥ गोष्टी वदे कुशल यावरि ज्या पित्याला ॥ त्या लागतील मधुरा न कदापि त्याला ॥ ३९ ॥ मालिनी ॥ श्रवण हरिकथेचें कीर्तनीं गात जावें ॥ स्मरण चरण सेवा अर्चनींही भजावें ॥ नमन करुनि दास्यें सख्य आत्मा-र्पणातें ॥ करिति तरति वाटे सार हें आपणातें ॥ ४० **पद** ॥ पिता फिरुनि रुचि पुस-तांचि वदे जे हृदयीं शोधिली ॥ सदां मन्मति हरिनें वेधिली ॥ चाल ॥ कीं श्रवण कीर्तना-दिक भक्ती नवविधा ॥ मज रुचे भवार्णवीं तारक होचि सुधा ॥ ऐकतांचि खवळे खळ करि मति तद्वधा ॥ अनळगरळ जळ शैलपात गजबंध करी आळसा ॥ त्यजुनि तो दैत्य शिणे विफळसा ॥ प्रल्हा० ॥ ४१ ॥ **श्लोक** ॥ पृथ्वीछंद ॥ हिरण्यकशिपु स्वयें परिसतां अशी वैखरी ॥ म्हणे गुरुसुता तुझी कपट-मित्रता हे खरी ॥ पुरोहित म्हणे न मी न जन अन्य हा भाव दे ॥ अजीं सहज बुद्धि हे तव कुमार जें जें वदे ॥ ४२ ॥ द्रुतविलंबित ॥ गुरुमुखें न अरे जरि शीकशी ॥ कुमति ऊद्भवली तुज हे कशी ॥ सुत म्हणे विषयांत सदा पित्या ॥ अशि न बुद्धि नरासि कदापि त्या ॥ ४३ ॥ इंद्रव० ॥ हे तों गुरु पापतरू म्हणावे ॥ अंधासवें अंध तसे गणावे ॥ दे प्रीति कृष्णीं गुरु तोचि साच ॥ श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच ॥ ४४ ॥ **दिंडी** ॥ असें वर्णित वर्णित श्रीधराला ॥ त्याच मांडीवरि समा-धिस्थ झाला ॥ तदा होउनियां रुष्ट त्या खळानें ॥ अहो भूमीवरि लोटिला बळानें ॥ ४५॥ **श्लोक** इंद्रव० ॥ याचा वधी जो चुलता सखा रे ॥ हा त्यास पूजी तुम्ही यास खा रे ॥ दांतें नखें पर्वतशस्त्रपातें ॥ मारा म्हणे सत्वर निस्त्रपातें ॥ ४६ ॥ उपजा० ॥ ते मारिती बाप म्हणेचि मारा ॥ मारा न लागे तरि त्या कुमारा ॥ न तोडितें खड्ग रुते न भाला ॥ भाँ लागते कीं तम हो नभाला ॥४७॥ **आर्यागीति** ॥ सेवक हो तनयाला होमा ज्वलनांत अन्य अंत

---

१ तुझा बाप. २ कलह. ३ छडी. ४ बापास. ५ हर्षयुक्त. ६ निर्लज्जातें. ७ प्रकाश

न याला ॥ दहनाचि जेविल यातें पावो कुमति पतंग जेविं लयातें ॥ ४८ ॥ **श्लोक** ॥ चंपू ॥जगदीशनिदेशमंतरा दहनो नैष दहे किंचन ॥ यदि तत्र भवेत् स्वतंत्रता जठरस्थो न दहेत किं वपुः ॥ ४९ ॥ **अर्थ**—अग्नि हा जगदीश्वराच्या आज्ञेवांचून कांहीं एक जाळण्याला समर्थ नाहीं. जर त्याला स्वतंत्रता असेल तर मग जठराग्नि आपल्या शरीरास कां दग्ध करणार नाहीं ? ॥ ५० ॥ **आर्यागीति** ॥ ते निर्दयमानस खा यातें ऐसें वदून पवमानसखा यातें ॥ लाविती परि तोयासी धाकें न शिवे तदा जसा यातें ॥ ५१ ॥ **चंपुगद्य** ॥ भो वन्हे त्वमिदानीमस्मत्कार्यं साधय सकल ब्रह्मांडदहनसमर्थे त्वयि पलायमनोऽयमर्भकः कियानास्ते ततो निर्दग्धुमुद्यतो वन्हिरपि प्रोच्छलदमरतरंगिणी-जलकल्लोलायमान इव हरेः प्रासादादासीत् ॥ ५२ ॥ **अर्थ**—हे अग्ने, या वेळेस तूं आमची कार्यसिद्धि कर. सकळ ब्रह्मांडें जाळण्यास समर्थ जो तूं त्या तुझे ठायीं पडणारा हा बालक म्हणजे काय पदार्थ आहे ? नंतर त्यास जाळण्याविषयीं अग्नि प्रवृत्त झाला असतांहि श्रीहरीच्या प्रसादेंकरून भरून चाललेल्या भागीरथीच्या उदकांतील लहरीप्रमाणें शीतल झाला ॥ ५२ ॥ **श्लोक** ॥ शिखरिणीवृत्त ॥ अरे यासी बांधा भुजग भुजपाशें करुनियां ॥ समुद्रीं हा टाका चपळ करिं शेंडी धरुनियां ॥ निराळीं लोटा हो अचळशिखराग्रावरुनियां ॥ मला वाटे ऐसा कुमति सुत जावा मरुनियां ॥ ५३ ॥ **आर्या** ॥ न मरे यास्तव नेला पर्वत शिखरासि लोटिला खोलीं ॥ परि तो निर्भय चित्तीं वाहे नारायणासि लाखोली ॥ ५४ ॥ **अभंग** ॥ बांधोनी पाषाण बुडविला सागरीं ॥ ठेविलेल्या वरी शिळा थोर ॥ १ ॥ **चंपू** ॥ वसंततिलका ॥ कुंभोद्भवेन मुनिना॥ बत शोषितस्त्वं संपादितोऽसि हरिणांऽघ्रिजलैः पुनर्यत्॥ मत्स्वामिनः स्मरसि चेदुपकारमेतं तद्वारिधे मयि विदेहि कृपामिदानीं ॥ ५५ ॥ **अर्थ**—हे समुद्रा, पूर्वीं तुला कुंभोद्भव मुनि जो अगस्त्य त्यानें प्राशन केलें होतें,परंतु पुनः माझ्या स्वामीनें आपल्या चरणोदकेंकरून तुला पूर्ण केलें. तो उपकार जर तूं स्मरत असशील तर या वेळेस तूं मजवर कृपा कर ॥ ५५ ॥ **अभंग** ॥ आप नारायण रक्षी निजदासा ॥ लोटुनी सहसा कडे लावी ॥ १ ॥ न बुडोंचि कांहीं करितां उपाव ॥ रक्षी तया देव मागें पुढें ॥ २ ॥ तुका म्हणे देव भक्तां साह्यकारी ॥ रक्षी नानापरी संकटीं तो ॥ ३ ॥ ॥ ५६ ॥ **ओंवी** ॥ राजा जाउनि एकांता ॥ पाचारिली निजकांता ॥ कयाधू परम पतिव्रता पतिवचनार्थ सादर ॥ ५७ ॥ राजा म्हणे निष्ठुर देख ॥ तुज ऐकतां वाटेल दुःख ॥ परी मीं बोलतों अवश्यक ॥ द्यावें विष प्रल्हादा ॥ ५८ ॥ तुज काय प्रल्हादाची चाड ॥ किंवा वैधव्यपणाचें कोड ॥ दोहींमाजीं कोण गोड ॥ जिवा दृढ आवडे ॥ ५९ ॥ येरी म्हणे राया सर्वज्ञा ॥ जन्मवरी केली नाहीं अवज्ञा ॥ अवश्य करीन आजि आज्ञा ॥ अशुभ प्राज्ञा कां वदतां ॥ ६० ॥ **दिंडी** ॥ असें बोलुनियां गरळ ते कयाधू ॥ सिद्ध करितां ये तनय महा साधु ॥ म्हणे माता मग सख्या तुला तातें ॥ वीष द्याया कथियलें आजि मातें ॥ ६१ ॥ **साकी** ॥ ज्या हातें तुज दूध पाजिलें, लेवविलीं आभरणें ॥ कर्मगती अति दुर्घट सखया त्या हातें तुज मरणें[1] ॥ ६२ ॥ **आर्या** ॥ मन्मातुरिंदिरायाः किमु नः ज्ञातं सहोदरं गरलम् ॥ मातुलतामुपयातं तस्मादस्मासु किं मयं भवति ॥ ६३ ॥ **अर्थ**—माझी मुख्य

---

[1] मरण.

माता जी लक्ष्मी तिचें विष हें सहोदर म्हणजे सख्खें बंधु होय. कारण लक्ष्मी आणि विष दोन्ही समुद्रांतून उत्पन्न झालीं आहेत. अर्थात् विष हें नात्यानें माझें मातुल होतें. मग त्यापासून मला भय काय आहे ? ॥ अभंग ॥ वाटीभरी विष दिलें प्रल्हादासी ॥ निर्भय मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन ॥ प्रतापें जीवन झालें तुझ्या ॥२॥ नामाच्या चिंतनें विषाचें अमृत ॥ जाहलें देखत नारायणा ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे तुझे बडिवार ॥ शिणला भूधर वर्णवेना ॥ ४ ॥ ६४ ॥ श्लोक ॥ चंपू० ॥ न विषं विषमेव सर्वदा न सुधा वाऽपि सुधा भवेत्सदा ॥ विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया ॥ ६५॥ अर्थ—विष हें सर्वकाळ विष होत नाहीं आणि अमृतही सर्वकाळ अमृत होत नाहीं. तर ईश्वराच्या इच्छेनें विष हें क्वचित् अमृत होतें आणि अमृतही क्वचित् विष होतें ॥ आर्या ॥ जे जे घात नियोगी तेथुनि वांचे नये क्षमा राया ॥ घाली तैलकटाहीं पाक कराया समक्ष माराया ॥ ६६ ॥ झालें तैल सुशीतळ नामश्रवणें मुरारिच्या सकळ ॥ ऐसें पाहुनि रामें अधिकाधिक तो करी तयास कळ ॥ ६७ ॥ जिकडे बांधुनि नेती तिकडे तो जाय परि न ये निधन ॥ कैंचीं विघ्न दरिद्रें येतिल असतां रमेश-नाम-धन ॥ ६८ ॥ श्लोक ॥ वसंतति० ॥ चिंतार्णवांत बुडतां असुरोत्तमातें ॥ वाटे तदा मरण याचि निमित्त मातें ॥ तों नीतिनें करिति ते द्विज बोध राया ॥ कीं बाळचेष्टित न योग्य मनीं धराया ॥ ६९ ॥ दिंडी ॥ बुडे चिंतासागरीं असुरराजा ॥ म्हणे होइल यामुळें मृत्यु माझा ॥ तयीं वदती गुरुपुत्र महावीरा ॥ नसे चित्तीं चिंतेस हेतु धीरा ॥ ७० ॥ बालचेष्टित हें काय मनिं धराया ॥ योग्य तुजला वद त्रिभुवनैकराया ॥ करिति बालक अनिवार अशा लीला ॥ नसति कारण या कधिंच काळजीला ॥ ७१ ॥ श्लोक ॥ वसंतति० ॥ राजा म्हणे मग तयाच पुरोहितातें ॥ कीं यास न्या स्वसदनीं शिकवा हितातें ॥ ऐसा करा त्वरित कीं धरि लोकरीती ॥ नेऊन ते द्विज घरास तसें करीती ॥ ७२ ॥ पद ॥ एक दिनीं गुरु विद्या—सदनीं विद्यार्थि पढवितां ॥ निघे गृहकार्य सहज तत्त्वतां ॥ सांगुनि नियमित पाठ मुलांना पाठ कराया स्वतां ॥ होय निजकार्यवशें चालता ॥ संधि बघुनि तो सुबुद्धि नृपसुत सोडुनि गुरुशिक्षिता ॥ करी उपदेश दैत्यसुत हिता ॥ चाल ॥ हें जन्म सदुर्लभ क्षणिकहि उपकारी ॥ बा यांत भजावा ईश्वर कौमारीं ॥ कीं विषयलाभ हा सुलभचि संसारीं ॥ भूलूं नका तुम्हि अशा प्रपंचा क्षणमात्रीं विरसा ॥ सदा हरि हृदयीं चिंतुनि असा ॥ प्रल्हा० ॥ ९ ॥ भागवत श्लोक ॥ कौमार आचरेत्प्राज्ञो धर्मान् भागवतानिह ॥ दुर्लभं मानुषं जन्म तदप्यध्रुवमर्थदम् ॥ ७३ ॥ अर्थ — बुद्धिमान् पुरुषानें कौमार अवस्थेंतच भागवत धर्म आचरण करावें. कारण हें मनुष्यजन्म फार दुर्लभ आहे; आणि तें क्षणिक असून मोक्षरूप अर्थ देणारें आहे. ॥ पद ॥ गड्यांनो ध्या हरिच्या नामा ॥ लिहितां कशास ओनामा ॥ ध्रु० ॥ सांगतों ऐका एक वर्म ॥ पहावे भागवती धर्म ॥ दुःखसें प्राप्त होय शर्म ॥ यत्न त्या कशास हो परम ॥ न पावे हरिवांचुनि क्षेमा ॥ लिहि० ॥ १ ॥ शरण सद्गुरुला जावें ॥ हरिभजनीं नच लाजावें ॥ हरिचें सगुण रूप ध्यावें ॥ निर्मळ भावें पूजावें ॥ सांडुनि हृदयांतील कामा ॥ लिहितां क० ॥ २ ॥ गृह धन जन यांची ममता ॥ धरूनी व्यर्थचि कां श्रमतां ॥ हृदयीं बाणवुनि समता ॥ हरिचें चरणांबुज नमितां ॥ नेइल हरि तो निजधामा ॥ लिहितां क० ॥ ३ ॥७४॥ पद ॥ कामक्रोध निजबोध विघातक पातक मूळ खरें ॥ जिणावें आधीं पुरुषवरें ॥ लोभ कुमतिचा कोंभ

करि मनःक्षोभ निजप्रसरें ॥ जयास्तव जीवतत्त्व विसरे ॥ नरकाचें हें द्वार त्रिविधही नर जरि सुविचारें ॥ त्यजिल तरि होय सुखी बारे ॥ चाल० ॥ यासाठीं सांगतों तुम्हां नका मर्वि गुंतूं ॥ हे विषय भोगिती सकलहि जीवजंतू ॥ तुम्हीं हरिचरणा भजा नका धरूं किंतू ॥ संतुष्ट करा प्रभु कष्ट नसति बहु इष्ट जगीं हरिसा ॥ नसे त्या झगटारे परिसा प्रल्हा० ॥६॥ ॥ श्लोक ॥ द्रुतवि० ॥ उमजला मजला हरि ज्या मुखें ॥ गुरुच तो रुचतो हृदयीं सुखें ॥ शिकविणें कवणें मज त्याविना ॥ निजपणीं जपणीं जड दाविना ॥ ७६ ॥ पद ॥ उदंड यापरि तत्पांडित्या षंड उभा राहुनी ॥ परिसतां चंड कोपतो मुनी ॥ तसाच गेला बहु रागेला असुरराजसदनीं ॥ वदे सुत-वृत्त मुळापासुनी ॥ दैत्य तत्क्षणीं रक्त ईक्षणीं होय रुष्ट नंदनीं ॥ तया मग आणवि पाचारुनी ॥ चाल ॥ येतांचि करी तो निज जनका प्रणती ॥ दुर्जनासि झाली अति दुःसह पण ती ॥ हा प्रसंग दारुण दुरून जन म्हणती ॥ तो अदांत खाउनि दांत करावा अंत ह्मणे अरिसा ॥ वदे मग क्रोधजवा सरिसा ॥ प्रल्हा० ॥७॥ श्लोक ॥ उपजाति० ॥ गालिप्रदानी न करूनि वाणी ॥ वाणी वदे हो अपवित्र वाणी ॥ ह्मणे खळा दैत्यकुळाधमातें ॥ मारीन जो तूं न भिशीच मातें ॥ ७६ ॥ इंद्रवज्रा०॥ मी क्रुद्ध होतां मज लोक सारे ॥ भीती मशीं एक न तूं कसारे ॥ या शासना लंघिशि दुर्गमातें ॥ कोण्या बळें सत्वर सांग मातें ॥ ७७ ॥ पद ॥ शक्रहि भिवई वक्र पाहतां भीत मनाभीतरीं ॥ न कशि मद्भीति तुला अंतरीं ॥ त्रिभुवननायक मी तूं जोडिसि मद्रोषा कां तरी ॥ निजायुःसूत्र न बा कातरी ॥ कवणाचें बळ खळा असे तुज कोणाची खातरी ॥ सांग मी वधितों तुज नातरी ॥ चाल ॥ प्रल्हाद वदे मग पित्या जयाच्या बळें ॥ पशुपाक्षि मनुज देवतावृंद चळवळे ॥ तेज जयाचें सकळांहुनि आगळें ॥ त्याचें बळ मज तुम्हां जगासहि नचि संशय सहसा ॥ सत्य कीं अनृत श्रुतीला पुसा ॥ प्रल्हादा० ॥ ८ ॥ श्लोक ॥ वसंततिलका ॥ माझें तुझेंच बळ तो इतकेंच नाहीं ॥ त्यानेंच कीं बळ असे सकळां जनांही ॥ तूं शत्रु मानिसि तया असुर स्वभावें ॥ तो टाकिसील मग देखसि आत्मभावें ॥ ७८ ॥ घनाक्षरी ॥ प्रल्हादाशीं दैत्य थोर ॥ म्हणे मज थोर थोर ॥ भीति बोलतां समोर ॥ भे न वाटे तुजला ॥ १ ॥ तूं ना तरुण किशोर ॥ पांच वरुषांचें पोर ॥ म्हणसी साजण हे चोर ॥ नागविती मजला ॥२॥ बोल बोलशी तिखट ॥ मरूं पाहसी फुकट ॥ मृत्यु आलासे निकट॥ नाहीं तुज समजला ॥ ३ ॥ तुझा मी प्रत्यक्ष काळ ॥ हांका मारून विशाळ ॥ आणि तुझा रक्षपाळ ॥ लपें जाणों लाजला ॥ ४ ॥ ७९ ॥ चंपु ॥ स्रग्धरा ॥ यस्मादुत्पन्नशंकाः प्रतिभटपृथिवीनायकाः सायकांकाः कौपीनांकाः कथंचिद्गिरिवरशिखरे वासरान्वाहयंति ॥ नम्रीभुतेंद्रमुख्यामरमुकुटमणीराजिनीराजितांघ्रे र्मत्तोऽन्योऽस्ते परः कस्तवे जगति विभुर्व्योमपुष्पायमाणः ॥८०॥ अर्थ—माझे प्रतिस्पर्धी जे जे पृथ्वीपति राजे ते ते माझ्या भीतीनें धनुष्यबाणादि चिन्हें टाकून कौपिन धारण करीत होत्साते पर्वताचे दरींत राहून कसे तरी दिवस घालवितात आणि इंद्रादि देव नम्र होऊन आपल्या मुकुटांतील रत्नदीपांनीं ज्याच्या चरणांस नीरांजन करतात, त्या मजवांचून या जगांत आकाशपुष्पासारखा तुझा प्रभु कोण आहे?॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित० ॥ त्रिभुवनेश्वर जो मज वेगळा ॥ तुज गमे सकळांहुनि आगळा ॥ जरि दिसेल अरे मज ईक्षणीं[1] ॥ वधिन त्याचिपुढें तुज ये क्षणीं ॥ ८१ ॥ पद ॥ भुजंगसा मग खवळे

[1] वेग.

दुर्जन तर्जन करुनी पुसे ॥ खळा वद कवणे स्थळिं तो असे ॥ प्रल्हाद म्हणे न वाद येथें स्थिर चर व्यापुनि वसे ॥ मनोजय करितां मग गवसे ॥ असुर म्हणे या स्तंभीं न दिसे तनय म्हणेची दिसे ॥ करी मग मुष्टिघात भ्रमवशें ॥ **घनाक्षरी** ॥ अरे तुझा कोठें देव ॥ म्हणे सर्व वासुदेव ॥ विश्वपटीं स्वयमेव ॥ तंतु तोचि वसतो ॥ १ **आर्या** ॥ नष्टप्रज्ञा, वद रे कोठें जगदीश तो तुझा आहे ॥ प्रल्हाद म्हणे मत्प्रभु सर्वगत ज्ञानदृष्टिनें पाहें ॥८२॥ **घनाक्षरी** ॥ दैत्य म्हणे अरे थांब ॥ गोष्टी ठेवीं लांब लांब ॥ मज समोर हा खांब ॥ येथें कैसा असतो ॥२॥ **अभंग** ॥ कोपोनियां पिता पुसे प्रल्हादासी ॥ सांगे हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं ॥ आहे वनमाळी जेथें तेथें ॥ २ ॥ **घनाक्षरी** ॥ म्हणे स्तंभ दारुरूप ॥ दारूमध्यें चित्स्वरूप ॥ थिजलें तथापि तूप ॥ रस तो न भासतो ॥३॥ तरी दिसे न का मज ॥ म्हणे भजोनि समज ॥ प्रत्यक्षही अधोक्षज ॥ दिसेना तो दिसतो ॥ ८३ ॥ **श्लोक**॥ शिखरिणी० ॥ असे रे तो कोठें तुज बहु जयाचे भरंवसे ॥ वसे सर्वांठायीं स्थिरचरपटीं तंतु गवसे ॥ दिसेना कां स्तंभीं मज दिसतसे तो नरहरी ॥ हरी तो दुष्टांचे त्वरित मद जो एकचि हरी ॥ ८४ ॥ असे स्तंभीं ऐसा श्रवणिं पडतां शब्द असुरा ॥ सुरापानीं मत्त स्वहित विषयीं जो निदसुरा ॥ सुराधीश द्वेषें करुनि दृढ खड्गें क्षयकरें ॥ करें हाणी मुष्टी वळुनि खळ खांबास निकरें ॥ ८५ ॥ **अभंग** ॥ खांबावरी मूठ मारिली दुर्जनें ॥ स्तभीं नारायण प्रगटला ॥३॥ तुका म्हणे ऐसा खांब कडाडला ॥ ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ४ ॥ **आर्या** ॥ आहे स्थाणूंत अशी ऐकुनि वाक्यें स्वखड्ग महिवरला ॥ उचली भेद कराया तेव्हां क्षीरोदजेश गहिंवरला ॥ ८७ ॥ **श्लोक** ॥ स्वागता० ॥ स्तंभ तो अवचितांचि कडाडी ॥ अब्जजांड अवघेंचि खडाडी ॥ अब्जजादि हृदयांत धडाडी ॥ कालमेघ शतनाद गडाडी ॥८८॥ **घनाक्षरी** ॥ ध्वनी उठला अखंड ॥ व्यापी द्वीप खंड खंड ॥ वाटे करी खंड खंड ब्रह्मांड विदारुनि ॥ १ ॥ दिग्गजांचे चंड चंड ॥ भग्न होती शुंडादंड ॥ लेंडे टाकिती उदंड ॥ पायुवायु सारुनी ॥ २ ॥ भ्याले दैत्य भंडभंड ॥ दानवेंद्र मुंडमुंड ॥ होती त्यांचे पिंडपिंड ॥ रोमांच उभारुनी ॥ ३ ॥ रात्रिंचर कलमंड ॥ झाले षंढ थंड थंड ॥ जेव्हां सिंह रणशौंड ॥ निघे हांक मारुनी ॥४॥ ८९॥ **श्लोक** ॥ उपजाति० ॥ खरी कराया निजभक्तवाणी ॥ आणी स्वकीं व्यापितसे हीन वाणी ॥ स्तंभीं सभे अद्भुत रूप दावी ॥ मनुष्य ना सिंह तनू वदावी॥ ०॥चाल॥ तत्क्षणीं कडाडुनि खांब अंबरा या ॥ ध्वनि जाय अंतरीं भीति दैत्यराया ॥ जाहला प्रकट नरसिंह भक्तराया ॥ रक्षाया नाखिं असुर विदारी उरिं सायान्हीं तसा ॥ विधीचा वरहि नुलंघे जसा ॥ ९ ॥ चंपु ॥लोकानाकुलयन्नभं कवलयन् [illegible] कंपयन् ॥ भूगोलं चलयन् गिरीन्विदलयन्नंमोधिमुद्वेलयन् ॥ दिग्वृंदं [illegible] नवा ।वकस यन् [illegible]डमास्फोटयन् ॥ स्तंभोदा विरभूद्देव प्राति वैवैकुंठ कंठीरवः॥९१॥ **अर्थ**—सर्व लोकांस व्याकुल करीत, आकाशास ग्रासीत' दिग्गजांस भयानें कांपवीत, भूगोलास हालवीत, पर्वतांस चूर्ण करीत, समुद्रांस उचंबळवीत, दश दिशांस भ्रमवीत, भक्तांचे मनास उल्हासवीत, आणि सकळ ब्रह्मांडमंडपास शब्दाच्या प्रतिध्वनीनें फोडीत भगवान वैकुंठवासी विष्णु नृसिंहरूपानें स्तंभापासून प्रगट झाला ॥ ९१ ॥ **आर्या** ॥ कृतयुग माधव शुक्लीं भूततिथि मंदवार अनिलेक्ष ॥ वेळा संध्यामुख तैं स्तंभीं प्रगटे मुकुंद हर्यक्ष ९२ ॥

---

१ भय. २ वैशाख. ३ चतुर्दशी. ४ नरसिंह.

श्लोक ॥ द्रुतवि० ॥ मनुजरूप नव्हे नरकेसरी ॥ कनकवर्ण कटीं पट केसरी ॥ सकळ सृष्टि करूं न शके सरी ॥ प्रगट होय असा नरकेसरी ॥ ९३ ॥ विधिवर प्रतिपाळक जो हरी ॥ न दिवसांत निशींतहि मंहरी ॥ म्हणुनि युद्ध निशामुखिं तो करी ॥ मग वधी बुडतां रवि लौकरीं ॥ ९४ ॥ न धरणीवरि मृत्यु न वा नभीं ॥ वर असा ह्मणऊनीच तो न भी ॥ निजतनूवरि त्या खळशेखरा ॥ चिरि धरूनि करी वर तो खरा ॥९५॥ भुजं०॥ न गेहीं न बाहेरिं यालागीं दारीं ॥ बसे उंबरां पोट त्याचें विदारी ॥ सजीवें अजीवें मरेना तसाची ॥ चिरूनी नखें तो करी गोष्ट साची ॥ ९६ ॥ चंपु ॥ बहुधा शिशुवेदनाः कृता न तदाऽप्यास्य दया मनागपि ॥ तदमुष्य दुरात्मनो मया हृदयं कीदृशमित्यवेक्ष्यते ॥ ९७ ॥ अर्थ—आपल्या लहान मुलास यानें जेव्हां अनेक भयंकर यातना केल्या तेव्हां याच्या मनांत अल्पही दया उत्पन्न झाली नाहीं. तर या दुरात्म्याचें हृदय कसें आहे हें मी अवलोकन करितों ॥ पद ॥ उग्राकृति मग मांडीवरि त्या मांडी नरहरि खला ॥ तदा सुरसमूह बहु हरिखला ॥ जाणो हरिनें धरूनि निजांकीं असुरपती जोखला ॥ म्हणे तो मज पडली शृंखला ॥ प्रखर नखीं रिपु उदरिं विदारुनि तद्रुधिरें माखला ॥ गळा धरि अंत्र मनीं तोखला ॥ चाल ॥ पाहुन उग्र तनु भीति सुर सारे ॥ इंदिरा जाहली हृदयीं विरसारे ॥ प्रल्हाद तृषित नरसिंह कृपांबु तुषारें ॥ सिक्त होउनी सक्त पदांबुजिं भक्त दया सरसा ॥ नमी त्या शिरसा वा मनसा ॥ प्रल्हादाचें सुजनाल्हादक० ॥ जयास्तव० ॥ १० ॥ श्लोक ॥ द्रुतवि० ॥ चुळबुळे निसटे करि तांतडी ॥ असुर तो हरि काढुनि आंतडीं ॥ उदर फाडुनि घालितसे गळां ॥ करि सुमंगळ देव अमंगळ ॥ ९८ ॥ आर्या ॥ जंघाधार नियोजुनि त्याचें स्वनखीं विदारिलें उदर ॥ जयजयकार नभीं बहू सुर करिती जयां मनांतही न दर ॥ ९९ ॥ उठला तेथुनि मग त्या प्रल्हादाला चहूं भुजीं कवळी ॥ रूपें क्रूर भयंकर पाहुनि कोणी नये तया जवळीं ॥ १०० ॥ श्लोक ॥ द्रुतविलं० ॥ स्वपितयास न हो अधमा गती ॥ म्हणवुनी विनवी शिशु मागुती ॥ हरि म्हणे सुत ज्यास असा असे ॥ सुगति पावति पातकिही असे ॥१०१॥ आर्या ॥ आपण भक्तिसुखास्तव परमानंदें तदीय गेहातें ॥ राहे निश्चळमानस तत्कृत पूजादि सर्व घे हातें ॥ १०२ ॥ तात्पर्य— प्रल्हादाच्या वचनाप्रमाणें सर्व भूतांत परमात्म्याची व्याप्ति आहे हें नारायणांनीं स्तंभांत अवतार धरून प्रगट केलें. यावरून जळ, स्थळ, काष्ठ, पाषाण इत्यादिकांत ओतप्रोत हरीच भरला आहे. हा आशय मनांत आणून रंगनाथ स्वामी म्हणतात—अवघा तूंचि हरी० ॥ हेंचि दान देगा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥१॥ गुण गाईन आवडी ॥ हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥ नलगे मुक्ति धनसंपदा ॥ संतसंग देगा सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे गर्भवासीं ॥ सुखें घालावें आम्हासी ॥ ४ ॥ आरती नृसिंहाची ॥ कडकडिला स्तंभ गडगडिलें गगन ॥ अवनी होत आहे कंपायमान ॥ [illegible] नक्षत्रें पडतातीं जाण ॥ उग्ररूपें प्रगटे तो सिंहवदन ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय नरहरिराया ॥ आरती ओंवाळूं महाराजया ॥ ध्रु० ॥ एकवीस स्वर्गमाळा डळमळली कैशी ॥ ब्रह्मयाचे वाटे अभिनव चित्तासी ॥ चंद्र सूर्य दोनी लोपति प्रकाशीं ॥ कैलासीं शंकर दचके मानसीं ॥ २ ॥ जय० ॥ थरतरती त्या जटा जिव्हा ळळळित ॥ तीक्ष्ण नखें तो दैत्य विदारित ॥ अर्धांगीं कमळजा शेष छाया धरित ॥ माधवदासा स्वामी नरहरि शोभत

---

१ नरसिंह. २ भय.

॥ ३॥ जयदे० ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ अच्युतं केशवं रामनारायणं ॥ कृष्णदामोदरं वासुदेवं भजे ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ नारायणनारायण इति भजनं ॥ पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ जानकीजीवनस्मरण जयजय राम ॥ इति नृसिंहजन्माख्यान संपूर्णम् ॥

---

## कथा ७ वी.

# शिवरात्रिचरित्राख्यान पूर्वरंग निरूपण.



श्रीमन्मंगलमूर्तयेनमः ॥ अविरलमदजलनिवहं ॥ इत्यादिनमनं ॥ शिवशंकर गौरीरमणा॥ कां न ये दिनाची करुणा ॥ इति भजनम् ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहरमहादेव ॥ जानकीजीवनस्मरण जयजयराम ॥ पद ॥ भज भज भवजलधिमाजीं मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ सांडुनिया विषय वमन ॥ झडकरि करि षडरिदमन ॥ पुजी मन हें करुनि सुमन ॥ गिरिजाधवाला॥ भजभज० ॥१॥ घडिभरि मन करुनि विमल ॥ धरिशिल दृढ चरणकमळ ॥ तरिच सकल पाप शमल ॥ त्यज रे भवाला ॥ भज० ॥ २ ॥ सावध हो करिशि काय ॥ शंकर गुरु बापमाय ॥ चिंतुनि कवि राम-पाय हृदयीं निवाला ॥ भज० ॥ ३ ॥ आदौ कीर्तनारंभीं कविवर्य रामजोशी जीवांना संसारसमुद्रांतून तरण्याविषयीं उपाय सांगतात. ॥ भज भज० ॥ १ ॥ हे मनुजा, तूं या भवसमुद्रांत बुडतो आहेस, यांतून पार होण्याची जर तुला इच्छा आहे तर शिवपरमात्मा जो त्याचें भजन कर. आतां 'भज भज' म्हणून जी द्विरुक्ति आहे तिचें तात्पर्य हेंच कीं, इतर व्यासंगांत प्राणी निरंतर सक्त झाले आहेत, त्यांना सावध करण्याविषयीं द्विरुक्तीनें म्हणतात. ॥ भज भज० ॥ आतां कोणी म्हणेल कीं, इतर देव सोडून शिवालाच भजावें याचें काय कारण? तर संकटांत धांवणारा शंकरावांचून दुसरा कोणी नाहीं. याविषयीं नीलकंठचंपूत—कवि म्हणतात ॥ श्लोक शार्दू० वि० ॥ दृष्ट्वा कौस्तुभमप्सरोगणमपि प्रक्रांतवादा मुहुर्गीर्वाणाः कति वा न संति भुवने भारा दिवः केवलं निष्क्रांते गरले द्रुते सुरगणे निश्चेष्टिते विष्टपे, माभैष्टेति गिरोऽविरासधुरि यो देवस्वभेवेस्तुमः ॥ १ ॥ अर्थ—कवि म्हणतात. समुद्रमंथनाचे वेळीं जेव्हां कौस्तुभ, अप्सरा आणि अमृत इत्यादिक रत्नें निर्माण झालीं, तेव्हां तीं आपल्याला मिळावीं म्हणून एकमेकांशीं वाद करणारे असे केवळ स्वर्गलोकास भारभूत देव पुष्कळ होते. परंतु जेव्हां भयंकर कालकूट विष निघालें, तेव्हां भयानें सर्व देव पळूं लागले आणि त्रैलोक्य अचेतनप्राय झालें. अशा महत्संकटाचे समयीं जो 'भिऊं नका, भिऊं नका' म्हणून सर्वांसमक्ष प्रगट झाला आणि विष प्राशन करून सर्वांचें संकट दूर केलें त्याच देवाची आम्ही स्तुति करितों. तात्पर्य, सर्व देव स्वार्थनिष्ठ आहेत, शंकर तसा नाहीं, याकरितां हे मनुजा, तूं अनन्यभावानें श्रीशंकराचेंच भजन कर. म्हणून कवि म्हणतात. ॥ भज भज०॥ १॥ हा शंकर ऐहिक व परमार्थिक या दोन्ही सुखांचाही दाता आहे याविषयीं कवि चमत्कारानें

वर्णन करितात ॥ श्लोक ॥ अनुष्टुप ॥ पार्वतीफणिबालेंदुभस्ममंदाकिनीयुता ॥ पवर्गरचिता मूर्तिरपवर्गप्रदायिनी ॥ १ ॥ अर्थ—शंकराची मूर्ति पवर्गानें युक्त आहे. पवर्ग म्हणजे प, फ, ब, भ, आणि म. त्यांत अर्धांगीं पकारयुक्त पार्वती, गळ्यांत व हातांत फणी, (सर्प) मस्तकीं बालेंदु ( बालचंद्र ), सर्व शरीरास भस्म आणि जटांत मंदाकिनी ( भागीरथी ) याप्रमाणें पवर्गरचित जरी शंकराची तनु आहे, तथापि ( अपवर्ग ) पवर्ग नव्हे तो अपवर्ग म्हणजे मोक्ष देणारी आहे. ॥ २ ॥ कोणी म्हणेल, शंकर हा स्वभावानें, आचरणानें व वेषानेंही अमंगळ आहे तर याविषयीं पुष्पदंत म्हणतात ॥ श्लोक ॥ शिखरिणी० ॥ स्मशानेष्वाक्रीडा स्मरहरपिशाचाः सहचराश्चिताभस्मालेपः स्रगपि नृकरोटीपरिकरः ॥ अमंगल्यं शीलं तव भवतु नामैवमखिलं, तथाऽपि स्मर्तॄणां वरदपरमं मंगलमसि ॥ १ ॥ अर्थ—हे (स्मरहर ) मदनांतका शंकरा, स्मशानांत क्रीडा, पिशाच सोबती, चिताभस्माचें चंदन, आणि नरमुंडांची माला, याप्रमाणें तुझा स्वभाव स्थूलदृष्टच्या अमंगळासारखा वाटतो, तथापि जे तुझें स्मरण करितात त्यांस तूं परम मंगलरूपच आहेस ॥ शिवेति मंगलं नाम ॥ यावरूनही सर्व अमंगल पदार्थांस मंगलत्व देणारा शंकर आहे. तर त्याचेंच भजन करावें; या आशयानें कवि प्रथम पदांत म्हणतात. भज भज० ॥ १ ॥ शिवमूर्ति सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे याविषयीं कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ कामदा० ॥ छंदसि स्तुतां तां गुरुश्रितां, धूसरां सखे त्वं यजाततां ॥ पंचबाणविश्रामकारिणीं, विद्धि कामदां शंकराकृति ॥४॥ अर्थ—हे मनुष्या, तूं शंकराची जी आकृति आहे ती कामदा ( सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे ) असें समज. ती कशी आहे तर छंद म्हणजे वेद यांच्या ठिकाणीं स्तविलेली, गुरु जे अगस्त्यादि मुनि त्यांनीं आश्रयिलेली, सर्व जगद्व्यापक पंचबाण जो मदन त्याचा नाश करणारी, यद्वा शंकरमूर्ति कामदा ( एक छंद आहे ) असें समज. कामदा कशी ? वेदांत सांगितलेली जिच्या आधीं रगण आहे व पुढें य, ज या गणांनीं युक्त असून गुणवर्णानें आश्रयिलेली, पांच पांच अक्षरांवर विसांवा देणारी अशी आहे. याप्रमाणें शंकर सर्व मनोरथ पूर्ण करणारा असून इतरांना अनुसरणें हें कसें आहे याविषयीं अप्पय्या दीक्षित म्हणतात. ॥ श्लोक ॥ मालिनी वृत्त ॥ त्वयि सति शिवदातर्यस्मदभ्यर्थितानामितरमनुसरंतो दर्शयंतोऽर्थिमुद्रां ॥ चरमचरणघातैर्दुर्दुहं दोग्धुकामाः, कलभमनुसरामः कामधेनौ स्थितायां ॥ ५ ॥ अर्थ—हे शंकरा, तूं आमच्या मनोरथांस पूर्ण करणारा असून आम्ही आपली दीन मुद्रा दाखवून इतरांस शरण जातों हें आमचें कृत्य जसें ' कामधेनु जवळ असतांना ' मागले पाय झाडीत असल्यामुळें ज्याचें दोहन करणेंही अशक्य अशा हत्तीच्या छाव्याच्या मागें लागणें तसें आहे. तात्पर्य, शंकरभजनावांचून कधींही कामपूर्ति व्हावयाची नाहीं. तस्मात्, स्त्रीपुत्रादि प्रपंचांत कितीही आयुष्य घातलें तरी सुखाचा लेश न होतां संसारबंध मात्र दृढ होतो. याविषयीं कवि आपला उद्गार प्रदर्शित करतात. ॥ श्लोक ॥ स्रग्धरा० ॥ सारासाराविचाराद्वयमहितपरा हंत दारान् भजामः, कारागाराणि मारावनिपवशतरांस्त्यक्तजीवानुरागाः । आरादाराधनीयं नतुमदनरिपुंजन्ममारांबुधारा, पारावारावतारानुगुणमनुचराराममाराधयामः ॥ १ ॥ अर्थ—आम्हीं सार काय आणि असार काय याचा विचार न केल्यामुळें आपल्या हितास मुकलों आहों; आणि कामराज्याच्या स्वाधीन होऊन कारागृहाप्रमाणें बंधहेतु ज्या स्त्रिया त्यांसच जीवापेक्षांही अधिक प्रीतीनें आम्ही भजतों. परंतु आराधन करण्यास योग्य आणि जन्ममरणरूप संसारसमुद्रांतून

पार करणारा[1] व भक्तांस आनंद देणारा असा जो शंकर त्याचें आराधन आम्ही करीत नाहीं. हर हर ! ! एवंच संसारभ्रमानें व्याप्त अशा पुरुषांनीं शंकरास भजणें हेंच युक्त आहे, याविषयीं कवि म्हणतात ।। **आर्या** ।। जातो जडप्रसंगाद्विस्मारयति भ्रमोऽयमात्मानं ।। शुभमधुनार्द्ररसेन च सुरसं सेव्यं भजस्व चंडीशं ।।१।। **अर्थ**—हे प्राण्या, या जडरूप जगताच्या प्रसंगेंकरून झालेला हा भ्रम आत्मस्वरूपाचें विस्मरण करितो. यासाठीं कल्याणरूप आणि सर्व देवांस सेव्य जो शंकर त्याचें अनन्य प्रीतीनें भजन कर. यद्वा फार पाण्याच्या सेवनेंकरून उत्पन्न झालेली भोंड जर अगदीं बेसावध करिते तर मध आणि आल्याचा रस यांत चंडीश रस घे, म्हणजे ती भोंड नाहींशी होईल. तशीच स्वरूपाविषयक भ्रांति शिवभजनेंकरून नाहींशी होईल. इत्यादि आशय मनांत आणून कवि प्रथम पदीं म्हणतात ।। भज भज० ।। शिवशिव शितिकंठा ।। पुरवि विभो उत्कंठा ।। भजनं ।। पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ।। पार्वतीपते हरहरमहादेव ।। जानकीजीवनस्मरण जयजयराम ।। आतां शंकराचें भजन कोणी समजून मनःपूर्वक करील त्यावर शंकराची कृपा होईल यांत आश्चर्य नाहीं, परंतु न समजून सहज जरी शिवाराधन घडलें तरीही त्याचा परमेश्वर उद्धार करितो, याविषयीं कवि व्याधचरित्र निरूपण करितात.

---

# अथ शिवरात्रिचरित्र प्रारंभः



।। **पद** ।। ऐकाहो शिवरात्री कथा अति सुरस दावि शिवपथा ।। निवारूनि सकळ मनाची व्यथा ।। ध्रु० ।। माघमास हा सौख्य जनाला तारक संसृतिपथीं ।। तयांतहि कृष्ण चतुर्दशी तिथि ।। स्कंदपुराणीं स्कंदपित्याचा महिमा व्यासहि कथी ।। महामति निगमांबुधि[3] जो मथी ।। चाल ।। जो करी उपोषण साधुनी शिवरात्री ।। आदरें शिवार्चन कमळ बिल्वपत्रीं ।। कीं पाहे केवळ शिवलिंगही नेत्रीं ।। निष्पाप होति संताप नुरे त्यां ऐकति जे शुभकथा ।। निवारुनि सकळ मनाची व्यथा ।। ऐकाहो० ।। १ ।। विंध्यनिवासी व्याध एक बहु बाधक जो पशुजना ।। छळी खळ अति निर्दय सज्जना ।। कधीं एकदां पारधीस तो जाय वना निर्जना ।। क्रूरधी मान्य सदां दुर्जना ।। चाल ।। चालिला कराया विहंग मृग—कदना ।। पातला सुदैवें चुकुनि शंभुसदना ।। बहु येति जाति जन नमिति पंचवदना ।। शिवरात्रिदिनीं यात्रिक सादर अर्चिति भूर्मारथा[4] ।। म्हणे तो शिणति लोक हे वृथा ।। ऐकाहो० ।।२।। ।। १ ।। **ओंवी** ।। शुद्ध रजततगटवर्ण ।। देवालय झळकें शोभायमान ।। गगनचुंबित ध्वज पूर्ण ।। रत्नजडित कळस तळपताती ।। १ ।। मध्यें मणिमय शिवलिंग ।। भक्त पूजा करिती सांग ।। अभिषेक धारा अभंग ।। विप्र धरिती रुद्रघोषें ।। २ ।। **साकी** ।। कोइ गावत कोइ ताल बजावत कोइ ध्यावत शिव भोला ।। कोइ सुनत वह कोइ बखावत प्रभु शिवजीकी लीला ।। ३ ।। **आर्या** ।। पाहुनि तें व्याध म्हणे काय अहो नवल सर्व मूढ जन ।। सोडुनि विषयसुखातें दगडाचें करिति जडमती भजन ।। ४ ।। **ओंवी** ।। उत्तम अन्न सांडून ।। व्यर्थ कां करिति उपोषण ।। ऐसिया चेष्टा करीत तेथून ।। काननाप्रती जातसे ।। ५ ।। **साकी** ।।

---

१ पापी. २ शंकराचा. ३ वेदरूप समुद्र. ४ शिवास.

जय शिव हर जय गिरिजाप्रियकर करुणाकर जय शंभो ॥ जय पन्नगवरहार गरलधर पालय मामनिशं भो ॥ ६ ॥ ओंवी ॥ लोक नामें गर्जती वारंवार ॥ आपणही विनोदें म्हणे शिव हरहर ॥ सहज सव्य घालुनी शिवमंदिर ॥ घोर कांतार प्रवेशला ॥७॥ श्लोक ॥ मालिनी० ॥ फिरत फिरत ऐसा व्याध गेला वनासी ॥ धरुनि हृदयिं वांछा आदरें जीव-नाशीं ॥ दिनभरि न शिवे तो अन्न ना जीवनाशी ॥ मुखिं शिव शिव नामा घे अघें सर्व नाशी ॥ ८ ॥ मृग विहग तयाला एकही सांपडेना ॥ क्षुधित वनिं फिरे त्या ती निराशा घडेना ॥ अरुणीकिरणमाली जाय अस्ताद्रिभागा ॥ वैनचरहि सुदुःखश्रांत आला तडागा ॥ ९ ॥ द्रुत-विलं० ॥ कुमुदिनी मुदिता अजि त्या सरीं ॥ जलहि उज्ज्वल ज्यासि नसे सरी ॥ भ्रमर गुंजति मंजुल केसरी ॥ रुचिर कोकिल कूजति कूसरी ॥१०॥ दिंडी ॥ तटीं अत्युन्नत बिल्व-तरू आहे ॥ चढुनि त्यावरि पारधी दूर पाहे ॥ म्हणे निघतिल सावजें निशीमाजीं ॥ वधुन होइन तन्मांस तृप्त आजी ॥ ११ ॥ तया तरुवरि बहु बिल्वदळें दाट ॥ खुडुनि टाकी निशिं दिसावया वाट ॥ तळीं होतें त्या अचल दिव्य लिंग ॥ विधि-स्थापित सुरपूज्य तें अभंग ॥ १२ ॥ पडति त्यावरि तीं बिल्वदळें नीट ॥ क्षुधित टाकी जीं वरुनि व्याध नीट ॥ सहज जागर उपवास यास झाला ॥ लिंगपूजनही तोषवी शिवाला ॥ १३ ॥ घनाक्षरी ॥ निशा होय एक याम ॥ नसे व्याधा विश्राम ॥ मुखीं उपहासें नाम ॥ घेत कामशत्रूचें ॥ १४ ॥ तयीं हरिणी जलपान ॥ करूं आली गर्भिण ॥ म्हणे ओढुनि मग बाण ॥ घेऊं प्राण इयेचे ॥१५॥ आर्या ॥ व्याधें आकर्ण शरा ओढुनि तिस लक्षितांचि दीनमनें ॥ हरिणी भय-चकित म्हणे औंतरवें करुनि तत्पदीं नमनें ॥१६॥ रथमित लघु जीव वधें अजवध तच्छत समान वृषहनन ॥ शतवृषवधसम गोवध तच्छतिं तें द्विज वधींहि अघजनन ॥ १७ ॥ स्त्रीवध शतद्विजवधासम तच्छत गुणित गर्भिणी मरतां ॥ अघ होय म्हणूनि नसो मद्धननें त्वन्मती विकर्मरता ॥ १८ ॥ मी गर्भिणी अवध्या, त्यांतहि अन्याय काय बा केला ॥ म्हणुनि वधाया मातें ओढिसि शर त्यजुनि पापशंकेला ॥ १९ ॥ व्याध म्हणे अपराध न असो असो कीं क्षुधाचि अनिवार ॥ मार तुज म्हणे पाहे वाट घरीं क्षुधित सकळ परिवार ॥ २० ॥ दिंडी ॥ परी हरिणी तूं असुनि अशा गोष्टी ॥ वदसि तेणें मज नवल गमे सृष्टीं ॥ तुला पाहुनि येतसे दया पोटीं ॥ कोण अससी वद उत्सुकता मोठी ॥ २१ ॥ म्हणे हरिणी मी पूर्वभवीं रंभा ॥ सकळ इच्छित सुर जिच्या परीरंभा ॥ हरुनि सकळांच्या सुंदरत्व-दंभा ॥ स्वर्गि होतें बा पीनें सुकुचकुंभा ॥ २२ ॥ ओंवी ॥ माझें गायन ऐकावया सुरंग ॥ सुधा-पानी धांवती कुरंग ॥ मी भोगीं स्वर्गींचे दिव्य भोग ॥ स्वरूपें न मानी कोणासी ॥२३॥ मद अंगीं चढला बहुत ॥ शिवभजन टाकिलें समस्त ॥ शिवरात्री सोमवार प्रदोषव्रत ॥ शिवार्चन सोडिलें म्यां ॥ २४ ॥ आर्या ॥ सोडुनि सुधा सुरारस झाले मग मी सुरांहि सोडून ॥ कनकासुरीच रतले तत्संगें विषयभोग जोडून ॥ २५ ॥ कनकासुर—कनक—सुरा—त्यासंगें विसरले महेशासी ॥ जो निजलीलाचरितें सकल त्रिभुवन अकाम हें शासी ॥२६॥ ॥ ओंवी ॥ एकदां मनीं वाटलें पूर्ण ॥ कीं असुर गेला मृगयेलागुन ॥ इतुक्यांत घ्यावें शिवदर्शन ॥ म्हणोनि गेले कैलासा ॥ २७ ॥ मज देखतां हिमनगजामात ॥ परम क्षोभोनि शाप देत ॥ तूं परम पापिणी यथार्थ ॥ मृगी होई मृत्युलोकीं ॥ २८ ॥ तुझ्या सख्या दोघी-

---

१ मला. २ सतत. ३ सूर्य. ४ व्याध. ५ दीन शब्दानें. ६ आलिंगनाला. ७ पुष्ट.

जणो ॥ त्या होतील तुजसवें हरिणी ॥ हिरण्यासुर माझिये भजनीं ॥ असावध सर्वकाळ ॥२९॥ तोही मृग होऊन सत्य ॥ तुम्हांशींच होईल रत ॥ ऐक व्याधा सावचित्त ॥ मग म्यां शिव प्रार्थिला ॥ ३० ॥ दिंडी ॥ पंचवदना हे पंचशरामित्रा ॥ पार्वतीशा परमेश्वरा त्रिनेत्रा ॥ मला देइ उःशाप दीननाथा ॥ तुझ्या चरणांबुजिं ठेवियला माथा ॥ ३१ ॥ अशी माझी ऐकुनी दीनवाणी ॥ मनीं द्रवला तत्काळ शूलपाणी ॥ म्हणे द्वादश वर्षांत असो शाप॥ पुढें मत्पद पावाल विगतपाप ॥ ३२ ॥ आर्या ॥ श्रीशिववाक्यें आलों तत्काळचि हरिण योनिजनु लाहे ॥ संप्रति गर्भवती मी न वधीं प्रसवोर्ध्व हीच तनु लाहे ॥ ३३ ॥ स्वस्थळिं जाउनि ठेवुनि गर्भासी याच पाउलीं येतें ॥ शास्त्रज्ञ म्हणति न वपू संतानाचि रक्ष्य निज कुळीं येतें ॥ ३४ ॥ परिसुनि तें व्याध म्हणे वदसि मधुर परि नयेचि विश्वास ॥ कीं राखिजे तनु मृषा वदुनि असें ज्ञान सकळ विश्वास ॥३५॥ ओंवी ॥ तरी महत्पापें उच्चारून ॥ शपथ वदे तूं यथार्थ पूर्ण ॥ यावरी ते हरिणी दीनवदन ॥ वाहते आण ऐका ते ॥ ३६ ॥ अंजनीगीत ॥ ब्राह्मण होउनि न पढती वेदा ॥ कीं पंक्तिस जे करिती भेदा ॥ हरिहरांची अथवा निंदा ॥ उच्चारिती पापी ॥ ३७ ॥ सोडूनि पति परसंगे जाती ॥ न धरिति मनिं निजधर्मंहि जाती ॥ जाराशीं ज्या युवती रमती ॥ दुर्मति स्वैरपणें ॥ ३८ ॥ कीं जे जारण मारण करिती ॥ देव ब्राह्मण धनासि हरिती ॥ केल्या उपकारा न स्मरती ॥ घेती दान दिलें ॥ ३९ ॥ मातापितरांच्या वचनातें ॥ न गणिति धरिती अभिमानातें ॥ कीं कोणाचें गुह्य जनातें ॥ उद्घाटित करिती ॥ ४० ॥ हरिणी बोले सुज्ञा आतां ॥ सदना जाउनि परत न येतां ॥ सारीं पापें माझ्या माथां ॥ वसतिल जाण खरें ॥ ४१ ॥ ओंवी ॥ व्याध म्हणे प्रतिव्रते जाइ आतां ॥ सत्वर येई निशी सरतां ॥ हरिणी म्हणे शिवपदासी तत्वतां ॥ पुण्यवंता जाशील ॥ ४२ ॥ उदकपान करूनि वेगीं ॥ निजाश्रमा गेली कुरंगी ॥ इकडे व्याध दक्षिणमार्गीं ॥ टाकी बिल्वदळें खुडोनियां ॥ ४३ ॥ दिंडी ॥ निशी त्या समयीं दोन याम झाली ॥ पडति लिंगावरि बिल्वदळें खालीं ॥ शंभु दुसरी ही म्हणे यामपूजा ॥ नाश झाला तैं अर्धपापपुंजा ॥ ४४ ॥ ओंवी ॥ नामीं आवड जडली पूर्ण ॥ व्याध करी शिवस्मरण ॥ मृगीमुखें ऐकिलें निरूपण ॥ सहज जागरण घडलें तया ॥ ४५ ॥ आर्या ॥ तों दुसरी हरिणी जलपान कराया तया सरास निघे ॥ पाहुनि बुभुक्षित तिला व्याध वधाया शरा शरासनिं घे ॥ ४६ ॥ करुणास्वरें कुरंगी त्यास म्हणे मजासि पीडितो मार ॥ यास्तव भोगुनि पतिशीं रति येतें मग मला सुखें मार ॥४७॥ घनाक्षरी ॥ व्याध म्हणे वाहीं शपथ ॥ जाई सत्वर घरीं सुपथ ॥ सुरतीं संतोषवी नाथ ॥ येई परत सुंदरी ॥ ४८ ॥ दिंडी ॥ गुरुसि निंदिति जे करिति मद्यपाना ॥ महा पुरुषा ठेविति दोष नाना ॥ ब्रह्मवृंदाचा करिति मानभंग ॥ धरिति दुर्जन जे नीच जातिसंग ॥ ४९ ॥ श्राद्धभोजन जे करुनि विप्र कामी ॥ रति-व्यासंगें होती दारगामी ॥ तयां दुर्गति जे होय देवधामीं ॥ मला होवो जरि न येईन गा मी ॥ ५० ॥ ओंवी ॥ व्याध मनांत शंकोन ॥ म्हणे धन्य धन्य तुमचें ज्ञान ॥ सत्वर येईं गृहास जाऊन ॥ सत्य संपूर्ण सांभाळीं ॥५१॥ घनाक्षरी ॥ मृगी प्राशुनियां तोय ॥ त्वरित निजसदना जाय ॥ तोंचि आला मृगराय ॥ तृषित होय फारसा ॥ ५१ ॥ व्याध लक्षुनियां तीर ॥ चापीं जोडुनियां तीर ॥ करुनि दृष्टि बहु

---

१ हे मदनशत्रो. २ काम ( मदन ).

स्थिर विलोकित चोरसा ॥ आर्या ॥ मृगराज दृष्टि पडतां शर ओढी व्याध त्या वधायासी ॥ तों मृग म्हणे सतीशीं येतों मी पुसुनि मग वधा यासी ॥ ५४ ॥ घनाक्षरी ॥ हरिकीर्तनिंचा रंग ॥ अधम करिति जे भंग ॥ शूद्र करती जे सांग ॥ वेदकर्म आदरें ॥ ५५ ॥ करिती मातृपितृ द्रोह ॥ मनीं धरिती संमोह ॥ विकिती गाई सदेह ॥ त्यजुनि दुष्ट अंतरें ॥ ५६ ॥ ब्राह्मणांचा अपमान ॥ करिती विप्र सुरापान ॥ साक्षी देति अप्रमाण ॥ विदित असूनही खरें ॥ ५७ ॥ जरी न येइन परतून ॥ सतीलागी विचारून ॥ सकल पापां-पासून ॥ नरकपतन मजसी हो ॥ ५८ ॥ दिंडी ॥ व्याध बोले मग जाय हरिणराया ॥ येईं सत्यचि हें वचन बा कराया ॥ असति तुझ्या बा पतिव्रता जाया ॥ म्हणुनि न करिन प्रतिबंध तुला जाया ॥ ५९ ॥ पिउनि गेला मग मृगहि त्वरें पाणी ॥ तोहि उच्चारी मुखें शूळपाणी ॥ खुडुनि टाकी तो बिल्वदळें पाणी ॥ चतुर्थाची तें शंभु मनीं आणि ॥ ६० ॥ असो कैसाही व्याध दुराचारी ॥ शिवें त्याच्या मानिल्या पुजा चारी ॥ पुढें अरुणोदय होय अल्पकाळीं ॥ तयीं तेथें तिसरी मृगी आली ॥ ६१ ॥ आर्या ॥ व्याध तिनें स्ववधोद्यत सशर धनुष्पाणि पाहिल्या वरतीं ॥ चकित म्हणे मज आतां न वधीं वधिं शिशुसि पाजिल्यावरतीं ॥ ६२ ॥ वाहे आणा पाहे बाणासन सज्ज सभयनयना तें ॥ करुणरवें धर्मे वदे जोडी दावूनि नयनातें ॥ ६३ ॥ पद ॥ व्याधा सोडिं मला ताता आतां मारूं नको ॥ ध्रु० ॥ पाहे वाट घरीं कीं बाळ ॥ होई त्याविषयीं कनवाळ ॥ येतें स्तन पाजुनि तत्काळ ॥ पुरवी आळ हे माझी ॥ व्याधा० ॥ १ ॥ जाउनियां क्षणिं येईन जाण ॥ वाहतें खरी परिसें ही आण ॥ मिथ्या वदेन हें मनीं न आण ॥ काढीं बाण चापींचा ॥ व्याधा० ॥ २ ॥ स्त्रीपुरुषांचा करिति वियोग ॥ कीं कन्येशीं करिती भोग ॥ होय तयां जो अघसंयोग ॥ तत्फल भोग मजसि घडो ॥ व्याधा० ॥ ३ ॥ देव द्विज धन हरिती चोर ॥ मातापितरांवरि जे शूर ॥ गर्वें न गणाति साधू थोर ॥ पातक घोर मज त्यांचें ॥ व्याधा० ॥ ४ ॥ किंवा वधितां जीवहि लक्ष ॥ जें अघ तें मज हो प्रत्यक्ष ॥ देवा मनचि असो या साक्ष ॥ कीं विरु-पाक्ष दुसरा हो ॥ व्याधा० ॥ ५ ॥ ६४ ॥ ओंवी ॥ ऐसा धर्माधर्म ऐकोन ॥ पारधी सद्गद बोले वचन ॥ स्वस्थळा जाईं जलपान करून ॥ बाळासी स्तन देउन येईं ॥ ६५ ॥ ऐसें ऐकोन मृगी लवलाह्यां ॥ गेली जलप्राशन करूनियां ॥ बाळें स्तनीं लावुनियां ॥ तृप्त केलीं तियेनें ॥ ६६ ॥ आर्या ॥ पहिली प्रसूत झाली दुसरी निजकांत सेज पावे ते ॥ मग मृग म्हणे चला जें वचन दिलें त्या तसें जपावें तें ॥ ६७ ॥ केलें प्रयाण सकळीं धृति धरुनिं मनीं अपार धीरांनीं ॥ मरणोद्यत गेले हो तो आहे जेथ पारधी रानीं ॥ ६८ ॥ मृग त्यासि म्हणे व्याधा, आधीं तूं मज वधीं कृपा कर गा ॥ म्हणती मृगी कृपाळा आधीं करि आमुची वेंपा करेंगा ॥ ६९ ॥ ते सुस्वभाव शावक म्हणाति अगा व्याधनायका माजी ॥ तनु आधीं वधीं शिशुची स्थिति सोडुनि माय काय कामा जी ॥ ७० ॥ साकी ॥ सुने जबी मृग--बचन व्याध वह दिलमो झरर पझारे ॥ हरनोंकें मारनसे उलटा शिवव्रत केहि उझारे ॥ ७१ ॥ ओंवी ॥ त्यांचीं वचनें ऐकतां क्षणीं ॥ व्याध सद्गद जहाला मनीं ॥ अश्रु-धारा लोटल्या नयनीं ॥ लागे चरणीं तयांच्या ॥ ७२ ॥ सवाई ॥ व्याध म्हणे तुम्ही

---

१ मांदें. २ हस्तगत.

धन्य कृतार्थचि बाध नसोचि कवीं सुकृता ॥ साधक शोध्य अगाध सुबोधचि धर्मपथाहि अहो वदतां ॥ पातकसागर मी मृगघातक जोडुनि हात तुम्हा स्वहिता ॥ प्रार्थुनियां म्हणतों तुम्ही सज्जन मज्जन माय तसेंच पिता ॥ ७३ ॥ पुत्र कलत्रहि मित्र अमित्र मृषाचि परंतु अजाणपणें ॥ व्यर्थ भरी भरुनी मरणार्थ निरर्थक हा जन फार शिणे ॥ काय अहो नरकाय, मिळूनही जाय उगें परमार्थि सुणें ॥ श्रीशिवराजपदांबुज अंतरिं नाठविलें कधिं मोहगुणें ॥ ७४ ॥ **आर्या** ॥ यापरी पश्चात्तापें तप्त न त्या व्याध सायका मारी ॥ तैंचि तया स्वविमान प्रेषी आणावयासि कामारी[1] ॥ ७५ ॥ **साकी** ॥ पंचवदन दशबाहु शैवगण रविसुत तेज तयांचें ॥ व्याघ्रांबर परिधान दिव्य तनु गाती यश गिरिशाचें ॥ ७६ ॥ **श्लोक** ॥ द्रुतविलंबित० ॥ सुमनभार तरां सुर वर्षती ॥ मृग मृगारिसवें बहु हर्षती ॥ मुखिं नमो गिरिशाय शिवाय ते ॥ म्हणति चित्र चरित्र न काय तें ॥ ७७ ॥ स्वागता० ॥ व्याध तो मग करी नमनातें ॥ आठवूनि मदनोद्दमनातें ॥ दार पुत्र धनहीन मनातें ॥ आणि जेविं वमिल्या वमनातें ॥ ७८ ॥ भुजंग० ॥ अहो स्पर्शतां स्पर्श[2] देतो अयांसी[3] ॥ सुवर्णत्व तैसें सुवर्णत्व यासी ॥ दिलें शंकरें आत्मरूप प्रयासी ॥ मिळे कष्टितां जें महा योगियांसी ॥ ७९ ॥ **आर्या** ॥ मग तो हरिणीशावकसहित हरिणराज दिव्य देहातें ॥ पावे काय सुदुर्लभ तत्प्रणतां जरि महेश दे हातें ॥ ८० ॥ **श्लोक** ॥ शिखरिणी ॥ विमानीं व्याधातें बसवुनि मृगांही शिवगणीं ॥ नभःपंथें नेले न सुकृत तयांचें कवि गणी ॥ असे ते कैलासा सकळहि पळें शंभुसदना ॥ सुखें जाती होती मुदित[4] बघतां पंचवदना ॥ ८१ ॥ तात्पर्य, या व्याधानें न समजून हेलनेनें जरी शिवाचें नामस्मरण केलें आणि वनांतील जनावरें दृष्टीस पडावीं म्हणून खुडलेल्या बिल्वदळांनीं जरी त्यास अकल्पित शिवार्चन घडलें, तथापि शंकरांनीं त्याचा उद्धार केला. याकरितां सर्वांनीं आपली मुक्तता होण्यासाठीं कायावाचामनेंकरून श्रीशंकराचें भजन करावें, म्हणून कवि म्हणतात ॥ भज भज भवजलधि ० ॥ **आरती** ॥ लवथवती विक्राळा ब्रह्मांडमाळा ॥ विषें कंठीं काळा त्रिनेत्रीं ज्वाळा ॥ लावण्यें सुंदर मस्तकीं बाळा ॥ तेथुनियां निर्मळ जळ वाहे झुळझुळां ॥ जयदेव जयदेव जय श्रीशंकरा ॥ आरती ओंवाळूं तुज कर्पुरगौरा ॥ ध्रु० ॥ १ ॥ कर्पुरगौर भोळा नयनीं विशाळा ॥ अर्धांगीं पार्वती सुमनाच्या माळा ॥ विभूतीचें उधळण शितिकंठ नीळा ॥ ऐसा शंकर शोभे उमा वेल्हाळा ॥ जयदेव० ॥ २ ॥ देवीं दैत्यीं सागर मंथन पैं केलें ॥ त्यामाजीं अवचीतां हळहळसें उठिलें ॥ तें त्वां असुरपणें प्राशन केलें ॥ नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें ॥ जयदेव० ॥ ३ ॥ व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी ॥ पंचानन मनमोहन मुनिजन सुखकारी ॥ शतकोटीचें बीज वाचे उच्चारी ॥ रघुकुळटिळक रामदासा अंतरीं ॥ जयदेव जयदेव० ॥ ४ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ १ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भजे ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ २ ॥ पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजय राम ॥ इति व्याधचरित्र समाप्तम् ॥

---

१ शिव. २ परिस. ३ लोखंडासी. ४ आनंदित.

# कथा ८ वी.

## गणपतिजन्म पूर्वरंग निरूपण.



श्रीमन्मंगलमूर्तये नमः ॥ अविरल मदजलनिवहं ० ॥ इत्यादि नमनम् ॥ भजनम् ॥ जयकरुणासागरा ॥ दया करिं वरद मयूरेश्वरा ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हर-हर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजय राम ॥ अभंग ॥ वैष्णव म्हणों तया ॥ अवघी देवा-वरी माया ॥ १ ॥ नाहीं आणीक प्रमाण ॥ तनु मन तृण जन ॥२॥ पडतां जड भारी ॥ नेमा न टळे निर्धारीं ॥ ३ ॥ तुका म्हणे याती ॥ हो कां तयाची भलती ॥ ४ ॥ आदौ कीर्त-नारंभीं भागवज्जनचूडामाणि तुकारामाख्य साधु हे जीवांनीं परमेश्वराची अखंड अव्यभिचा-रितपणानें प्रेमलक्षणा भक्ति करून अविनाशी आणि सर्वोत्कृष्ट असें महासौख्य संपादन करावें एतदर्थ कर्म, भक्ति आणि ज्ञान या तीन उपायांत सर्वमान्य आयासरहित व सर्वसु-खप्रद जो भक्तिमार्ग तो यथार्थपणें सर्वांस समजावा या उद्देशानें तत्प्रवर्तक जे वैष्णव त्यांचें लक्षण निरूपण करतात. ॥ वैष्णव म्हणों० ॥ ज्याच्या अंतःकरणाची प्रीति सर्व काय ती देवावर त्यालाच आम्हीं वैष्णव म्हणतों. याविषयीं शुकाचार्य म्हणतात ॥ श्लोक ॥ त्रिभुव-नविभवहेतवेऽप्यकुंठस्मृतिरजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ॥ न चलति भगवत्पदारविंदाल्लवनि-मिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः ॥ १ ॥ अर्थ—ज्याला भगवच्चरणांविषयीं अखंड स्मरण आहे तें असें कीं, जो त्रिभुवनाचें ऐश्वर्य जरी मिळत असलें तरीही भगवन्मनस्क जे इंद्रा-दिक देव त्यांनीं शोधण्यासच योग्य अशा भगवच्चरणकमलापासून अर्धनिमिषही चंचल होत नाहीं, त्यालाच वैष्णवश्रेष्ठ म्हणावें. वैष्णवांस भगवच्चरणस्मरणाचा क्षणवियोगही दुःखप्रद होतो. याविषयीं तुलसीदासांनीं म्हटलें आहे ॥ दोहा ॥ तीन लोक चौदा भुवन एक सासको मोल ॥ सो सास तुलसी कहे भजनबिना मत खोल ॥ १ ॥ याप्रमाणें ज्यांची देवावर परम प्रीति आहे त्यांना वैष्णव म्हणावें. आतां देव कोणता याविषयीं सूत म्हणतात— ॥ श्लोक ॥ भागवत ॥ अथापि यत्पादनखावसृष्टं जगद्विरिंच्योपहृतार्हणांभः ॥ सेशं पुना-त्यन्यतमो मुकुंदात्को नाम लोके भगवत्पदार्थः ॥ २ ॥ अर्थ—ब्रम्हदेवानेंही अनेक पूजा-द्रव्यें अर्पण करून ज्याचें पूजन केलें, ज्याच्या चरणनखांतून उत्पन्न झालेलें भागीरथी-रूप उदक शंकरासहित सर्व जगास पवित्र करतें त्या मुकुंदावांचून जगांत 'भगवान्' या शब्दाला आश्रय कोण आहे ? अर्थात् कोणी नाहीं, तर एक श्रीकृष्णच भगवच्छब्दार्थ होय. त्यावर ज्याची पूर्ण प्रीति तोच वैष्णव. अशा आशयानें तुकाराम म्हणतात ॥ वैष्णव म्हणों० ॥ अथवा माया शब्द श्लिष्ट आहे. एक अर्थानें माया म्हणजे प्रीति, दुसरा अर्थ माया म्हणजे जगाला मोह करणारी जी ईश्वराची अनादि शक्ति ती. यावरून हें सर्व घटपटात्मक जगत् उत्पन्न करणारी व नाहींसें करणारी नामरूपात्मक जी माया ती देवावरच म्हणजे 'दीव्यति प्रकाशत इति देवः' म्हणजे स्वयंप्रकाशमान जो परमात्मा त्याच्या आश्रमानेंच 'हें सर्व आहे असें जो समजतो तोच वैष्णव. याविषयीं प्रमाण भागवत ॥ श्लोक ॥ गृहीत्वापींद्रि-यैरर्थान् यो न द्वेष्टि न हृष्यति ॥ विष्णोर्मायामिदं पश्यन् स वै भागवतोत्तमः ॥ ३ ॥

अर्थ—जो इंद्रियांच्या योगानें शब्दस्पर्शादि विषयांना ग्रहण करीत असतांही त्यांचा हर्ष किंवा द्वेष मनांत आणीत नाहीं, तर हे सुखदुःखहेतु जे अनेक विषय तत्प्रदर्शक ही भगवत्स्वरूपसंबंधिनी माया होय असें पाहतो तोच भागवतोत्तम म्हणजे भगवद्भक्त जे वैष्णव त्यांत उत्तम होय. म्हणून तुकाराम म्हणतात ॥ वैष्णव० ॥ आतां देवावर प्रेम असणें हेंच वैष्णवांचें लक्षण याविषयीं भागवतांत हरिनामक ब्रह्मनिष्ठाची उक्ति आहे ॥ श्लोक ॥ विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्धरिरवशाभिहितोऽप्यघौघनाशः ॥ प्रणयरशनया धृतांघ्रिपद्मः स भवति भागवत प्रधान उक्तः ॥ ४ ॥ अर्थ—अस्वाधीन अवस्थेंतील पुरुषानें एकवार उच्चारण केलेल्या नाममात्रानें सकल पापसमुदायाचा समूळ नाश करणारा साक्षात् हरीच ज्याचें हृदय सोडून जात नाहीं, कारण त्यानें स्वहृदयांत हरीचें चरणकमल प्रेमरज्जूनें अत्यंत बद्ध केलें आहे, असा जो तोच भागवतांत म्हणजे वैष्णवांत मुख्य होय. म्हणून तुकाराम म्हणतात ॥ वैष्णव म्हणों० ॥ याप्रमाणें त्या वैष्णवांत अंतर्लक्षण झालें. आतां त्यांचीं बाह्य लक्षणें कशीं असतात याविषयीं कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ ये तापं शमयंति संगतिभृतां ये दानशृंगारिणो,येषा वृत्तमतीव निर्मलतरं येषां न भग्नं व्रतम् ॥ ये सर्वानपि तोषयंति सततं ते दुर्लभा वैष्णवाः, गंगावद्गजगंडवद्गगनवद्गांगेयवद्गेयवत् ॥ ५ ॥ अर्थ—जे आपली संगति करणाऱ्या लोकांचा ताप निवारण करितात, कसें तर गंगावत्; गंगा जशी आपल्या उदकाची स्नानादि रूपानें संगति करणाऱ्याचा ताप निवारण करते तसें. आणखी जे सदां ( गजगंडवत् ) हत्तीच्या गंडस्थलाप्रमाणें दानशृंगारी असतात म्हणजे औदार्यानें शोभायमान असतात. हत्तींचीं गंडस्थळें हीं दानोदकानें शोभायमान असतात त्याप्रमाणें. आणि ज्यांचा आचार गगनवत् म्हणजे आकाशाप्रमाणें निर्मळ असतो. जसें आकाशांत अनेक अभ्रें उत्पन्न झालीं तरी आकाशास स्पर्श होत नाहीं, त्याप्रमाणें जे कर्म करीत असतांही निरभिमानीपणामुळें लिप्त होत नाहींत. आणि गांगेय म्हणजे भीष्माचार्याप्रमाणें ज्यांचें व्रत म्हणजे प्रतिज्ञा कधींच भग्न होत नाहीं, जे गायनकलेप्रमाणें ज्ञान्यांस व अज्ञान्यांसही संतोष देतात, ते विष्णुभक्त. असे सज्जन फार दुर्लभ आहेत. अस्तु. अशा प्रकारचे जे वैष्णव त्यांना एक भगवच्चरणांवांचून अन्य कांहीं एक प्रिय नसतें. याविषयीं श्रीकृष्णच भागवतांत म्हणतात ॥ श्लोक ॥ न पारमेष्ट्यं न महेंद्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यं ॥ न योगसिद्धीरपुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनाऽन्यत् ॥ ६ ॥ अर्थ—भगवान् षड्गुणैश्वर्यसंपन्न जो मी त्या माझे ठायीं ज्यानें अंतःकरण अर्पण केलें आहे तो ब्रह्मलोक इच्छीत नाहीं, स्वर्गाचें ऐश्वर्य किंवा पाताळाचें आधिपत्य अथवा पृथ्वीचें सार्वभौम राज्यही तो मागत नाहीं. तशाच अणिमादि अष्टसिद्धि किंबहुना मोक्षही त्यास इष्ट होत नाहीं. तर एक मीच त्यास प्रिय असतों. मजवांचून तो अन्य कांहींच वांछीत नाहीं. आणि ज्यांची भगवच्चरणावर दृढ निष्ठा असते, ती कसेंही संकट प्राप्त झालें तरी चंचल होत नाहीं. तुकाराम म्हणतात ॥ पडतां जड भारी ॥ नेमा न टळे निर्धारीं ॥ ३ ॥ याविषयीं महावैष्णव प्रल्हाद याची दृढनिष्ठाप्रदर्शक उक्ति आहे. ज्या वेळीं प्रल्हादास शंडामर्क गुरूनीं बोध केला कीं, जर विष्णुभक्ति सोडली नाहींस तर हिरण्यकशिपु तुझा प्राण घेईल, त्या वेळेस प्रल्हादानें त्यास उत्तर केलें कीं, ॥ श्लोक ॥ नृसिंहचंपू ॥ असवो यति यांति यांतु मे परमानंदमुकुंदचिंतने ॥ भवतापकदंबभंजने विरमेनैवकदापि मानसं ॥ ७ ॥ अर्थ—परमानंदरूप

जो मुकुंद याच्या चिंतनांत माझे प्राण जातील तर जावोत, परंतु संसारतापाचा नाश करणारा जो भगवान् त्याच्या चिंतनाविषयीं माझें मन कधींही विराम पावणार नाहीं ॥ ७ ॥ याचप्रमाणें मातुश्रीनें भगवन्नामस्मरण सोडण्याविषयीं पतीच्या आज्ञेवरून त्यास आग्रह केला, त्या वेळींही त्यानें मातुश्रीस उत्तर दिलें ॥ श्लोक ॥ नृसिंहचंपु ॥ किमिदं कटु भाषसे मृषा दनुवंशोपरी संतु वन्हयः ॥ स्मरणीयमहर्निशं मया कमनीयं जगदादिमं महः ॥ ८ ॥ **अर्थ**—आई, हें असें कर्णकटु मिथ्या काय बोलतेस? तुझें म्हणणें कीं, असुरकुळास हें योग्य नाहीं, तर या अशा भगवत्पराङ्मुख दैत्यकुळाला आग कां लागेना? परंतु जगास आदिभूत, त्रिभुवनांत सुंदर असें जें भगवद्रूप त्याचें स्मरण कधींही सोडणार नाहीं. तर रात्रंदिवस मी त्याचें चिंतन करीन. ॥ तात्पर्य ॥ असा ज्याचा दृढनिश्चय कीं प्राण जावो, मातापितरांशीं अंतर पडो, सर्व ऐहिक सुखांत अंतर येवो; परंतु भगवच्चरणारविंदीं प्रेमानें एकनिष्ठ झालेलें मन कधींच चंचल होत नाहीं, त्यास वैष्णव म्हणावें. आतां अवघी माया म्हणजे प्रीति देवावर, यावरून ज्यांचीं सर्वच इंद्रियें भगवत्पर असतात. याविषयीं एका भगवद्भक्ताचें आपल्या इंद्रियांस अनुवाद रूपानें म्हणणें आहे ॥ श्लोक ॥ जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं, पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वय त्वं शृणु ॥ कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालयं, जिघ्र घ्राण मुकुंदपातुलसी मूर्धन्नमाधोक्षजं ॥ ९ ॥ अर्थ—हे जिव्हे, तूं केशवाचें कीर्तन कर. हे मना, तूं मुरारि जो श्रीकृष्ण त्याचें चिंतन कर. हे हस्तांनो तुम्हीं श्रीधराची पूजा करा. हे चरणद्वया तूं हरिमंदिराप्रत जा. हे घ्राणेंद्रिया, तूं मुकुंदपादसंबंधीं तुळशीचें अवघ्राण कर. हे मस्तका, तूं अधोक्षजास नमस्कार कर. यांत परिसंख्यारूपानें सर्वेंद्रियांस भगवत्स्वरूपाहून इतर विषयांचा निषेध करून एक तन्निष्ठताच दर्शविली आहे. असे जे तेच वैष्णव. नाहींपेक्षां पुष्कळ वैष्णव असतात ते असे—कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ वैष्णवा बहवःसंति वासुदेवसुतेरताः ॥ वैष्णवा विरलाःसंति वसुदेवसुतेरताः ॥ १० ॥ अर्थ ॥ वासुदेवाचा सुत म्हणजे पुत्र जो मदन याचे ठिकाणीं रत असणारे वैष्णव पुष्कळ आहेत, परंतु वसुदेवसुत जो श्रीकृष्ण त्याचे ठिकाणीं रममाण होणारे वैष्णव फार थोडे आहेत. याविषयीं तुकाराम म्हणतात ॥ पद ॥ तेथें सुख नाहीं सुख नाहीं ॥ लागे गुरूचे पायीं ॥ ध्रु० ॥ टिळाटोपी घालुनी माळा म्हणती आम्हीं संत ॥ परनारी देखोनि डोळां चंचल झालें चित्त ॥ १ ॥ तेथें सुख० ॥ कलियुगीं घरोघरीं संत झाले फार ॥ वीतभर पोटासाठीं हिंडति दारोदार ॥ २ ॥ तेथें सुख० ॥ संत म्हणति करितो निंदा निंदा नोहे भाई ॥ तुका म्हणे अनन्यभावें संतीं शरण जाई ॥ तेथें सुख० ॥ ३ ॥ याकरितां असे जे दांभिक, लोकांस ठकविण्याकरितां झालेले वैष्णव त्यांपासून कांहीं तरणोपाय होणार नाहीं. किंबहुना भगवच्चरणपराङ्मुख अशा महान् विद्वान् ब्राह्मणापेक्षांही भगवन्निष्ठ नीच कुळांतला असला तरी तो श्रेष्ठ होय. कारण केवळ विद्वान् असतात ते स्वतःच भवसमुद्रांत गटंगळ्या खातात, मग दुसऱ्याला काय तारितील. याविषयीं भागवत सप्तमस्कंधीं प्रल्हाद म्हणतात. हे लक्ष्मीनृसिंह, मला असें वाटतें कीं ॥ श्लोक ॥ विप्राद्विषड्गुणयुतादरविंदनाभपादारविंदविमुखाच्छ्वपचं वरिष्ठं ॥ मन्येतदर्पितमनोवचनेहितार्थं प्राणंपुनातिसकुलं तनुभूरिमानः ॥ १ ॥ अर्थ—हे भगवन्, मी असें मानितों कीं शमदमादि द्वादश गुणसंपन्न असाही ब्राह्मण जर भगवच्चरणकमलाचे ठिकाणीं विमुख आहे तर त्यापेक्षां ज्यानें आपलें

मन, वाणी, इच्छा, द्रव्य आणि प्राण हीं भगवंतास अर्पण केलीं आहेत, असा जातीनें अत्यंत नीच ( श्वपच ) चांडालही वरिष्ठ होय. कारण तो भगद्भजनेंकरून आपला व सर्व कुळाचा उद्धार करितो. आणि पूर्वी सांगितलेला ब्राह्मण आपणच उद्धरत नाहीं मग कुळाचा उद्धार तर दूरच आहे. तात्पर्य इतकेंच कीं, ज्याची द्रव्य व प्राण यांपेक्षांही प्रीति परमेश्वराचे चरणीं आहे, तोच वैष्णव. अशा अभिप्रायानें तुकाराम म्हणतात ॥ वैष्णव म्हणों० ॥ १ ॥ या प्रकारचे जे वैष्णव आहेत. त्यांना आलेलीं सर्व संकटें निवारण करून परमात्मा त्यांस सर्व सुखें देतो. याविषयीं कवि गणपतिचरित्र वर्णन करितात.

# अथ गणपतिजन्मप्रारंभः

॥ श्लोक ॥ मालिनी० ॥ निजमति कथि गाथा सूत तो शौनकातें ॥ गजमुख शुभजन्म स्पष्ट कीं आयका तें ॥ रसभरित कथा हे बोलिली व्यासवाणी ॥ कथिन गुरुकृपेनें वर्णिली जे पुराणीं ॥ १ ॥ इंद्रवज्रा ॥ ब्रह्मयास जंभा सहजांत आली ॥ वक्त्रांतुनी मूर्ति तदा निघाली ॥ तो दैत्य जंभासुर उग्र झाला ॥ तूं कोण धाता पुसतो तयाला ॥ २ ॥ उपजाति०॥ येरू म्हणे मी तव पुत्र ताता ॥ ठेवी तया सिंदुर नाम धाता ॥ प्रार्थी तदा सिंदुर कंजजातें ॥ अजिंक्य ऐसें करि तात मातें ॥ ३ ॥ इंद्रवज्रा० ॥ क्रोधें मदालिंगन होय ज्यासी ॥ तो मृत्यु पावो वद या वरासी ॥ लोकत्रयीं सुंदर योग्य नारी ॥ ती प्राप्त व्हावी मज सौख्यकारी ॥ ४ ॥ पृथ्वीछंद ॥ विरिंचि वदला तथास्तु मग दैत्य तो चालिला ॥ समोर मुनि नारदाख्य सहज स्थिती पाहिला ॥ वदे असुर नारदा मजसि भेट दे लौकरी ॥ वरप्रतिति पाहुं दे मुनि तदा वदे त्यावरी ॥ ५ ॥ ठकी विधि तुला पहा प्रतिति हे स्थळीं जाउनी ॥ खरें म्हणुनि दैत्य ये चपळ ते स्थळीं धांवुनि ॥ वदे विधिस भेटि दे मरसि तूं तरी तूं खरा ॥ मृषा घडलिया तुला वधिन मी विचारी बरा ॥ ६ ॥ आर्या ॥ कमलासन बोलतसे कां रे मन्मृत्यु कल्पिसी दुष्टा ॥ तरि तूं गणेशहस्तीं मरसी मच्छाप घे वृथा पुष्टा ॥ ७ ॥ ब्रह्मा करित पलायन वैकुंठीं विष्णुतें समग्र कथीं ॥ त्यातें विष्णु निषेधी तों आला शूलयुक्त खल कुपथीं ॥ ८ ॥ हरि गौरवूनि बोले वैदिक धाता करीतसे सृष्टी ॥ पालन पटुता माझी दोंघे नेणों कदापि शरवृष्टि ॥ ९ ॥ योद्धा बलवान् तुजसी कैलासपती भिडेल तो कुशल ॥ जो शस्त्रास्त्रविशारद रक्षी करिं परशुचाप शर मुसल ॥ १० ॥ तत्कांता कनकलता भुवनत्रयिं सुंदरी असे धन्य ॥ सर्वार्थ लभ्य तेथें जा चित्तीं मात नाणिजे अन्य ॥ सवाई ॥ ऐकुनि उत्तर तो रजनीचर शंकरमंदिर संनिध पावे ॥ ध्यानिं असे शिव तो खळ देखत ते घडि वेळ तया बरि फावे ॥ स्कंधिं बळें नगजेप्रति घेउनि जाय तदा गण रोदति सारे ॥ भो शिव सावध पार्वतिला हरि दुष्ट तपीं रतलासि कसा रे ॥ १२ ॥ सावध होय दयाघन पाहुनि युद्ध करी न मनीं खळ कांहीं ॥ मूर्छित पाहुनि नेत जगज्जननीप्रति दानव पाहीं ॥ दीर्घ रवें गिरिजा करि गर्जन धांव रमापति सज्जनपाळा ॥ संकट वारुनि सोडविं तूं मज वेग करीं जगदीश कृपाळा ॥ १३ ॥ पद ॥ आतां धांव हरी त्वरें दुःख हरीरे ॥ ध्रु० ॥ सिंदूर हा

---

१ ब्रह्मदेवास. २ मिथ्या.

दैत्य क्रूर ॥ नेई सख्या मजसी दूर ॥ असुनि पक्षपाती शूर ॥ मजसि तूंहि दुष्ट हरी रे ॥ आतां धांव० ॥ १ ॥ धांव धांव जनोद्धार ॥ यांतुनि करी मदुद्धार ॥ तुजवीण निराधार ॥ दीन मी असे खरी रे ॥ आतां धांव० ॥ २ ॥ गंगाधर शिवहि क्रुद्ध ॥ करितां अति तुमुल युद्ध ॥ नाटोपे खळ अबद्ध बद्ध ॥ मज मधांद करी रे ॥ ३ ॥ आतां धांव० ॥ हे माधवा दीनबंधु ॥ धांव त्वरित कृपासिंधु ॥ हे वामनमानसेंदु ॥ तूंचि ताप सर्व हरी रे ॥ आतां धांव हरी० ॥ ४ ॥ श्लोक ॥ कामदाछंद ॥ श्रीहरी तदा शीघ्र धांवला ॥ पार्वतीपुढें वेगिं पातला ॥ विप्र होउनी पावला हरी ॥ दैत्य तिष्ठवी केविं यावरी ॥ १४ ॥ शूर होउनी वस्तु चोरीसी ॥ श्लाघ्य सिंदुरा नाहिं हें तुसी ॥ तो म्हणे रणीं जिंकिलें हरा ॥ नेतसें शिवा जाण सत्वरा ॥ १५ ॥ चामरवृ० ॥ बोलिला जगन्निवास साक्षि कोणिही नसे ॥ भूत तें असाक्षि कर्म यावरी भिडा कसे ॥ जो पडेल तो न योग्य पाडि तो इचा पती ॥ मानली खळासि गोष्ट ठेविली तळीं सती ॥ १६ ॥ भीडती बळें तदा न मानि दैत्य माजला ॥ जर्जरीत शंभु होय अंतरांत लाजला ॥ भ्यालि कालिका मनीं नसे म्हणे बरी गती ॥ रक्षिं रक्षिं माधवा दयार्णवा रमापती ॥ १७ ॥ श्लोक ॥ अनुष्टुप्छंद ॥ क्षपाचर महायोद्धा आकर्षे न हराप्रती ॥ नारायण जगत्प्राण करी युद्ध महामती ॥ १८ ॥ हस्तीं घेउनि परशु सिद्ध झाला असे हरी ॥ दृष्टी चुकवि दैत्याचे मारी शीघ्र शिरावरि ॥ १९ ॥ तेणें आली गिरिगिरी उताणा पडला खळ ॥ पडला पडला दैत्य गाजिला ध्वनि तुंबळ ॥ २० ॥ पलायन करी तेव्हां त्रपायुक्त[1] निशाचर ॥ वर्णिती भगवल्लीळा महोत्साहें[2] उमावर ॥ २१ ॥ घनाक्षरी ॥ विष्णु तुष्ट सानुराग ॥ म्हणे अंबिकेसि माग ॥ वदे येरी पुत्र चांग ॥ तूंचि होई आमुचा ॥ २२ ॥ मला फार दिला त्रास ॥ तया मारी सिंदुरास ॥ ऐकतां रमाविलास ॥ बोलिला तथास्तु हें ॥ २३ ॥ कांहीं लोटितांचि काळ ॥ गर्भी येत वेदपाळ ॥ मोदें वाटला विशाळ ॥ होती दिव्य दोहँदें[3] ॥ २४ ॥ श्लोक ॥ विबुधप्रिया ॥ सिंदुरें जग गांजिलें खळ आत्ममंदिर पावला ॥ घेउनी स्वकरीं विणा सहजांत नारद पातला ॥ दैत्य बोलत अग्रजा मज सांग तूं स्वहित स्वयें ॥ देत उत्तर त्यास नारद ऐक रे हित निश्चयें ॥ २५ ॥ पार्वती उदरांत गा तव शत्रु वाढतसे बरा ॥ मारिसी तरि सौख्य पावसि यावरी करिजे त्वरा[4]॥ ऐकतां खळ धांवला मग पार्वतीजठरीं शिरे ॥ छेदि गर्भ शिरासि सत्वर घेउनी गगनीं फिरे ॥ २६ ॥ ॥ दिंडी ॥ नर्मदोदकीं त्यागिलें शिराप्रती ॥ त्याचे झाले नर्मदे गणपती ॥ नवमासहि पूर्ण ते पावताती ॥ सती प्रसवे वेदना फार होती ॥ २७ ॥ ओंवी ॥ भाद्रपदमासींचा शुक्लपक्ष ॥ चतुर्थीस जन्मला सर्वाध्यक्ष ॥ ऐकतांचि पातला शंभु दक्ष ॥ शिरहीन देखिला तो ॥ २८ ॥ श्लोक ॥ शार्दूलविक्री० ॥ आश्चर्ये शिव कोंदला मनिं म्हणे हें काय झालें असे ॥ नोहे प्रेत सजीव हें दिसतसे आतां करावें कसें ॥ नंदी प्रेषुनि देव सर्व सैंजवें आमंत्रुनी आणित ॥ सारे पाहुनि बोलती कुतक हें आश्चर्यसें मानित ॥ २९ ॥ इंद्रवज्रा ० ॥ ब्रह्मा म्हणे त्याग करा सुतातें ॥ दुर्गा वदे त्यावरि आयका तें ॥ ब्रह्मच्या तुला भ्रांति अशी नसावी ॥ ही कोण मूर्ती मनिं ओळखावी ॥ ३० ॥ प्रहर्षिणीवृ० ॥ तेव्हां तो स्तवित असे तया विधाता ॥ बाळा तूं दिससि कबंध कोण ताता ॥ तत्काळीं ध्वनि उमटे विशिष्ट मिष्ट ॥ मी आहें सकळ जगाद्य कीं वरिष्ठ ॥ ३१ ॥ साकी ॥ गणेश नामक पूर्वी कृतयुगीं तव उदरीं

१ लज्जायुक्त. २ आनंद. डोहाळे. ४ वेगानें.

मी झालों ॥ सकळ जगाचा ईशहि मी सति व्यक्त तनूप्रति आलों ॥ ३२ ॥ श्लोक ॥ त्रेतायुगीं यापरि मीच माते ॥ झालों मयूरेश्वर मीच माते ॥ ख्याती जगीं होऊनि शुक्लवर्णी ॥ केलीं चरित्रें बहु कोण वर्णी ॥ ३३ ॥ षड्बाहु मी तैं तुज बोलिलों कीं ॥ द्वापारिंही मी, तव पुत्र लोकीं ॥ होऊन सिंदूरमुखासुरासी ॥ मारूनियां देइन सौख्यराशी ॥ ३४ मीं बोलल्यापरि समग्रहि सिद्ध केलें ॥ झालों तुझा तनय जे भजनीं भुकेले ॥ देऊनि त्यांस सुख मारीन दानवांसी ॥ भूभारही हरिन मी शिवलोकवासी ॥ ३५ ॥ आर्या ॥ सिंदुरमथनिं कराया अवतरलों मी प्रसिद्ध निजलीला ॥ मच्छिर हरिलें दैत्यें ठेवुनियां पार्वतीस निजलीला ॥ ३६ ॥ वधिला शिवें गजासुर तच्छिर लावा तयासि वर आहे ॥ होइन सिद्धिगजानन सिंदुर मर्दिन तयावरि पाहे ॥ ३७ ॥ गेले सुर उचलिति शिर परि नुचले परतुनी तदा आले ॥ कथिती ब्रम्हचापाशीं गतमद हतवीर्य सर्वही झाले ॥ ३८ ॥ बालक वदला तरि हें धड माझें नेऊनी शिरा लावा ॥ तेंहि कदापि नुचले पुनरपि कथि बाळ ते घडी देवां ॥ ३९ ॥ पृथ्वीछंद ॥ जरी उचलि माऊली तरि मी पुष्पसा होइन ॥ शिरासि धड लावितां सशिर होउनी येइन ॥ सशुंड गजतुंड मी वितत कर्ण गंडोत्तम ॥ प्रचंड भुज दंड ज्या विमल दंत वज्रोपम ॥ ४० ॥ ॥ आर्या ॥ परिसुनि शिशुची वाणी ते शर्वाणि करें शरीरासी ॥ उचली तों तीस गमे कीं तुलाचची काय हे राशी ॥ ४१ ॥ मग नेऊनि त्या सन्निध्र लावुनियां निजमुखास गजवदन ॥ परतूनि ये सुरांसह तैं मोदें कोंदलेंचि शिवसदन ॥ ४२ ॥ भाद्रपदीं नागानन शुद्ध चतुर्थीस सिद्ध सुख सकळां ॥ दे वर्षति हर्षें सुर कुसुमें गंधर्व दाविति स्वकळा ॥ ४३ ॥ श्लोक ॥ ॥ पृथ्वी० ॥ सदंग मद तुंदिलोदर पदांबुजें कोमळ ॥ जगज्जननि लोचनीं निरखि मूर्ति ते सोज्वळ ॥ गजानन असा विलोकुनि सुखी शिवा माउली ॥ धरी हृदयसंपुटीं करित अंचलें साउली ॥ ४४ ॥ नाहणी ॥ गजमुख नाहतसे ॥ सुरगण कौतुक पाहतसे ॥ ध्रु० ॥ शिवमस्तकींचें पाणी घेउनि चलपाणी गिरीबाळा ॥ उल्लासानें कैलासावरि ते न्हाणी निजबाळा ॥ गजमु० ॥ १ ॥ स्तुत्य गीतसह नृत्य करिती त्या सुरकिन्नर गणिकाही ॥ दुंदुभि पणवादिक आनंदें वाजविती गणिकाही ॥ गजमु० ॥ २ ॥ माखुनि तैल सुगंध सिद्धिसह न्हाणितसे शर्वाणि ॥ वाणी विधिहि महोत्सव तो किती वर्णिल वामनवाणी ॥ गजमु० ॥ ॥ ३ ॥ श्लोक ॥ जातकर्म करि षष्टि सुपूजन ॥ द्वादशान्हि धृतनाम गजानन ॥ पालखीं निजविती शुभ कामिनी ॥ गाति मंगल समग्र सुखासनी ॥ ४५ ॥ पाळणा ॥ जोजोजोजोरे गजवदना ॥ पतीतपावना ॥ निद्रा करिं बारे ॥ गजानना ॥ मृत्युंजयनंदना ॥ ध्रु० ॥ पाळणा बांधिला जडिताचा ॥ पालख या सोन्याचा ॥ चांदवा लाविला मोत्यांचा ॥ बाळक निजवी साचा ॥ जोजो० ॥ १ ॥ दोर धरोनियां पार्वती ॥ सखियांसह गीत गाती ॥ नानापरि गुण वर्णितां ॥ सुस्वरें आळविती ॥ जोजो० ॥ २ ॥ निद्रा लागली सुमुखाला ॥ सिंदुर दैत्य आला ॥ त्यानें चरणानें ताडिला ॥ दैत्य तो मारिला ॥ जोजो० ॥ ३ ॥ बाळक तान्हें हें बहुकारी ॥ दैत्य वधिले भारी ॥ करिती आश्चर्य नरनारी ॥ पार्वती लोण उतरी ॥ ॥ जोजो० ॥ ४ ॥ ऐसा पाळणा गाइला ॥ नानापरि आळविला ॥ चिंतामणिदासें विनविला ॥ गणनाथ निजवीला ॥ जोजो० ॥ ५ ॥ ४६ ॥ श्लोक ॥ इंद्र० ॥ स्वानंदछंदें

१ कापुसाची.

गुण गाय नारद ॥ गंधर्व गाती मनिं चिंतुनी पद ॥ सर्वाप्सरा सुस्वर गीत गर्जती ॥ चत्वारि वाचा स्तविती यथामती ॥४७॥ शालिनी॥खेळे रांगे चालतां मिष्ट बोले ॥ पुत्रोत्साहें शैलजा शर्व डोले ॥ स्वामीराया रामकृष्णात्मरंगा ॥ स्वानंदानें तारिल पांडुरंगा ॥ ४८ ॥ तात्पर्य ॥ शंकर आणि पार्वती यांची अंतःकरणांतून श्रीविष्णूच्या चरणांवर प्रीति असल्याकारणानें सिंदुरासुरास मारण्याकरितां स्वतःपार्वतीच्या उदरीं जन्म घेऊन त्याचा नाश केला, व त्या उभयतांला अतिशय सुख दिलें. याप्रमाणेंच जे कोणी भगवच्चरणांवर प्रेम ठेवणारे वैष्णव आहेत त्यांना परमात्मा सुख देतो. परंतु ते नामधारी वैष्णव मात्र नसावेत. केवळ बाह्य चिन्हांनीं वैष्णवत्व येत नाहीं. तर वैष्णवांचें मुख्य लक्षण हेंच. ॥ तुकाराम म्हणतात ॥ ॥ वैष्णव म्हणों तया० ॥ आरती गणपतीची ॥ जयदेव जयदेव जय वक्रतुंडा ॥ सिंदूर-मंडित विशाळ सुरवर भुजदंडा ॥ धृ० ॥ प्रसन्नभाळा विमळा करिं घेऊनि कमळा ॥ उंदिर वाहन दोंदिल नाचसि बहुलीला ॥ रुणझुण रुणझुण रुणझुण करि घागरिया घोळां ॥ सताल सुस्वर गायन शोभति अवलीळा ॥ जयदेवजय० ॥१॥ सारिगमपधनी सगरी सप्तस्वर भेदा॥ धिमि धिमि धिमि किट मृदंग वाजति गति छंदा ॥ तातथै तातथै तूं तैं करिसि आनंदा ॥ ब्रह्मादिक अवलोकित तव पदारविंदा ॥ जयदेव० ॥ २ ॥ अभय वरदा सुखदा राजीवदल-नयना ॥ परशांकुशधर लाडू शोभति शुभरदना ॥ ऊर्ध्व दोंदिल उंदिर कार्तिकेश रचना ॥ मुक्तेश्वर चरणांबुजिं अलिपरि करि भ्रमणा ॥ जयदेव० ॥ ३ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भजे ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ गजानन गणराज ॥ भजन ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जय जयराम ॥ मंगलमूर्ति मोरया ॥ ॥ इति गणपतिजन्मचरितं समाप्तम्.

---

## कथा ९ वी.

# देवीप्रादुर्भावचरित्र पूर्वरंग निरूपण.

श्रीमन्महागणाधिपतये नमः ॥ अविरलमदजलनिवहं० ॥ इत्यादि मंगलाचरणं ॥ विठाबाई माउली दया कर विठाबाई माउली० ॥ इति भजनम् ॥ पुंडलीकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वती-पते हरहर महादेव ॥ जानकीजीवन स्मरण जयजयराम ॥ जगन्माताकी जय ॥ पद ॥ रंगनाथस्वामींचें ॥ सदा श्रीहरिचें नाम मुखीं गात जा रे ॥ ध्रु ॥ वर्णाश्रमविहित कर्म ॥ करणें हा मुख्य धर्म ॥ निरहंकृति कंजनयन ध्यात जा रे ॥ १ ॥ सदा० ॥ सत्संगें शास्त्र-श्रवण ॥ श्रवणाचें करुनि मनन ॥ निजध्यासें पूर्णसुखीं रहात जा रे ॥ २ ॥ सदा० ॥ निरतिशय निजानंद ॥ हाचि अहर्निशीं छंद ॥ अंतरंगिं तोचि जगीं पहात जा रे ॥ ३ ॥ सदा० ॥ आदौ कीर्तनारंभीं भगवज्जनावतंस कविप्रवर रंगनाथस्वामी हे जीवांस आत्मसाक्षा-त्कार होऊन त्यांनीं अखंड स्वानंदसमुद्रांत निमग्न असावें या उद्देशानें क्रमें करून वर्णाश्रम,

धर्म, परमेश्वरचिंतन, सत्संगति आणि तद्वारा श्रवण, मनन व निदिध्यासन ह्या कर्तव्य गोष्टींचा उपदेश करीत होत्साते सर्व कर्मांची पूर्णता करणारें व मनादिकांस विश्रांति देणारें जें भगवन्नाम त्याच्या निरंतर कीर्तनाविषयीं उपदेश करतात. ॥ सदा श्रीहरिचें० ॥ हे प्राण्या तूं सर्वकाळ श्रीहरिचें नाम मुखेंकरून गा. कारण भगवन्नामगायन हें सर्व पुरुषार्थांस देणारें आहे. याविषयीं कवि म्हणतात ॥ श्लोक ॥ मायासं कुरु वायुरोधनविधौ मा ऽरण्यमासेव्यतां ॥ कायं वर्जितभोजनव्रततया मा कार्श्यमापादय ॥ पंचाग्निप्रचयेन चर्मदहनं नैवाचर क्लेशदं ॥ सानंदं कुरु राममनामभजनं स्यात्तेन सर्वेप्सितं ॥ १ ॥ अर्थ-तूं प्राणायामादि साधनें करून वायुरोध करण्याविषयीं आयास करूं नकोस, अरण्यांतही जाउं नकोस, तसेंच भोजनादिकांचा त्याग करून उपवासादिकांनीं शरीर कृश करून अथवा पंचाग्निसाधनादिकांच्या योगानें शरीरचर्म व्यर्थ जाळून घेऊं नकोस. तर एक जें रामनामाचें भजन तें मात्र आनंदयुक्त होऊन कर; म्हणजे त्या योगानें सर्व इच्छा पूर्ण होतील. भगवन्नाम पातकांचा नाश करणारें आहे, याविषयीं म्हटलें आहे. ॥ श्लोक ॥ नाम्नोऽस्ति यावती शक्तिः पापनिर्दलने हरेः ॥ तावत्कर्तुं न शक्नोति पातकं पातकी नरः ॥२॥ अर्थ—हरिनामांत पातकाचा नाश करण्याविषयीं जितकी शक्ति आहे तितकी पापी लोकांस पातक करण्याविषयीं नाहीं. याचप्रमाणें वामनपंडितही म्हणतात ॥ श्लोक ॥ न कळतां पद अग्निवरी पडे ॥ न करि दाह असें न कधीं घडे ॥ अजितनाम वदो भलत्या मिषें ॥ सकल पातक भस्म करीतसे ॥ १ ॥ अर्थ—अग्नीवर न कळत जरी पाऊल पडलें तरी तो जाळीत नाहीं, असें कधींही होत नाहीं. याप्रमाणें अजित जो परमेश्वर त्याचें नाम कोणत्याही मिषानें जरी मनुष्यानें घेतलें तरी तें सर्व पातकांचा नाश करितेंच. याविपयीं कवि म्हणतात. ॥ श्लोक ॥ वने चरामो वसु चाहरामो नदीस्तरामो न भयं स्मरामः ॥ इति ब्रुवंतोऽपि वने किराता मुक्तिं गता रामपदानुषंगात् ॥ ३ ॥ अर्थ—कोणी एक किरात म्हणजे भिल्ललोक हे आपआपल्यांत आपल्या कर्मांचा अनुवाद करीत असतां असें म्हणूं लागले कीं, ‘वयं वने चरामः’ आम्हीं वनांत फिरतों. परंतु ‘वसु च आहरामः’ लोकांचें द्रव्य हरण करतों. तसेंच ‘नदीः तरामः’ नद्या उल्लंघन करतों परंतु ‘भयं न स्मरामः’ कधींच भयाचें स्मरणही करीत नाहीं. कवि म्हणतात. याप्रमाणें हें भाषण आपल्या निंद्य कर्मांची प्रौढी दाखविण्याकरितां जरी ते भिल्ल करीत होते तरी प्रतिवाक्यांत रामः या नामाचा अनुषंगिक ( सहज ) उच्चार होत गेला. या कारणानें ते किरात मुक्तीप्रत प्राप्त झाले. याकरितां सर्व पापहारक अशा हरिनामाचा उच्चार सर्वकाळ करीत असावें. अशा अभिप्रायानें रंगनाथस्वामी म्हणतात ॥ सदा श्रीहरीचें नाम० ॥ आतां कोणी म्हणेल कीं, वर्णाश्रमोदित नित्यनैमित्तिक कर्में करून चित्तशुद्धिद्वारा आत्मज्ञान संपादन केल्यानें मोक्षप्राप्ति होते, येथें नामाचें काय प्रयोजन आहे, कारण रामचंद्राची लक्ष्मणास उक्ति आहे ॥ श्लोक ॥ आदौ स्ववर्णाश्रमवर्णितः क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः ॥ समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये ॥ ४ ॥ अर्थ—आरंभीं आपल्या वर्णाश्रमास उक्त जीं कर्में तीं करून चित्तशुद्धि संपादन करावी. नंतर शमदमादि साधनें संपादन करून कर्मांची समाप्ति करावी.

---

१ ज्याचा महिमा कधींही कमी होत नाहीं.

मग आत्म ज्ञानाकरितां सद्गुरूचा आश्रय करावा ॥ ४ ॥ तर निरर्थक नामस्मरण कशास पाहिजे ? असें म्हटल्यास यांविषयीं समाधान यांतच आहे. रामांनीं कर्माची संपूर्णता करावी म्हणून सांगितलें आहे. संपूर्णता तर भगवन्नामानेंच होते याविषयीं स्मृतिवाक्य आहे. ॥ श्लोक ॥ यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु ॥ न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वंदे तमच्युतम् ॥ ५ ॥ याचा अर्थ वामनपंडितांनीं केला आहे ॥ श्लोक ॥ वसंततिलका ॥ ज्याच्या स्मृतीकरुनि आणि तसेंच नामें ॥ जें न्यून तेंहि परिपूर्णपणासि नेमें ॥ पावे तया करिन वंदन अच्युतातें ॥ ऐसें रहस्य पहिल्यांत निरूपिजेतें ॥ ६ ॥ तर सर्व कर्माची पूर्णता करणारें भगवन्नामच आहे. कर्म मंत्रतंत्र इत्यादिकांनीं व्यंग असलें तरी ईश्वराच्या नामसंकीर्तनानें पूर्ण होतें. याकरितां रामचंद्रांनीं कर्मसमाप्तीविषयीं जें सांगितलें त्यावरूनच नामस्मरणही सांगितलेंच. कारण, नामस्मरणावांचून कर्माची समाप्तीच नाहीं. याविषयीं एका कवीनें म्हटलें आहे ॥ श्लोक ॥ द्व्यर्थी ॥ देव स्मृताऽपन्नगराट्समूहे नन्विद्रवज्रोपमितौ तवाख्यौ ॥ यत्तद्द्वयंहिप्रथमं तथांते[१][२] तामुच्चरामोजगुरूपदिष्टां ॥ ७ ॥ अर्थ—हे देवा, तुझें नाम हें पातकरूपी पर्वताच्या समुदायाचे ठायीं इंद्रवज्राप्रमाणें आहे. म्हणजे पातकांचा नाश करणारें आहे. म्हणून आम्हीं कर्माच्या आरंभीं व शेवटीं गुरूनीं उपदेश केल्याप्रमाणें त्या तुझ्या नामाचा उच्चार करतों. यद्वा पन्नगराट् म्हणजे पिंगल नाग, त्याच्या छंदः शास्त्रांत जी इंद्रवज्रा ( एक वृत्त ) आहे त्याप्रमाणें तुझें नाम आहे. ती कशी आहे. यत्तद्द्वयं० जी दोन तगण प्रथम धारण करिते. आणि पुढें ज व दोन गुरु जींत सांगितले आहेत. ॥ ७ ॥ एवंच कर्मांतील न्यूनता पूर्ण करणारें आणि चित्तांतील सर्व पापमलाचा नाश करणारें एक भगवन्नामच आहे. याकरितां निरंतर भगवन्नामोच्चार स्वकल्याणेच्छु पुरुषांनीं करावा. याविषयीं मोरोपंत म्हणतात ॥ केकावली ॥ तुझें कुशल नाम हें मन हळू हळू आकळी ॥ दुरत्यय असा महा खळहि यास भी हा कळी ॥ हरी व्यसन पाप हें बहु कशास कायाधवा ॥ परी त्वरित भेटवी तुजचि योगमायाधवा ॥ ८ ॥ अर्थ—हे परमेश्वरा, हें आमचें मन हळू हळू जर तुझें नांव ग्रहण करील तर महा दुरत्यय खळ जो कली तोही यांत शिरण्यास भय पावेल. हें नाम सर्व दुःखें व तन्मूलभूत पापें यांचा नाश करितें. फार कशाला, हे योगमायाधवा, योगमायेस नियमन करणाऱ्या प्रभो, हें तुझें नाम प्रल्हादाप्रमाणें सर्वांस तुझें दर्शन करवितें. म्हणून रंगनाथस्वामी म्हणतात ॥ सदा श्रीहरीचें नाम० ॥ आतां श्रवण मननादि ज्ञान–साधनें किंवा प्राणायामादि योगसाधनें त्यांतही भगवन्नामस्मरण पाहिजे ॥ भगवन्नाम०म्ह० रामकृष्ण इत्यादि अवतार–संकेतच नव्हे, तर आत्मा, ब्रह्म, ॐ, तत्सत् इत्यादि सर्व भगवन्नामेंच होत. याविषयीं गीतेंत श्रीकृष्णाची उक्ति आहे ॥ श्लोक॥ ओंतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः॥ ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा॥९॥ अर्थ—ॐ, तत् आणि सत् हा तीन प्रकारचा निर्देश ( नाम ) ब्रह्मवस्तूचाच आहे. म्हणून त्या त्रिविध निर्देशानें ब्राह्मण, देव आणि यज्ञ हे प्रवृत्त झाले आहेत. याविषयीं ज्ञानेश्वर म्हणतात ॥ ओंवी ॥ तें कीरें अनाम अजाती ॥ परी अविद्यावर्गाचिये राती ॥ माजी ओळखावया श्रुती ॥ खूण केली ॥ १ ॥ उपजलिया बाळकासी ॥ नांव नाहीं तयापाशीं ॥

---

१ निश्चयेंकरून. २ अज्ञानसमूहाच्या.

ठेविलेनि नामेंसी ॥ ओ देत उठी ॥ २ ॥ कष्टलें संसारशिणें ॥ जे देवीं येती गऱ्हाणें ॥ तया ओ दे नांवें जेणें ॥ तो संकेतु हा ॥ ३ ॥ ब्रह्मींचा अबोला फिटावा ॥ अद्वैततत्वें तो भेटावा ॥ ऐसा मंत्रु देखिला कणवा ॥ वेदें बापें ॥ ४ ॥ तरी या नामींचीं अक्षरें तिन्ही ॥ कर्मा आदि मध्य निदानीं ॥ प्रयोजावीं पैं स्थानीं ॥ इहीं तिन्हीं ॥ ५ ॥ हेचि एकी हातवटी ॥ घेऊनि हन किरीटी ॥ आले ब्रह्मविद् भेटी ॥ ब्रह्माचिये ॥ ६ ॥ तात्पर्य—ब्रह्मज्ञान किंवा योगाभ्यास यांत ओंकारादि भगवन्नामानुसंधानावांचून कृतकृत्यता होत नाहीं. याकरितां सर्व साधनांचें सार हेंच कीं, आपण कोणत्याही अवस्थेंत, कोणत्याही व्यापारांत असलों तरी हरिनामाचें अनुसंधान अंतःकरणांत असावें, म्हणजे त्या योगानें अनायासें करून कृतार्थता होते. कारण जगदंतर्यामी जो ईश्वर तो त्या नामनिदिध्यासामुळें आपले हृदयांत स्फुरद्रूप होतो. मग अर्थातच स्वानंदसमुद्रांत निरंतर अवगाहन होतें. या आशयानें परमदयाळू रंगनाथस्वामी जीवांस उपदेश करतात. ॥ सदा श्रीहरि० ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहरमहादेव ॥ जानकीजीवन स्मरण जयजयराम ॥ याप्रमाणें भगवन्नामाचा निरंतर निदिध्यास केला असतां सर्व पुरुषार्थ प्राप्त होतात. महत्संकटें जरी आलीं असलीं तरी निवारण होतात. पहा, महिषासुर किती प्रबल झाला होता, आणि त्यानें देवांना अति त्रास दिला होता. परंतु भगवन्नामस्मरणानें त्यांचें तें संकट क्षणांत निवारण झालें याविषयीं कवि देवीप्रादुर्भावचरित्र निरूपण करितात.

# अथ देवीप्रादुर्भावचरित्रप्रारंभः

॥ श्लोक ॥ स्रगधरा० ॥ पूर्वीं देवासुरांचा प्रखर समर जो जाहला कीं शताब्दें[1] ॥ होता जेथें सुरांचा अधिपसर चमू माजि तो नाथ शब्दें ॥ दैत्यांचा माहिषाख्य प्रभु बलजलधी त्यांत दैत्यानुगानीं ॥ जिंकूनी देवसेना स्वपतिस दिधला तोष रंभादि-गानीं ॥ १ ॥ आर्या ॥ समरीं असुर पराजित अमरांसह अमरपति पितामह[3] ते ॥ जाति हरिहरासन्निध निष्प्रभ जे शत्रुनीं पितां महें ते ॥ २ ॥ कथिति सविस्तर महिषासुरचेष्टित ते मुरांधकारिपूंस ॥ समरजित अमर मानीं किंकर न कधीं सुरांध करि पूस ॥ ३ ॥ सूर्येंद्र मारुतानल चंद्र वरुण यम मुखादिकारातें ॥ महिष हरी हरिहरहो तद्वशता तासि न बाधि कारातें ॥ ४ ॥ सकलाधिकार चालवि आपण हांकून लोकपाळांसी ॥ मनुजापरि अवनीवरी फिरणें ये आमुच्या कपाळासी ॥ ५ ॥ श्लोक ॥ द्रुतविलंबित० ॥ कथिलें महिषासुरचेष्टिता ॥ शरण पावचि हे अति कष्टतां ॥ अजि करा सुविचार वधा खला ॥ जिणुनी निर्जर जो बहु तो खला ॥ ६ ॥ भुजंगप्रयात० ॥ अशी आयकूनी बहू दीन वाणी ॥ धरी रोष चित्तीं हरी शूलपाणी ॥ तदा भ्रूयुगें वक्र वक्त्रें जयांचीं ॥ अती उग्र हो लक्षणें हीं जयाचीं ॥ ७ ॥ आर्या ॥ तैं अति कुपित हरीच्या वदनांतुनि तेवि शिवमुखांतून ॥ तेजमिषें क्रोध निघे कीं गेला दैत्य फार मातून ॥ ८ ॥ तैसें ब्रह्मेंद्रादिक सकल विबुध देहजन्य तेज निघे ॥ जाणों महिषवधार्थचि तेजोमय अमरवृंद तें जनि घे ॥ ९ ॥ नार्याकृति एकवटुनि तैं दिसलें ज्वलित पर्व-

---

१ आगा होतो. २ शंभर वर्षें. ३ ब्रह्मदेव. ४ तेथ. ५ हरिहरांस. ६ जन्म.

तापरि तें ॥ झाले आंगावरोधन सुहृदय त्यजुनि सर्व ताप रितें ॥ १० ॥ जें शंभुतेज तेणें मुख याम्यें कचेंहि बहु हरितेजें ॥ चांद्रें कुचयुग झालें ऐंद्रें कटि हरि मदासि हरि तेजें ॥ ११ ॥ जंघोरू वरुणाच्या तेजें निपजे नितंब जगतीच्या ॥ चरणहि विरंचितेजें चरणांगुलि रविमहेंचि मग तीच्या ॥ १२ ॥ वसुतेजें हस्तांगुलि कौबेरें नासिकाहि दंत तिचे ॥ घडलें प्रजापतिमहें नयनत्रय पावकांश संततिचें ॥ १३ ॥ संध्याद्युतिनें भ्रुकुटि श्रवण समीरण मह प्रभवतीचे ॥ यापरि अन्याव्ययवाहि झाले इतरांश जन्य भवतीचे ॥ १४ ॥ श्लोक ॥ द्रुतविलं० ॥ सकल तेज समुद्भव ते शिवा ॥ बघुनि भाविति भावि मनें शिवा ॥ शिव तिला मग शूलहि दे करीं ॥ निजरथांगेंन चक्र तसें हरी ॥ १५ ॥ वरुण शंख हुताशन शक्तिला ॥ पवन चापहि तूंणहि दे तिला ॥ पवि सुराधिप देई तदा नवा ॥ तसिच घांट भयंकर दानवा ॥ १६ ॥ रथोद्धता ॥ धर्मदंड निरखून कालिका ॥ दक्ष देत निज अक्षमालिका ॥ ब्रह्मदहि कमंडलु त्वरें ॥ दे रवी तनुसि कांति मत्वरें ॥ १७ ॥ वसंततिलका० ॥ दे खड्ग काल तिस निर्मल चर्म हतें ॥ क्षीरांबुधी विमल हार नवांबरातें ॥ चूडामणी कटक कुंडल केयुरातें ॥ दे अर्धचंद्र पदकांसह नूपुरांतें ॥ १८ ॥ दे मुद्रिका मणिमया तिस विश्वकर्मा ॥ अस्त्रें अनेक परशूहि अभेद्य वर्मा ॥ अम्लान जीस कुसुमें नवमाहि ॥ दे सिंधु पंकज अभें अति रम्य पाही ॥ १९ ॥ आर्या ॥ हिमनग सिंह मणिहि दे धनद सूरापूर्ण पानपात्रातें ॥ शेषहि अहिमणिमाला दे युक्तचि होय दान पात्रातें ॥ २० ॥ यापरि आयुध भूषण दानें तिस दानवारि मानवती ॥ तंव तीव्र अट्टहासें गर्जे अंबर भरूनि मौनवती ॥ २१ ॥ अंबुधि उचंबळति तैं कांपति भूगिरि न शक्ति लोकांतें ॥ जय म्हणति मुदित सुरमुनि तीतें स्तविति त्यजनि शोकातें ॥ २२ ॥ घनाक्षरी ॥ असा होय अट्टहास ॥ गमे दानवांस त्रास ॥ जवें घेती आयुधांस ॥ मुखें श्वास सोडिती ॥ २३ ॥ म्हणे तैंच दैत्यराय ॥ महिष कोपें हें काय ॥ शब्दपथें सबळ जाय ॥ जेथें माय जगाची ॥ २४ ॥ दिंडी ॥ चरणभारें वसुमती कांपताहे ॥ मुकुट कोटी अंबरा टोंचताहे ॥ धनुःशब्दें पातालतल क्षोभे ॥ दिशा व्यापुनि भुजशतीं सती शोभे ॥ २५ ॥ जिचें लोकत्रय भरुनि तेज आहे ॥ तया देवीतें दैत्य पाहताहे ॥ होय देवीसह समर दानवांचें ॥ शस्त्र अस्त्रें चमकतीं नभीं साचें ॥ २६ ॥ आर्या ॥ माहिषासुर सेनापति चिक्षुर चतुरग सहित चामर हो ॥ षष्टिसहस्त्र रथ्यांसह युद्ध करी तो उदग्र पामर हो ॥ २७ ॥ अयुतसहस्त्र बलासह वेढी समरीं महाहनु तिला हो ॥ कोट्यर्ध चमूसह ये असि लोमापरि न योग्य नुतिलीं हो ॥ २८ ॥ धांवे बाष्कल बाष्कळ अयुतें घेऊन साहस कटकें ॥ रथ कोटिसह बिडालहि पवि भेदायास साहसें कटकें ॥ २९ ॥ यापरि अयुतावधि किती नागीं तुरंगीं किती रथावरि ते ॥ भेटे झटुनि कटुनि देवीसह झाले समरीं यमपथा वरिते ॥ ३० ॥ शतकोटी दंति रथ हय निर्युत सहित दितिजराज महिष खरा ॥ मृगराज वाहिनी परि मनीं न गणी त्या महौज माहिष खरा ॥ ३१ ॥ किती भिंदिपालैं तोमर पट्टिश किती शक्तिपाश मुशलातें ॥ परशूर परशु हाणिती परि उच्छेदी क्षणांत कुशला ते ॥ ३२ ॥ लीलेनें असुरबळी सोडी शस्त्रास्त्रजाल माय न भी ॥ असुरहि वर्षति तिजवरि तो शरसमु-

---

१ केश. २ कटिपश्चाद्भाग. ३ देवीचे. ४ कल्याणास. ५ स्वचक्रोत्पन्न. ६ भाता. ७ वस्त्र. ८ तेजस्वीपणा. ९ ढाल. १० कवच. ११ मान्य अशी देवी. १२ हर्षित. १३ स्तुतीला. १४ दहा हजार. १५ हातांतील कळ्यानें. १६ गजांवर. १७ धीर. १८ लक्ष. १९ बोकड. २० गोफणगुंडा.

ढाय काय माय नभीं ॥ ३३ ॥ मग अति कुपित मृगाधिप झाडुनियां मान असुरसेनाशीं ॥ झगटे वनीं दव तसा दनुजवरांचेंहि असु रसें नाशी ॥ ३४ ॥ श्लोक ॥ स्वागता० ॥ झुंजतां तुमुल दैत्यकँदंबा ॥ श्वास सोडि समरीं जगदंबा ॥ होति ते गणसहस्र वरीती ॥ युद्धरीति बन्नतांचि वरी ती ॥ ३५ ॥ भिंडिपाल परशू किति पट्टे ॥ घेति देति असुरां रणिं रट्टे ॥ वाजवूनि पटहादिक हट्टें ॥ पाडिती किति कराप्रति घट्टे ॥ ३६ ॥ इंद्रवज्रा० ॥ देवी त्रिशुलें बहु दानवांतें ॥ मारी किती शक्ति गदानिपातें ॥ खड्गप्रहारें किती छिन्न केले ॥ घंटास्वनें मोहित अन्य ठेले ॥ ३७ ॥ वसंत० ॥ आकर्षिले कितिक घालुनि पाश कंठीं ॥ ओकीत रक्त मुशलाहत काळ कंठी ॥ कोणी शरींच खिळिले मरती रणीं ते ॥ कित्येक पाहुनिच अद्भुत कारिणीतें ॥ ३८ ॥ शार्दूलविक्री० ॥ कोणाचे शिर कंठ बाहुहि तसे छेदी स्वयें अंबिका ॥ दैत्यांचे किती पीनें देह चिरिते मध्यें जशा तुंबिका ॥ बाहू एक पदाक्षि कर्णहि तसें खंडें अशीं तीं कितीं ॥ खड्गानें करि तैं कबंध उठती शस्त्रां किती फेंकिती ॥ ३९ ॥ आर्या ॥ जेथें अति तुमुल असें होय महायुद्ध ते दिनीं वाटे ॥ पतित गजाश्वशवांहीं दुर्गम अत्युग्र मेदिनी वाटे ॥ ४० ॥ असुरगजाश्वतनुद्भवशोणितपूरा नद्या शतावधि त्या ॥ दुर्गा वाहवी न मिति तै ज्यातें रिपुचमू शतावधि त्या ॥ ४१ ॥ तो सिंहहि अति दारुण गर्जे झाडी स्वकेसरां वेगें ॥ ते गणहि म्हणति करितों क्षण रण त्वां कालिके सरावें गे ॥ ४२ ॥ प्रमँथांचा असुरांचा तैं चित्रँद महा समर झाला ॥ प्रथम गणीं कुसुमातें पाहुनियां वर्षती अमर ज्याला ॥ ४३ ॥ श्लोक ॥ स्वागता० ॥ जर्जरा सकळ दानवसेना ॥ अंतरीं समरधैर्य वसेना ॥ सैन्यरक्ष मग चिक्षुर धांवे ॥ अंबिकेस मनिं भावि वधावें ॥ ४४ ॥ वर्षला शरसमुच्चय तीतें ॥ तैं गणी श्रम न क्लेशहि ती ते ॥ मेरु जेंवि न गणी जलधारा ॥ अंबिका शर तसे अवधारा ॥ ४५ ॥ आर्या ॥ चिक्षुरशर जगदंबा छेदुनियां सहज तद्रथा वाजी ॥ वाहति त्यांसह सारथि वधि तो विक्रम किती कथावा जी ॥ ४६ ॥ छेदुनि चाप ध्वजही सर्व शरीरास निशित शर-जाळीं ॥ विद्ध करुनि रणरंगीं निजविक्रमँ तीव्र दाविती जाली ॥ ४७ ॥ यापरि विरथ विधन्वा ँव्यश्व विसारथि धरूनि तलवारी ॥ कालाहूतचि धांवे देवीवरी कोण त्या इतर वारी ॥ ४८ ॥ हरिते असुर असीनें शिरिं हाणुनि देविच्याहि सव्य भुजा ॥ खड्गप्रहार करि खळ झडपी जैसा पतंग हव्यँभुजा ॥ ४९ ॥ श्लोक ॥ इंद्रवज्रा० ॥ तो खड्ग देवीभुज पावला जों ॥ तो भंगला तैं खळ कां न लाजो ॥ कोपें महा शूळ झुगारि तीतें ॥ जें सूर्यबिंबापरि हे रितीतें ॥ ५० ॥ माल्यभारा० ॥ निजशूळ तयावरि शिवा हे ॥ तयिं सोडि निजशक्तिच्या प्रवाहें ॥ शतधा करि शूलही चुरातें ॥ अरि धाडी शँमनाचिया पुरातें ॥ ५१ ॥ दिंडी ॥ असा चिक्षुर मारितां चामरासी ॥ युद्धवांछा उपजली पामरासी ॥ गजारूढाचे धांवला महाशक्ति ॥ शक्ति लक्षुनि तो सोडि महाशक्ति ॥ ५२ ॥ शक्ति दुँर्गा हुंकारजवें पाडी ॥ धरे चामर मग शूल तिला धाडी ॥ शरें तोडी अंबिका केसरी तों ॥ नवल वाटे या विक्रमा करी तो ॥ ५३ ॥ गंड भित्तीवरी चढुनि तो गजाचे ॥ करी असुरांसह युद्ध हरि भुजांचें ॥ असे झुंजति केसरी असुर साचे ॥ धरे उतरुनि रण करिति समर साचें ॥ ५४ ॥

---

१ प्राण. २ वीररसानें. ३ समूहास. ४ पुष्ट. ५ गणांचा. ६ आश्चर्यकारक. ७ पराक्रम. ८ अश्वरहित ९ अग्नीला. १० यमाच्या. ११ देवी.

पुढें हरिनें उड्डाण करुनि हातें । चामराचें शिर छेदिलें पहा तें ॥ शिलाद्रुमही हाणून उदग्रातें ॥ रणीं अंबा वधि वीर्य सामग्रातें ॥ ५५ ॥ श्लोक ॥ भुजंगप्र० ॥ वळूनि दृढा मुष्टि हाणी कराळा ॥ करी दंश दंतीं वधी त्या कराळा ॥ गदेच्या प्रहारीं तया उद्धतातें ॥ करी चूर्ण अंबा रणीं उद्धता ते ॥ ५६ ॥ वधी भिंदिपाळेंचि त्या बाष्कलातें ॥ शरीं ताम्रका अंधका बाष्कलातें ॥ महाहानु उग्रानना उग्रवीर्या ॥ त्रिनेत्रा त्रिशूलें वधी उग्रवीर्या ॥ ५७ ॥ आर्या ॥ दुर्धर दुर्मुख दनुजा शरजालें अतिबला बिडालातें ॥ छेदी सहज असीनें हरिवहना काय मी बिडालातें ॥ ५८ ॥ ऐसें क्षीण निजबळ प्रेक्षुनियां महिष फार रागावे ॥ जें नाम तीच आकृति धरि मग तच्चरित काय सांगावें ॥ ५९ ॥ कोणा मुख प्रहारें कोणास खुरीं करी विदारण हो ॥ कोणासि लांगुलें करि शृंगांनीं त्या गणीं तदा रण हो ॥ ६० ॥ किती वेगें किति नादें भ्रमणें श्वासेंचि किती गणास रणीं ॥ यापरि सकळ प्रमदा मथन करी महिष करुनि बहुसरणीं ॥ ६१ ॥ मग सिंहास वधाया धांवे जैं महिष तो विलज्ज रणीं ॥ तैं कोप अंबिकेला ये कीं अति दुःसहाचि हे करणी ॥ ६२ ॥ श्लोक ॥ रथोद्धता० ॥ तोहि महिष मर्दोंचि मातला ॥ जो खुरीं करित चूर्ण भूतला ॥ शृंगिं शैल उचली अहो बळें ॥ लांगुलें जलनिधी उचंबळे ॥६३॥ वसंततिलका० ॥ शृंगें करूनि गगनीं घन भिन्न होती ॥ श्वासें किती द्रुम उडोनि नभास जाती ॥ ऐसा मदांध महिषासुर ये हरीतें ॥ मारावया मति तयासि शिवा धरी ते ॥ ६४ ॥ स्वागता०॥ पाश घालुनि तया धरि माय ॥ तोंचि तो त्यजुनि माहिषकाय ॥ होय सिंह तयिं पूर्ण रुषातें ॥ मारि तेंचि निरखी पुरुषातें ॥ ६५ ॥ खड्गचर्मधर त्या पुरुषासी ॥ अंबिका निजशरीं जंव शासी ॥ तैंच होउनि महा गज राहे ॥ ओढुनी हरिस गर्जत आहे ॥६६ ॥ श्लोक०॥ शालिनी ॥ शुंडेनें जो ओढि सिंहास नीच ॥ देवी पाहे रूढ सिंहासनींच ॥ छेदी खड्गें सोंड ती आलियाची ॥ तों तो घेई आकृति हालियाची ॥६७॥त्रैलोक्यातें तो खळ त्रास भारी ॥ देयी सर्वां त्या गणांसीं निवारी ॥ तें पाहूनी क्रुद्ध ते लोकमाता ॥ मद्य प्राशी शौलिनी शत्रु- घाता ॥६८॥द्रुतवि०॥अरुणनेत्र सुघूर्णित दीसती॥ पिउनि पान अति स्फुट हांसती ॥ महिषही स्वमदें करि गर्जना ॥ उपजती भय तैं सकळां जनां ॥ ६९ ॥ स्वागता० ॥ रोंवुनी महित तो निजशृंगें ॥ ऊपडोनिहि महागिरि शृंगें ॥ चंडिकेवरि झुगारि बळानें ॥ त्रासिलें अमित तीस खळानें ॥ ७० ॥ बाण सोडुनि तदां जगदंबा ॥ चूर्ण त्याहि करि शैलकदंबा ॥ मद्यघूर्ण नयनाचि सुरातें ॥ पीत त्या रणिं वदे असुरातें ॥७१॥ सवाई ॥ गर्जन तर्जन सर्व करीं क्षण जोंवरि पीत असें मदिरा मी ॥ मूढमते तुज या रणिं मी वधिं निर्जर गर्जति तैं सुरधामीं ॥ यापरि बोलुनि त्या असुरावरि देवि चढे पद ठेवुनि कंठीं ॥ दानव तैं पदभार निपीडित एक पळाहि युगासम कंठी ॥७२॥ आर्या ॥ पाहे तिच्या पदांतुनि महिष सुटाया निघे मुखांतून ॥ अर्धोद्गता म्हणे ती भजसी आतां जगत्सुखा तूं न ॥७३॥ बाहेरि आंत अर्धा, करितो स्पर्धा करूनि समराशीं ॥ छेदुनि असिनें मूर्धा देवी दे तैं प्रमोद अमरांशीं ॥ ७४ ॥ महिष पडे तैं हाहाकार करुनि असुर सकळ पळतीच ॥ पळतीच एक समरीं मृतशेष द्रुत पुन्हां न वळतीच ॥ ७५ ॥ स्तविती मग मुदित विबुध जें आर्याचरित वासवासहित ॥ गंधर्व गाति अमरीं नाचति बालि देति

---

१ मांजरास. २ शेंपूट. ३ युद्धमार्ग. ४ देवी.

आसवासहित ॥ ७६ ॥ पद ॥ तारी मला जगदंबे ॥ दुर्गे ता० ॥ त्वच्चरणाविण देवि नसे मज ॥ अन्य जगीं अवलंब ॥ दुर्गे ता० ॥ १ ॥ तनुमद महिष मला छळि निशिदिनीं ॥ सोडवीं न करि विलंब ॥ दुर्गे ता० ॥ २ ॥ अंब तुझ्या चरणांबुजिं रुंजो ॥ वामनमन रोलंबै ॥ दुर्गे ता० ॥ ३ ॥ श्लोक ॥ द्रुतवि० ॥ त्रिपुरसुंदरिच्या चरणांबुजा ॥ नमुनि आठवुनी वदनांबुजा ॥ त्रिविध ताप शमास्तव जो महा ॥ ग्रथि शिवाजय वामन नाम हा ॥ ७८ ॥ एवंच देवींनें महिषासुराचा नाश करून सर्व देवांना अपरिमित सुख दिलें. त्यांचे सर्व अधिकार महिषासुरनें हरण केलेले त्यांस देऊन स्वर्गवासाचे भोग पुनः दिले. याचें कारण इतकेंच की, ते सर्व देव अंतःकरणानें हरिहरांस शरणागत होऊन वाणीनें त्यांचें नाम गायन करून महिषासुरदत्त दुःख निवेदन करिते झाले. म्हणून हरिहरांच्या देवपक्षपातमूलक रोषाच्या तेजापासून तसेंच अन्य देवांच्याही क्रोधतेजापासून भगवती प्रगट झाली. त्यामुळें अनिष्टपरिहार आणि इष्टप्राप्ति हीं दोन्ही फळें देवांस प्राप्त झालीं. तसेंच जे अनन्य शरण होऊन भगवन्नामस्मरण अखंड करतात त्यांच्या अंतःकरणांत भक्तपक्षपातजन्य भगवत्तेजापासून विद्याशक्तीचा उदय होऊन महिषरूप देहाभिमानजनित संसारदुःखाचा ती नाश करते. याकरितां रंगनाथस्वामी म्हणतात. बापांनो, नित्य दुःखरहित होऊन स्वानंदसमुद्रांत निमग्न असावें अशी इच्छा असल्यास हें करीत जा कीं,—सदां श्रीहरिचें नाम गात जा० ॥ आरती देवीची ॥ दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं ॥ अनाथनाथे अंबे करुणा विस्तारीं ॥ वारीं वारीं जन्ममरणातें वारीं ॥ हारीं पडलों आतां संकट निवारीं ॥ १ ॥ जयदेवी जयदेवी महिषासुर-मथिनी ॥ सरवरईश्वरवरदे तारक संजिवनी ॥ ध्रु० ॥ त्रिभुवन-भुवनीं पाहतां तुज ऐसी नाहीं ॥ चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ॥ साही विवाद करितां पडले प्रवाहीं ॥ ते तूं भक्तांलागीं पावसि लवलाहीं ॥ २ ॥ जयदेवी० ॥ प्रसन्न वदनें प्रसन्न होसी निजदासा ॥ क्लेशापासुनी सोडीं तोडीं भवपाशा ॥ अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा ॥ नरहरी तल्लिन झाला पदपंकजलेशा ॥ ३ ॥ जयदेवी० ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पये तत् ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भज ॥ श्रीधरं माधवं गोपी-कावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भज ॥ पालय पालय मां जगदंब ॥ दीनमनाथदयासरिदंब ॥ इति भजनं ॥ पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ जगज्जननीकी जय ॥ इति श्रीदेवीचरितं समाप्तम् ॥ श्रीमज्जगदंबार्पणमस्तु॥

## कथा १० वी.

# गोपालकाला, पूर्वरंग निरूपण.

श्रीमन्महागणाधिपतयेनमः॥ इत्यादि नमनं ॥ विठाबाई माउली ॥ दया करिं विठाबाई माउली ॥ इति भजनं ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांत

१ भ्रमर.

स्मरण जयजयराम ॥ अभंग ॥ गोकुळींच्या सुखा ॥ अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ ध्रु० ॥ बाळकृष्ण नंदा घरीं ॥ आनंदल्या नरनारी ॥ २ ॥ गुढिया तोरणें ॥ करिती कथा गाती गाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे छंदें ॥ मन मोहिलें गोविंदें ॥ ४ ॥ अभंग झाल्यावर ध्रुवपद म्हणून पुनः पुंडलिकवरदे हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥ आदौकीर्तनारंभीं भगवद्भक्तचुडामणि तुकारामाख्य साधु गोकुलवासी लोकांचें महाभाग्य वर्णन करितात ॥ गोकुळींच्या सुखा० ॥ गोकुळांत वास करणारे जे गोप, गोपी यांचें जें सुख तें अवर्णनीय आहे. कारण इतर जीं सुखें आहेत त्यांना उत्तरक्षणीं नाश आहे, व इयत्ता आहे. आणि गोकुळवासी लोकांच्या सुखाला अंत व पार नाहीं. म्हणून म्हणतात, ॥ अंतपार नाहीं लेखा ॥ याविषयीं भागवतांत दशमस्कंधीं ब्रह्मदेवाची उक्ति आहे ॥ श्लोक ॥ तद्भूरिभाग्यमिहजन्मकिमप्यटव्या, यद्गोकुलेऽपिकतमांघ्रिरजोभिषेकं ॥ यज्जीवितं तु निखिलं भगवानमुकुंदस्त्वद्यापि यत्पदरजः श्रुतिमृग्यमेव ॥ १ ॥ अर्थ—ब्रह्मदेव म्हणतात, हे श्रीकृष्णा, गोकुळांत किंवा जवळ एकादे अरण्यांत वल्लीचें किंवा तृणाचें जन्म प्राप्त होणें हें महद्भाग्य होय. कारण ज्यांत गोकुळवासी लोकांपैकीं कोणाचे तरी चरणरज मस्तकावर पडेल. तुम्ही म्हाणाल कीं, गोकुळवासी लोकांच्या रजाचें इतकें काय महात्म्य आहे ? तर (यज्जीवितं) ज्याचे चरणरज अद्यापि सर्व वेद शोधितच आहेत, परंतु त्यांस प्राप्त होत नाहींत गोकुळांतील लोकांच्या चरणधुळीचा अभिषेक ज्या तृणादि जन्मांत आपल्याला होईल तसें जन्म प्राप्त होणें महद्भाग्य होय, यांत संशय नाहीं. शुकाचार्येही म्हणतात ॥ श्लोक ॥ अहोभाग्यमहोभाग्यं नंदगोपव्रजौकसां ॥ यन्मित्रं परमानंदं पूर्ण ब्रह्म सनातनम् ॥ २ ॥ अर्थ—नंद, गोप आणि इतरही गोकुळवासी जे लोक आहेत त्यांचें भाग्य मोठें आश्चर्यकारक आहे. कारण ' यन्मित्रं ' परमानंदघन अविनाशी जें पूर्ण ब्रह्म श्रीकृष्ण हा ज्यांचा परम मित्र आहे. हा आशय धरून तुकाराम म्हणतात ॥ गोकुळींच्या सुखा० ॥ ब्रह्मस्तुतींत ब्रह्मदेव म्हणतात कीं, या गोपगोपींचा साक्षात् षड्गुणैश्वर्य—संपन्न भगवानही ऋणी आहे. मग त्यांचें भाग्य काय वर्णन करावें ? ॥ श्लोक ॥ एषां घोषनिवासिनामुत भवान् किं देव रातेतिनश्चे तोविश्वफलात् फलं त्वदपरं कुत्राप्ययन् मुह्यति ॥ सद्वेषादिव पूतनाऽपि सकुला त्वामेव देवापितायद्धामार्थसुहृत्प्रियार्थतनयप्राणाशयास्त्वत्कृते ॥ ३ ॥ अर्थ—हे देवा, कृष्णा, या गोकुळवासी लोकांना तूं काय फळ देशील ? हा विचार करतांना आमचें मन सर्व ठिकाणीं फिरून शेवटीं मोहांत पडलें. कारण फळांत श्रेष्ठ फळ काय तें तूंच. मग तुजवांचून त्यांस देण्यासारखें कांहीं दुसरें फळ नाहीं. याकरितां त्याचें ऋण तुझ्यावर राहणार आहे. आपण म्हणाल त्यांना मी आपलें सायुज्य देईन, आणि ऋणमुक्त होईन, तर त्यानेंही ऋण फिटणार नाहीं; कारण पूतना ही साध्वीचा वेष मात्र धरून तुला मारण्याकरितां आली होती. तिलाही तूं तिच्या स्तनांतील विष प्राशन करून सायुज्यमुक्ति दिलीस. मग तीच जर गोपगोपींना दिली तर त्यांत काय अधिक आहे ! आपण म्हणाल, त्यांच्या सर्व कुलांस व इष्टमित्रांसही सायुज्यमुक्ति देईन, तर पूतनेलाही तिच्या कुळासकट म्हणजे अघासुर, बकासुर यांसहित मुक्त केलें. मग तसेंच गोपगोपींस केल्यांत कांहीं अधिक नाहीं. आतां आपण म्हणाल कीं, म्हणूनच मी त्यांच्या पुत्रादि रूपानें वागून त्यांस निरतिशय सुख देत आहें

तर ज्या गोपगोपींनीं आपलीं घरें, द्रव्य, इष्ट, मित्र, देह, पुत्र, प्राण आणि अंतःकरण हीं सर्व तुला अर्पण केलीं आहेत, असें अकृत्रिम प्रेम ठेवणारे जे व्रजवासी त्यांस आपण कपटानें पुत्रादि रूप होऊन सुख दिलें तरी त्यांच्या निर्मल व निर्हेतुक भक्तीचें ऋण फिटणार नाहीं. याकरितां, हे भगवन्, तुम्हीं सर्वथा त्यांचे ऋणी आहां. तात्पर्य—साक्षात् भगवान् जर ऋणी आहे तर त्यांचें भाग्य व सुख काय वर्णन करावें ? म्हणून तुकाराम म्हणतात ॥ गोकुळींच्या सुखा० ॥ त्या गोकुळांत नंदगृहीं श्रीकृष्ण जन्मल्यामुळें लक्ष्मीचें वास्तव्य घरोघरीं झालें. याविषयीं कवि म्हणतात ॥ **आर्या** ॥ नारायण एकस्मिन् नंदगृहे नंदनंदनो न्यवसत् ॥ निलये निलये लक्ष्मी गोष्ठे त्वंभोधिनंदिनी ववृधे ॥४॥ **अर्थ**—गोकुळांत एका नंदाच्या घरींच श्रीकृष्ण वास्तव्य करता झाला. परंतु समुद्र-कन्या जी लक्ष्मी ति गृहागृहाचे ठायीं वरचेवर वृद्धिंगत होत चालली आहे. ॥ **आर्या** ॥ वामनपणीं अदितिला कौसल्येला न जें नृपाळपणीं ॥ तें सुख गोपींला दे शतदां दिवसांत देव बाळपणीं ॥ ६ ॥ **अर्थ**—पूर्वीं वामनावतारांत अदितीला ( देवमातेला ) किंवा रामावतारीं कौसल्येला जें सुख दिलें नाहीं तें सुख श्रीकृष्णानें बाळपणीं ज्या यशोदेला दिवसांतून शंभर वेळां द्यावें, मग तिचें भाग्य किती वर्णन करावें ? याचप्रमाणें इतर गोपींनाही नारायणांनीं अत्यंत सुख दिलें, त्याचें वर्णन शेषास सुद्धां करतां येणार नाहीं. याविषयीं लीलाशुक म्हणतात ॥ **श्लोक** ॥ पुष्पिता० ॥ परमिममुपदेशमाद्रियध्वंनिगमवनेषु नितांतचारखिन्नाः ॥ विचिनुत भवनेषु बल्लवीनामुपनिषदर्थमुलूखले निबद्धं ॥ ९ ॥ **अर्थ**—कवि मुमुक्षु जनांस उद्देशून म्हणतात. बापांनो, निगमवेद्य वस्तूचें ज्ञान व्हावें म्हणून वेद हींच कोणी एक वनें यांत अतिशय परिभ्रमण करून थकलेले आहां. याकरितां तुम्हांला एक अत्युत्कृष्ट उपदेश मी सांगतों, याचा आदर करा. तो कोणता म्हणाल तर हा वेदाचा शिरोभाग जीं उपनिषदें त्यांतील मुख्य प्रतिपाद्य जो अर्थ तोच गोकुळांत गोपींचे घरीं उखळाशीं बांधला आहे. तेथेंच तुम्हीं शोध करा म्हणजे तुम्हांला मिळेल. तात्पर्य, पूर्णब्रह्म सगुणरूपानें रात्रंदिवस जेथें क्रीडा करीत आहे, त्या गोकुळवासी लोकांचे सुखाला अंत व पार नाहीं. हा आशय मनांत आणून तुकाराम म्हणतात, ॥ गोकुळींच्या सुखा० ॥ एवं सर्व गोकुळवासी लोकांच्या सुखाला अंतपार नाहीं. त्यांत विशेषेंकरून यशोदा व नंद यांचें भाग्य तर वर्णन करण्यासही अशक्य आहे. कवि म्हणतात ॥ **आर्या** ॥ यद्रोमरंध्रपूर्तावभवन्सप्तापि चलधयोऽशक्ताः ॥ तन्नंदगोपपत्नी स्नापयति स्वांजलिस्थ तोयेन ॥ ६ ॥ **अर्थ**—ज्या परमेश्वराच्या एका रोमरंध्राची पूर्णता करण्याविषयीं सात समुद्रही समर्थ नाहींत, त्याला नंदपत्नी यशोदा आपल्या ओंजळींतील पाण्यानें नाहू घालत्ये हें काय आश्चर्य आहे ? तसेंच ॥ **आर्या** ॥ यस्य तु नामोच्चारात् कालोपि हि बाधते न भक्तजनान् ॥ जगदृग्भीत्या जननी तस्य कपोले ह्यदान्मषीतिलकम् ॥ ७ ॥ **अर्थ**—काळही ज्याच्या नामोच्चारास भिऊन भक्तजनांस पीडा करीत नाहीं त्याच्या गालास लोकांची दृष्टि लागूं नये म्हणून यशोदा काजळाचें बोट लावत्ये. पहा, भगवंतांनीं भक्ताकरितां आपलें महत्त्व सोडून मानुषनाट्यानें अनेक बाललीला कौतुक ज्या गोपगोपींस दाखवून अतिशय सुख दिलें. त्यांचें तें सुख खरोखर अनंत अपार आहे, म्हणून तुकाराम म्हणतात ॥ गोकुळींच्या सुखा ॥ अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ पुंडलीकवरदे हरि-

विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ जानकीजीवनस्मरण जयजयराम ॥ १ ॥ आतां नारायणांनीं गोपगोपींस सुख देण्याकरितां कोणकोणतीं चरित्रें केलीं तीं समजण्याकरितां कवि कांहीं बाललीला वर्णन करून गोपालकाला चरित्र वर्णन करितात.

---

# अथ गोपालकाला प्रारंभः

॥साकी ॥ आनंद करि नंद सुतोत्सव देई द्विजां गोदानें ॥ वित्त दरिद्रा, तैल हरिद्रा लावी पशुंसि मोदानें ॥ १ ॥ हरिभजनीं व्रजजन हरिखति बहु न स्मरती घरदार ॥ दारसहित निज सदनिं येति त्यां पूजी नंद उदार ॥ २ ॥ दहिं दूध लोणी परस्परांवर उधळिति शिंपिति गौळी ॥ रुचिराभरणें वसनें धरिती जायें प्रगटे सुरमौळी ॥ ३ ॥ श्लोक ॥ वसंततिलका० ॥ येरीकडे स्वसुत ठेवुनि नंदकन्या ॥ नेली तिलाहि धरि कंसमती न अन्या ॥ जों आपटी तंव निघोनि नभींच गेली ॥ देवी वदे परिसतां मति मूढ ठेली ॥ ४ ॥ आर्या ॥ नष्टा मज मारुनि फळ काय तुझा काळ वेगळा आहे ॥ कोठें तरि वाढतसे वधिल तुला उक्ति मनिं धरीं गा हे ॥ ५ ॥ मग कंसें माराया शिशु निर्दय कीं अनिर्दश खळानें ॥ आज्ञापिलें स्वसेवक दनुज तदा मृत्युभीत चपळानें ॥ ६ ॥ भव्य स्वरूप घेउनि कपटें तों पूतना व्रजीं आली ॥ व्याली परीस उग्रा जी केवळ मृत्युची स्वयें आली ॥ ७ ॥ दे उग्र विषरस स्तन अंकीं घेऊनि लोकपाळाला ॥ हा त्या वदनीं द्याया आला रस काय हो कपाळाला ॥ ८ ॥ यज्ञपति विष म्हणेना झांकुनि नयनें जगज्जनक थानीं ॥ रुचि आणुनि पी तिस दे अमृत म्हणुनि वेधिलें जन कथांनीं ॥ ९ ॥ वपु पुष्प—दामसें तें गुरु होता अंक पीडिता आर्या ॥ मी भूमीवरि ठेंवी मग जो कांहीं गृहीं करी कार्या ॥ १० ॥ तेव्हांचि कंसहितकर दुष्ट तृणावर्त दैत्य ने त्यातें ॥ विश्वाच्या ब्रम्हचाच्या प्रबला काळाचियाहि नेत्यातें ॥ ११ ॥ यदभेंट शताभ्यधिक खळ गेला गगनीं अशांत हरि त्यातें ॥ गुरुता स्वीकारुनि धरि दृढ कंठीं आपणासी हरित्यातें ॥ १२ ॥ न सुटे मिठी न चाले बळ खळ बळहीन जाहला रडला ॥ स्वनयन युग सह हर खर्र शरहतपुरसा शिळातळीं पडला ॥ १३ ॥ ओंवी ॥ तेथें एकदां गर्गमुनी ॥ वासुदेवाचें संमत घेउनी ॥ आले नंद तया नमुनी ॥ जातक करवी गुप्त स्थलीं ॥ १४ ॥ आर्या ॥ सुज्ञ स्थापी एका संकर्षण रामबळ अशीं नामें ॥ तो कृष्ण वासुदेव प्रमुख बहु दुजा सुतास सद्भावें ॥ १५ ॥ साकी ॥ देतिल अति सुख जन गोद्विज मख संगोपुनि धर्मातें ॥ स्थापुनि भुवनत्रयिं यश करतिल अति अद्भुत कर्मातें ॥ १६ ॥ आर्या ॥ नवपल्लव मृदु कर पद विभु रांगति कर्दमांतही तुच्छें ॥ वत्सांची अवलंबुनि ते जगदवलंब चालती पुच्छें ॥ १७ ॥ गल्ली चुंबिति भेटति नाचविति सुशब्द पढविति ब्रह्मा ॥ गोपी शिकविति नति यतिपतिमतिरतिदा यदात्मज ब्रह्मा ॥ १८ ॥ अभंग ॥ मेळवुनि सौंगडे सांगतो तयांस ॥ चलारे गोरस देतों तुम्हां ॥ १९ ॥ ओंवी ॥ घ्यारे सामुग्री चोखट ॥ खडे सराटे काठ्या नीट ॥ माज बांधारे बळकट ॥ शब्द कटकट न करावी ॥ २० ॥ वस्त्रगाळीव

---

१सर्पिणी. २ सखी. ३ मोक्ष. ४ हार. ५ जड. ६ शास्त्यास. ७ योद्धे. ८ तीक्ष्ण. ९ दगडाखालीं.

मृत्तिका ॥ घेऊन प्रवेशा शंकू नका ॥ सकळ गृहींचा आवांका ॥ मज ठाऊका असेची ॥ २१ ॥ भीतरीं प्रवेशोनि येकीकडे ॥ सव्यापसव्य टाकावे खडे ॥ पात्र वाजतां कडाडे ॥ जावोनि रोकडें आणावें ॥ २२ ॥ सांचल ऐकतां गवळणी ॥ वेगें येतील धांवोनी ॥ तंव सराटे पसरारे अंगणीं ॥ पाय चुबकोनी गुंगती ॥ २३ ॥ तेही चुकवोनी येती बाळा ॥ तंव मृत्तिका टाकावी डोळां ॥ नेत्र चोळती तंव पळा ॥ नवल कळा सांगितली ॥२४॥ अभंग ॥ गेली असे एक गौळणी जळाला ॥ सांगती गोपाळा तेथें जाऊं॥२५॥ पद ॥ सख्या हरी चोरी चाल करूं ॥ध्रु०॥ पालथिलें गृह गोरस पुष्कळ ॥ गोप मिळोनि हरूं ॥ १ ॥ दधि भरणीसी टोंचुनियां तळीं ॥ वदनीं धार धरूं ॥ २ ॥ उद्धवचिद्घन अद्वय गोरस ॥ उरलें अंग भरूं ॥२६॥ श्लोक ॥ संपूर्ण भाग्योदय होय जीचा ॥ तीच्या घरा ये सुत नंदजीचा ॥ जो चिंतनें सर्व भया हरीतो ॥ ऐका पुढें काय करी हरी तो ॥ २७ ॥ अभंग ॥ कोणी पिती दूध कोणी खाती दहीं ॥ आली लवलाही गवळण ॥ १ ॥ न पुरेची हात दूध शिंक्यावरी ॥ करावें मुरारी काय येथें ॥ २ ॥ पाटावरी पाट रची वनमाळी ॥ पाडीतसे डूळी मुरलीनें ॥३॥ बडवूनि टीरी नाचतसे पेंदा॥भलीले गोविंदा युक्ति केली॥४॥ उदालेल्या बेत्या तळूं नतो दळबला ॥ थंबालीले गोला लोनीयाचा ॥ ५ ॥ गोपी अहर्निशीं जपे धरायासी ॥ आतां कैसा जासी चोरटिया ॥ ६ ॥ २८ ॥ श्लोक ॥ तदा माधवें अंतरीं आठवीलें ॥ मुखीं दूध होतें बहु सांठवीलें ॥ मुकुंदास गोपी धराया निघाली ॥ तिच्या लोचनीं दुग्ध फुंकोनि घाली ॥२९॥ कडे घेउनी कृष्णनाथा उदारा ॥ गृहद्वारदेशीं उभी नंददारा ॥ मिळे बायको मात्र तेथें व्रजाची ॥ म्हणे पुत्र तूझा अगे तीव्र जाची ॥३०॥कडे तुझिया दीसतो साधु हा गे ॥ मुते उंबरा आमुच्या आणि हागे ॥ पडे नेणतां पाय हो त्याची माजीं ॥ करी हास्य तेव्हां मुलींच्या समाजीं ॥ ३१ ॥ पद ॥ यशोदेबाइ ॥ गाऱ्हाणीं सांगूं काई ॥ध्रु०॥ माझे सुतेसी चाळविलें ॥ कुंजवनामाजीं नेलें॥ म्हणोनि म्यां दटाविलें ॥ फोडिली डोई ॥ १ ॥ दुसरीं सांगे घरासि आला ॥ कोणा नाहीं तेव्हां म्याला ॥ संचित गोरस माझा प्याला ॥ सोडिल्या गाई ॥ २ ॥ ऐसें वाटे माझे जीवें ॥ तुझ्या नगरा सोडुनि जावें॥ शिवदिन म्हणे लागे भावें ॥ केसरी-पायीं ॥ ३२ ॥ श्लोक ॥ मातेसही बोतलसे हरी तो ॥ तीचें तयाचें मन जो हरीतो ॥ माते म्हणे हें लटिकेंची सारें ॥ या बायकांचीं वचनें असारें ॥ ३३ ॥ पद ॥ अयि मा श्रृणु तत्रात्रास्ति तथ्यवाक्काऽपि[1] ॥ मजवरि द्वेषें घेतात तुफानें गोपी ॥ ध्रु० ॥ किं दारिद्र्यं मम सद्मनि यत् प्रचुरामि[2] ॥ भोजना करितों कीं नित्य पयःप्रचुरा मी ॥ गोक्षुर हेतोः किं पंगूर्गा विदधामि[3] ॥ किति ल्हाचारही पसरिले म्हणति जी धामीं ॥ दधि नवनीतं बत पीतं न च पश्यामि ॥ कशी हीं तुफानें उठविति या मेघश्यामीं ॥ जातु चिदमहपि वद मातः किमसत्यालापि ॥ मजवरिद्वे० ॥ ३४ ॥ अयिमा० ॥ अ-

---

१ आई, तें कांहीं तूं ऐकूं नकोस. कां कीं, यांत खरें बोलणारी कोणी नाहीं. २ आई माझ्या घरीं दारिद्र्य आहे काय ? म्हणून मी चोरी करीन. ३ यांत गोक्षुर म्हणजे सराटे दारीं पसरितो असें गोपीचें म्हणणें. कृष्ण गोक्षुर याचा गाईचे खूर असा अर्थ करून म्हणतो कीं, मी गोक्षुराकरितां आपल्या गाई लंगड्या करतां कीं काय ? ४ आई यशोदे, दहीं, लोणी, दूध हें पीतं म्हणजे पिवळें कधीं मीं पाहिलें नाहीं. गोपींच्या वाक्यांत पीतं म्हणजे प्याला अर्थ आहे. ५ हे मातः मी कधीं तरी असत्य भाषण करतों काय ?

ष्यधिरथं क्रीडतः कंदुकं सा मे ॥ लेके छुपावत बिनदर्द जलद चोलीमे ॥ गतवति माता मयि दसनं कंदुकामे ॥ द्वार लगाके चिप झूट बैठी न्हानीमे ॥ अहमभयोऽगामन्यतो दिनांतिमैयामे ॥ चेंडुले आयो तकसीर किसीकी इसीमें ॥ न मृषा ब्रूयां व्रजजने सदाऽस्म्ययनुंकंपी ॥ मजवरि० ॥ २ ॥ अयि० ॥ यमुनातीरं यांतं मां काऽपि वैधूटी ॥ कहे मोहनजी मेरी नजर तुमपर बैठी ॥ दश दशनछदमिदमपरा प्राहर्सुकंठी ॥ कोणी म्हणे घरिं ये देईन दुधाची वाटी ॥ अंबैकं मां गोपीनामवृणोत्कोटी ॥ कोइ कच्छु कोई कच्छु बोली ये बात न झूटी ॥ वामनभावं दृष्ट्वाहुर्मामसि पापी ॥ मजवरि द्वेषें घेतात तुफानें गोपी ॥ अभंग ॥ एके दिनीं सायंकाळीं ॥ नंदा पुसे वनमाळी ॥ १ ॥ उद्यां जाईन मी राना ॥ घेवोनियां या गोधना ॥२ ॥ ॥ ३६ ॥ पद ॥ मनमोहन मुरलीवाला ॥ हृदयीं आला ॥ ध्रु० ॥ रुचली उंच घोंगडी त्याला ॥ कोमळ तुळसी पाला ॥ चारित वृंदावनीं वत्सांला ॥ वाटे प्राणसखा हा चिमण्या प्रिथमुलाला ॥ मनमोहन मुरली० ॥ १ ॥ गोरस गोपवधूंचें प्याला । ढेंकर देउनि उदरीं घाला ॥ चिन्हें शुभ्र दिसतीं अधराला ॥ त्याहूनि वरि कलगीत बरा खुलला गुछाला ॥ मनमोहन मुरली० ॥ २ ॥ पाहुनि वत्स वज्रवनितांला ॥ करतळिं ठेवित दहिंभाताला ॥ अंगुलिकांवरि शाकफळाला ॥ कांखे वेताटी हरि खोंवित जठरीं वंशाला ॥ मनमोहन० ॥ हृदयीं० ॥ ३ ॥ पाहुनि श्रीमद्भागवताला ॥ आशय पुसुनि बरा संतांला ॥ भूतमात्रीं भगवंताला ॥ पाहतां अमृतेश्वर हरि अवघा एकचि झाला ॥ मन० ॥ हृद० ॥ ३७ ॥ घनाक्षरी ॥ उपर एक समै शाम ॥ धरे खेलनका काम ॥ लिये गोवलसह राम ॥ जमुनाधाम पार हा ॥ १ ॥ ३८ ॥ श्लोक ॥ वामनी ॥ भुजंगप्रयात ॥ म्हणे कृष्ण त्या बाळसंतापहारे ॥ अरे ह्या स्थळीं सर्व संतां पहारे ॥ करी ठाव खेळाचिया संपदाहा ॥ जयां वाळवंटीं घडे संपदाहा ॥ ३९ ॥ पहा हे महा शीतळ स्वच्छ वाळू ॥ रुचे अन्न येथें क्षुधा तुच्छ वाळू ॥ पहा साउली दाट केवीं द्रुमाची ॥ नव्या पल्लवीं श्री पहा विद्रुमाची ॥ ४० ॥ शार्दूलविक्रीडित० ॥ झाडें पुण्यफळें करूनि सुफळें केलीं बरीं पोफळें ॥ नारेळें सजळें विचित्र उजळें हीं रम्य सीताफळें ॥ तैसीं हीं प्रबळें स्वसंचित बळें जीं तुंबळें जांभळें ॥ पुष्पें हीं विमळें अशोक बकुळें कुंदादिकांचीं कुळें ॥ ४१ ॥ दिंडी ॥ कृष्ण बोले गोपाळबालकांतें ॥ बसुनि येथें आजि करूं भोजनातें ॥ वत्स सोडा वनिं चरावया पाणी ॥ तया पाजुनियां म्हणे चक्रपाणी ॥ ४२ ॥ बरें बोलसि कृष्णजी तूं जसारे ॥ तसें वर्तुनि लक्षितों तूज सारे ॥ असे जेविति सोडून वांसुरांतें ॥ नभीं झालें आश्चर्य तैं सुरांतें ॥ ४३ ॥ श्लोक ॥ द्रुतवि० ॥ बहु खुजे अति वामन हो गडी ॥ तनु जशा भवसागर-सांगडी ॥ स्वनिकटत्व तयां बहु देव दे ॥ कवळ दे निज गुह्य तयां वदे ॥ ४४ ॥ आर्या ॥ व्रजबाळक दळभागीं केशव कोश स्थळीं विराजसे ॥ तें यमुना पुलिनें नलिनें कृत्रिम परि रुचिर न जळ कंजं तसें ॥ ४५ ॥

१ मी रस्त्यावर खेळत असतां माझा चेंडू ती गोपी. २ मी आपला चेंडू घेण्याकरितां तिच्याकडे गेलों असतां ती माझ्यापुढें घरास गेली. ३ मग मीही दिवस प्रहरभर होता म्हणून निर्भयपणें दुसऱ्या वाटेनें तिच्या घरीं गेलों. ४ मातुश्री मी कधींही खोटें बोलावयाचा नाहीं, आणि गोकुळांतील सर्व लोकांवर माझी कृपा आहे. ५ मी यमुनातीरावर क्रीडा करण्यास गेलों असतां कोणी एक स्त्री. ६ दुसरी म्हणाली कृष्णा, माझ्या ओंठास तूं चाव. ७ आई, याप्रमाणें मला एकट्याला कोट्यवधी गोपींनीं वेढा घातला. मी लहान आहे असें पाहून गोपी मला म्हणाल्या कीं कृष्णा, तूं पापी आहेस. ९ तट. १० कमल.

तेथें पाजुनि पाणी वत्स चरायासि सोडिले जवळीं ॥ पुलिनीं बसूनि भोजन करि हरि घेऊनि पंक्तिला गवळी ॥ ४६ ॥ **श्लोक** ॥ भुजंगप्र० ॥ असे कार्णिकी अंबुजामाजि जेवीं ॥ मुलांमध्यभागीं बसे कृष्ण जेवी ॥ मुखीं ग्रास सप्रेम उल्लास हातीं ॥ दहींभात दे देव लीला पहाती ॥ ४७ ॥ **आर्या** ॥ सुख काय ते वदावें प्रथम ब्रह्माचिया मुखीं कवळ ॥ घालिती मग आपुलिया चाखिति रस तेहि जो तयां जवळ ॥ ४८ ॥ देती मिटक्या दाविति अन्योन्य स्वस्वभोज्यरुचि रमती ॥ हांसती भोजन करितां हांसविति प्रभुसि गोप रुचिरमती ॥ ४९ ॥ वाम करीं दध्योदन अंगुलीसंधींत लवण शाक फळें ॥ धरि शृंग वेत्र कक्षीं जठरपटीं वेणु भक्तभाग्यबळें ॥ ९० ॥ यज्ञाचा भोक्ता करि भोजन घेऊनि पंक्तिला बाळ ॥ दुरुनी अवलोकुनि तें ब्रह्मादिक देव घोंटिती लाळ ॥ ९१ ॥ **श्लोक** ॥ **भागवत** ॥ मंदाक्रांता० ॥ बिभ्रद्वेणुं जठरपटयोःशृंगवेत्रे च कक्षे वामे पाणौ मसृणकवलं तत्फलान्यंगुलीषु ॥ तिष्ठन्मध्ये स्वपरिसुहृदो हासयन् नर्मभिः स्वैः, स्वर्गे लोके मिषति बुभुजे यज्ञभुक् बालकेलिः ॥ ९२ ॥ शार्दूलवि० ॥ वंशी नादनटी तिला कटि तटीं खोवूनि पोटीं पटीं ॥ कक्षे वाम पुटीं स्वशृंग निकटीं वेताटिही गोमटी ॥ जेवीं नीर तटीं तरू तळवटीं श्रीशाम देहीं उटी ॥ दाटी व्योम घटीं सुरां सुख लुटी घेती जटी धूर्जटी ॥ ९३ ॥ **श्लोक** ॥ वामनी ॥ स्वागता० ॥ वत्स सर्व शुक भागवतांत ॥ श्रीपती स्वशिशु भागवतांत ॥ जेवि तो म्हणति भागवतांत॥ स्वात्मता रसवि भागवतांत ॥ ९४ ॥ **कृष्ण अरण्यांत असतां गोपींची उक्ति ॥ पद ॥** धांव धांवबा धांव सांवळ्यारे ॥ दावि दावि पाय तुझे करिशि काय अझुनि गोवळ्यारे ॥ ध्रु० ॥ गोपिकाजनप्राणवल्लभारे ॥ मयूरपिच्छ धरिशी शिरीं श्रवणिं गुंजमुक्तपोवळ्यांरे ॥ धांव धांव० ॥ १ ॥ व्रजशिशुसवें ग्रास भाक्षिसीरे ॥ वृंदावनिं जाउनियां वळिसि गायि नीळ पिंवळ्यारे ॥ ॥ धांव धांवबा० ॥ २ ॥ कृष्ण तनुज हा विनवितो तुलारे ॥ धरुनि हात दावि वाट मायबाप सूता आंधळ्यारे ॥ धांव धांव० ॥ ३ ॥ **पद** ॥ गोधनें चारितां दाविती शक्ति ॥ हुतुतू हमामा घालुनी घेती कुस्ती ॥ ध्रु० ॥ एक नाचती बिलगती थडक्या देती ॥ एकमेकां मार्नेत बुक्या देती ॥ एक जानूचें मांदळ वाजविती ॥ एक नाकींचे चंग धुधुकार करीती ॥ २ ॥ **हमामा** ॥ हमामारे पोरा हमामारे ॥ ध्रु० ॥ हमामा घालीं सोई ॥ फोडीन तुझी डोई ॥ १ ॥ हमामा घालीं नेटें ॥ मोडीन तुझीं बोटें ॥२॥ **फुगडी** ॥ फुगडी दोन हातांची ॥ लई लई लाखोटा ॥ माझा भाऊ गोमटा ॥१॥ भावा शरण गेलिये ॥ सुखरूप जालिये ॥२॥ भाऊ माझा वडील ॥ मजला मोती घडील ॥ ३ ॥ प्रेम तान्हें भावाचें ॥ पढीये माझे जीवाचें ॥ ४ ॥ महावाक्य गूज गे ॥ केशव सांगे तूज गे ॥ ५ ॥ **फुगडी उभ्याची** ॥ फुगडी फूगे मागेंपुढें थूगे ॥ १ ॥ चिदानंदीं रंगें ॥ साधुचेनि संगें ॥ २ ॥ देहमदें फूगे ॥ भाग्यमदें फूगे ॥ ३ ॥ विषयमदें फूगे ॥ चिच्या तोंडा थूगे ॥ ४ ॥ **जातीण** ॥ **अभंग** ॥ फूगडी फूगडी खेळतातीं गडी ॥ लोटिताती घडी सार्थकाची ॥ १ ॥ देहुडे ते कर धरिती करानें॥ धरणि चरण जोडिताती ॥ २ ॥ प्रेमाच्या भरानें फिरती गरगरां ॥ फुंकिती फुंकारा मुखरस ॥३॥ **पिंगा** ॥ घालीं पिंगा बाळे ॥ सांडी विषयाचाळे ॥१॥ कामसंगा सोडी ॥ माज पोरी मोडी ॥ २ ॥ नाहीं समाधान ॥ हालवूं नको मान ॥ ३ ॥ सोहंप्रेमबोधें ॥ केशवीं ब्रह्मानंदें ॥ ४ **लपंडाव** ॥ **अभंग** ॥ मिळोनि सकळ हरीचे सांगाती ॥ प्रीतीनें खेळती

लपंडाव ॥ १ ॥ लाभाच्या विंदानें पळती फिरती ॥ पायांत शिरती एकमेकां ॥ २ ॥ गुंतोनि पडती मायेच्या पाउलीं ॥ लपतां तीं जालीं हिंपुटीं हो ॥३॥ कैसी खेळों लपंडाईरे कान्होबा ॥ पद ॥ चेंडू झेलारे झेला वरचेवरी झेला ॥ अभंग ॥ वृत्तिशून्य गोळा करिती गोपाळ ॥ मांडियेला खेळ वृंदावनीं ॥ १ ॥ गोपाळांचे वृंद चेंडू ते खेळती ॥ हरीचे लोळती अंगावरी ॥ २ ॥ भूमीसी टाकुनी उडविती अंतरीं ॥ वरिचा वरी करीं धरिताती ॥३॥ हरीचे पृष्ठीसी बैसती आपण ॥ कमठ सघन पृष्ठी ज्याची ॥ ४ ॥ टिपरी ॥ अभंग ॥ प्रेमाची टिपरी भावानें घेवोनी ॥ म्हाणावें वदनीं नाम सार ॥ १ ॥ उद्धाराचे टोले टणाटण हाणा ॥ टणाटण जाणा मारा उड्या ॥ २ ॥ खेळिया ॥ भिमातीरीं एक वसलें नगर त्याचें नांव पंढरपूर ॥ १ ॥ नंतर दहींहंडी फोडावी. अस्तु. याप्रमाणें वृंदावनांत व गोकुळांत अनंत लीला करून गोपींस, गोपांस व लहान मुलांसही भगवंतांनीं अत्यानंद दिला. असे श्रीकृष्णाचे निरंतर सहवासी जे गोकुळचे लोक त्यांच्या सुखाला अंतपार नाहींच. या अभिप्रायानें तुकाराम म्हणतात ॥ गोकुळींच्या सुखा अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ हेंचि दान देगा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥ गुण गाईन आवडी हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥ नलगे मुक्ति धन संपदा ॥ संतसंग दे गा सदा ॥३॥ तुका म्हणे गर्भवासीं सुखें घालावें आम्हासी ॥ ४ ॥ आरती श्रीकृष्णाची ॥ ओंवाळूं आरती मदन गोपाळा ॥ श्याम सुंदर गळां वैजयंती माळा ॥ ओंवाळूं ॥ ध्रु० ॥ चरण कमल ज्याचे अति सुकुमार ॥ध्वजवज्रांकुश ब्रीदाचा तोडर ॥ ओंवाळूं आरती० ॥ १ ॥ नाभीकमळीं ज्याच्या ब्रह्मयाचें स्थान ॥ हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥ ओंवाळूं० ॥ २ ॥ मुखकमळ पाहतां सूर्याच्या कोटी ॥ मोहियेलें मानस कोंदियेली दृष्टी ॥ ओं० ॥ ३ ॥ जडित मुकुट ज्याचा दैदिप्यमान ॥ तेणें तेजें कोंदलें अवघें त्रिभुवन ॥ ओं० ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देखियलें रूप ॥ रूपचि पाहों जातां झालें तद्रूप ॥ ५ ॥ ओंवाळूं आरती मदन गोपाळा ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेतत् ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ पालय पालय मां जगदंब ॥ दीनमनाथदयासरिदंब ॥ इति भजनं ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ जानकीजीवनस्मरण जयजय राम ॥ श्रीकृष्णजीकी जय ॥ इति गोपालकालाख्यानं समाप्तम् ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## कथा ११ वी.

## ललिताख्यान पूर्वरंग निरूपण.

श्रीमन्महागणाधिपतये नमः ॥ अविरलमदजल० ॥ इत्यादि मंगलाचरणम् ॥ रामचंद्र महाराज जयजय रामचंद्र महाराज ॥ इति भजनम् ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ जानकीजीवनस्मरण जयजयराम ॥ अभंग॥ ऐसा दात्या विसरावें ॥ तोंड कोणा पसरावें ॥ ध्रु० ॥ तो हा लक्ष्मीचा पती ॥ सर्व सुखाची विश्रांती ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धी ज्याच्या दासी ॥भुक्ति मुक्ति पायापाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे साई ॥ राहीं मुरोनिया

घायीं ॥ ४ ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जय जयराम ॥ आदौ कीर्तनारंभीं भगवत्प्रिय भक्तचूडामणी तुकारामाख्य साधु हे प्रभूची अनुपम दातृत्वशक्ति मनांत आणून आणि सर्व प्रकारें दीन अशा या किंचिज्ज्ञ जीवांची रात्रंदिवस अंतःकरणांतील अतृप्तिमूलक तळमळ पाहून यांनीं एक लक्ष्मीपति जो नारायण त्यासच शरण जावें म्हणजे सर्व कामना पूर्ण होतील असा विधि व्यतिरेक मुखानें स्वकृत अभंगांत प्रतिपादन करतात ॥ ऐशा दात्या विसरावें ॥ तोंड कोणा पसरावें ॥ १ ॥ बापांनो, ज्याच्या मनांत वैषम्य कधींच नाहीं, शत्रुत्वानें अथवा मित्रत्वानें वागणाऱ्यांसही जो सद्गतीच देणारा, ज्याच्या औदार्यासही जगांत तुलना नाहीं, जो अक्षय्य षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा दात्याला [ श्रीनारायणाला ] जर विसरावें तर कोणापासून इच्छा तृप्त होणार ? तर नारायणावांचून याञ्चा करण्यास अन्य स्थलच नाहीं. भगवंताचें दातृत्व वैषम्यविवर्जित आहे याविषयीं भागवतीं शुक्राचार्य म्हणतात ॥ श्लोक ॥ अहो बकीयं स्तनकालकूटं जिघांसयाऽपाययदप्यसाध्वी ॥ लेभे गतिं धात्र्युचितां ततोऽन्यं कं वा दयालुं शरणं व्रजेम ॥ १ ॥ अर्थ—अहो आश्चर्य, यद्यपि असाध्वी दुष्ट अशी पूतना श्रीकृष्णाला मारण्याच्या इच्छेनें स्तनसंबंधीं कालकूट म्हणजे विष पाजिती झाली, तथापि मातेला योग्य जी गति ती ज्या श्रीकृष्णापासून तिला प्राप्त झाली, त्यावांचून अन्य कोण दयाळू आहे ? कीं त्याला आम्ही शरण जाऊं ? तात्पर्य, श्रीकृष्ण हाच दयाळू व सर्व देण्यास समर्थ आहे. त्यावांचून कोणाला याञ्चा करावी ? या अभिप्रायानें तुकाराम म्हणतात ॥ ऐशा दात्या वि०॥ आतां प्रभूनें आपल्यास काय दिलें आहे म्हणाल तर पहा, सर्व पुरुषार्थोपयोगी हा देह परमेश्वरानें दिला आहे. ही देणगी काय सामान्य आहे; परंतु आपण जीव किती प्रमत्त झालों आहों कीं, त्या नारायणाचें स्मरणही आपण करीत नाहीं, याविषयीं कवि म्हणतात ॥श्लोक॥ दत्तो मानुषदेह एष भगवंस्त्वत्तोषणं नाचरन् ॥ सत्तोयादिभिरीहणैरनुदिनं मत्तो विलासादिषु ॥ वित्तोपाप्तिपरोऽभवं नच भवच्चित्तः कदा श्रीपते ॥ त्वत्तो नास्ति दयानिधिर्नरहरे मत्तो न मत्तोऽधिकः ॥ २ ॥ अर्थ—हे श्रीपते, तूं मला हा अलभ्य नरदेह दिला आहेस परंतु मीं तुझा संतोष होण्यासारखें कधींच आचरण केलें नाहीं. तर सुगंधयुक्त पाणी, मिष्ट भोजन इत्यादि विलासांविषयीं उद्युक्त होऊन वित्तोपार्जन करण्यांत मात्र तत्पर राहिलों. परंतु तुझें चिंतन कधींच केलें नाहीं. तथापि तूं आमची उपेक्षा करीत नाहींस, यावरून तुझ्यासारखा दयाळू कोणी नाहीं. आणि माझ्यासारखा दुसरा कोणी मत्त नाहीं. ॥ २ ॥ तात्पर्य, परमेश्वरानें आपल्यास हा देह दिला हीच ईश्वराची केवढी देणगी आहे ! याचा विचार केला असतां अन्य दाते अगदीं तुच्छ दिसतात. परंतु याचा उपयोग जीवांनीं विपरीत केला आहे याविषयीं वेंकटाध्वरी म्हणतात ॥ श्लोक ॥ क्लेशत्यागकृतेऽर्पितेन करणव्यूहेन देहेन चेत् स्वानर्थं बत जंतुरार्जयति चेन्मंतुर्न यंतुः कुतः ॥ शत्रिशत्रुजयाय नैजगुरुणा दत्तेऽर्थ तेनैव चेत्, पुत्रो हंति निजं वपुः कथयरे तत्रापराधी तु कः ॥ ३ ॥ अर्थ—परमेश्वरानें

झडकरी ॥ ध्रु० ॥ वासुदेव दिंडीगाण ॥ प्रसाद मागों आले जाण ॥ आणिक आले कोण कोण ॥ नांवें ऐकावीं त्यांचीं ॥ सद्गुरु० ॥ १ ॥ ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वाणी ॥ मागूं आले

सर्व दुःखाचा नाश व्हावा म्हणून दिलेला जो इंद्रियसमुदाय देह त्याच्या योगानें हा जीव जर आपला अनर्थ संपादन करील तर यांत ईश्वराचा काय अपराध आहे ? अहो, पित्यानें शत्रूंस जिंकण्याकरितां दिलेल्या शस्त्रानें पुत्र जर आपल्या शरीरावरच प्रहार करील तर त्याविषयीं अपराधी कोण ? अर्थात् पुत्रच. ॥ तात्पर्य—परमेश्वराच्या देणगीचा यथायोग्य उपयोग केला असतां प्राणी कृतकृत्य होतो यांत संशय नाहीं. अशा दात्याला सोडून इतरांजवळ तोंड पसरणें अगदीं अज्ञान आहे, म्हणून तुकाराम म्हणतात ॥ ऐशा दात्या वि० ॥ याविषयीं एका कवीची उक्ति आहे ॥ श्लोक ॥ मोचारसवाचाकथमाचारविहीनान् काचानिव याच्चा दुराचारसमर्थान् ॥ वाचमधिपाचार्य सुबाचारसहीनान् मा चालय मा चाल्य माचारुपदाब्जात् ॥ ४ ॥अर्थ—हे परमेश्वरा, तूं सर्व वाणींचा अधिप जो बृहस्पति किंवा ब्रह्मदेव त्याचाही गुरु आहेस तर माझी प्रार्थना इतकीच आहे कीं, हे भगवन् मला तुझ्या सुंदर चरणकमलावरून चंचल करूं नकोस. कारण तुजवांचून मी या केळीच्या [ कदलीफळाच्या ] रसाप्रमाणें मधुर अशा वाणीनें आचारहीन व दुराचरणांत निष्णात असे कांचेप्रमाणें तुच्छ जे धनिक लोक यांस कसा याञ्चा करूं ? तात्पर्य, ईश्वरावांचून अन्य कोणी दाता नाहीं. जे आहेत त्यांचें दान म्हणजे ॥ शाकायवास्याल्लवणायवास्यात् ॥ याप्रकारचें होय. याविषयीं कवींनीं चमत्कारिक वर्णन केलें आहे. ॥श्लोक ॥ संजल्पंत्यसुदानजातकुतुकं जीमूतवाहं शिबेर्व्यर्थं संप्रतिपादनं नच कविप्रीत्यै कुदानं बलेः ॥ अर्थी हंत दधीचि भानुसुतयो रद्यापि सत्राशनो, दातृत्वं धरणीसुतेश भवतो नाहं विजाने तथा ॥५॥अर्थ॥ असुदान म्हणजे प्राणदानाचे योगेंकरून ज्याला मोठें कौतुक वाटलें अशा जीमूतवाह राजाचें कांहीं लोक वर्णन करतात. परंतु श्लेषार्थानें कवि म्हणतो तें दान मोठें आश्चर्य मानण्याजोगें नाहीं. कारण मुळींच तें असुदान म्हणजे चांगलें दान नव्हे. तसेंच शिबिराजाचें जें दान तें व्यर्थच होतें. म्हणजे वि म्हणजे पक्षी तदर्थ होतें. याविषयीं भारतांत एक कथा आहे. शिबिराजाचें सत्व पाहण्याकरितां इंद्र व अग्नि श्येन आणि कपोत या पक्षांच्या रूपानें त्याजवळ गेले. तेव्हां कपोत राजास शरणागत होऊन म्हणाला, हा श्येन मला मारतो आहे यापासून मला वांचीव; श्येनही म्हणाला माझें ईश्वरनिर्मित भक्ष्य मला दे, नाहींपेक्षां याच्या वजनाइतकें तूं आपलें मांस दे. त्यावेळीं त्या श्येन पक्षास शिबीनें आपलें मांस दिलें. श्लेष स्पष्टच आहे कीं, असेंही शिबीचें दान परंतु तें व्यर्थ म्हणचे निरर्थक होय. याचप्रमाणें बलीचें कुदान म्हणजे पृथ्वीदान. त्यापासूनही कवीचा ( शुक्राचा ) संतोष झाला नाहीं, पक्षीं मुळींच कुदान ( वाईट दान ) त्यापासून कविसंतोष कसा होईल ? आणखी दधीची ज्यानें वज्र करण्याकरितां आपल्या अस्थि देवांस दिल्या तो व तसाच कर्ण हे मोठे प्रसिद्ध दाते, पण या दोघांचा याचक जो इंद्र तो अद्यापि सत्राशन म्हणजे यज्ञभाग भक्षण करणारा आहे, पक्षीं अन्नसत्रांत भोजन करणारा आहे. मग कसलें दें दातृत्व ! याकरितां कवि म्हणतो, हे धरणीसुतेश प्रभो रामचंद्रा, तुझें दातृत्व असें आहे कीं, एक वेळ ज्यास तूं दिलेंस तो दुसऱ्याची याञ्चाच करीत नाहीं. असें दातृत्व कोणासही नाहीं. हाच आशय मनांत आणून तुकाराम म्हणतात ॥ ऐशा दात्या विसरावें ॥ तोंड कोणा पसरावें ॥ १ ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हरहर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजय राम ॥ सबसंतनकी जय ॥ पहा, प्रभु

रामचंद्र सिंहासनारूढ असतां प्रभूकडे अनेक याचक आले आणि त्या सर्वांचे मनोरथ प्रभूंनी पूर्ण केले. याविषयीं कवि ललिताख्यान निरूपण करितात.

# अथ ललिताख्यान प्रारंभ.

॥ अथ ललितपदानि लिख्यंते ॥ **अभंग** ॥ रत्नजडित सिंहासन ॥ वरी शोभे रघुनंदन ॥१॥ वामांकीं ते सीताबाई ॥ जगज्जननी माझी आई ॥२॥ पश्चाद्भागीं लक्षुमण ॥ पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥ भरत शत्रुघ्न ते पाहीं ॥ चवरे ढाळिति दोहीं बाहीं ॥ ४ ॥ नळ नीळ जांबुवंत ॥ अंगद सुग्रीव बिभीषण भक्त ॥ ५ ॥ देह बुद्धि सांडुन पाहीं ॥ दास अंकित रामपायीं ॥ **भालदार** ॥ **पद** ॥ सुन सुन बेहया ॥ भालदार पद पाया ॥ ध्रु० ॥ लिया राम रामनामका भाला ॥ कामक्रोधकु मार डाला ॥ सुन० ॥१॥ रामनामका घोडा ॥ ये तो तीन लोकमें बडा ॥ सुन०॥२॥ त्रिगुण शिखरपर जाना ॥ व्हां रामनाम जप जपना ॥ सुन० ॥३॥ कहत कबीर सुन प्यारा ॥ चुका ले जन्ममरणका फेरा ॥ सुन० ॥ ४ ॥ ॥ **चोपदार** ॥ कबीत ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद झडकरी ॥ ध्रु० ॥ श्रीरामाजीकी सभा घनदाट मजालसथाट भरपूर भरीहै ॥ ब्रह्मा विष्णु शंकर चंद्र सुरज गुरु व्यासऋषि आये है ॥ इंद्र सिंहासन बैठे अरुण वरुण ऋद्धिसिद्धिपवन चौकीदार खडे है ॥ तेहतीस कोटी देव सुर नर गंधर्व यक्ष नाग किन्नर मुनिजन वालखिल्य चौसष्ठ जोगनी सहस्र कोटी कात्यायनी ॥ अष्टभैरव अष्टदिक्पाल खडे है ॥ नारद करत गायन तुंबर उद्धवाक्रूर प्रल्हाद भक्त विराजे ॥ गणपत करे नृत्य शारदा संगीत गावे ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र अठरा बरनके थाट मिलकूं आवे ॥ वासुदेव दिंडीगाण बाळसंतोष जुगत लगावे ॥ पांगुळ करे पुकार जोगी कानफटा आवे ॥ फकिर बहोत बैरागी ग्यान ध्यान गावे ॥ गोंधड गोंधळी गवालन श्रीकृष्णलीला गावे ॥ भुत्या वाघ्या नाचे डाकुलता होरा बतलावे ॥ सारमंडळ करे ख्याल कैकै शाहीर आवे पंडित करे बिचार ॥ बाजीगार चुट गाव महार करे जोहार ॥ सब याचक प्रसादमागनकु आवे ॥ तऱ्हातऱ्हाके नृत्य गावे बजावे अनंत मजालसमों लोक प्रेमभरित चरण भजावे ॥ तननं तननं धिगट धिगट धिमताल मृदंग बजावे ॥ कहे प्रेमळदास करो गुरुबचनकी आस सुनो सुजन आदमसे कदम तमाम चोपदार ललकारे ॥ बडिजाव महाराज ॥ **पद** ॥ हुकुम साहेबका ॥ मै तो चोपदार उनका ॥ ध्रु० ॥ राम लछीमन भरत शत्रुघ्न सीता माई देखा ॥ जांबुवंत हनुमान मिलाकर लूट दियी सब लंका ॥ हुकुम० ॥१॥ ब्रह्मा विष्णु महेश प्रभूका अवतार खासा ॥ इंद्र चंद्र और पावक भास्कर वाचस्पती गुरूका ॥ हुकुम सा० ॥ ॥ २ ॥ दत्तगुरु याज्ञवल्की अगस्ती विश्वामित्र देखा ॥ देव सनकादिक नारद तुंबर खडा रहे अब तुका ॥ हुकुम सा० ॥३॥ **पद** ॥ दालिबंद नौकर तेरा, विठुजि मैं दालिबंद नौकर तेरा ॥ हरदम मुजरा मेरा ॥ विठुजि० ॥ ध्रु० ॥ पांच हतियार एक बंध बांधु थाट थाट बहु मेरा ॥ विठुजी० ॥१॥ रामनामकी समशेर बांधू ॥ राखूं दरवाज तेरा ॥ विठुजी० ॥ ॥२॥ सुरतनुरतका कोट बनाऊं ॥ येही चाकर तेरा ॥ विठुजी०॥३॥ कहत कबीरा सुन मेरे लाला ॥ हरमद मुजरा मेरा ॥ वि० ॥ ४ ॥ **प्रसाद** ॥ **पद** ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद जी

चारी खाणी ॥ लिहिणार पंडित ज्योतिषी आणि ॥ थाट माट आले ते ॥ स० ॥ २ ॥ गोंधळ-डफकर भैरव जोगी ॥ बाळसंतोष आणि बैरागी ॥ फकिर डाकुलता तो वेगीं ॥ कानफाडा आला तो ॥ स० ॥ ३ ॥ अंध पांगुळ बहिरा मुका ॥ कैकै सवरी मुंडा देखा ॥ भाट किन्नर जटिल ऐका ॥ तिष्ठताती प्रसादा ॥ ४ ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद जी झडकरी ॥ ध्रु० ॥ जंगम सराफ आणि गारुडी ॥ वाघ्या मानभाव हात जोडी ॥ सोनार भुत्या घडोघडीं ॥ नटवा पुढें नाचतसे ॥ स० ॥ ५ ॥ सारे मंडपीं आले असे ॥ राव विनोदें बोलत असे ॥ महार जोहार करीतसे ॥ प्रसाद द्या द्या म्हणऊनी ॥ स० ॥ ६ ॥ ऐसे अपार भक्त आले ॥ प्रसाद देउनि तृप्त केले ॥ मेघश्यामाचीं पाउलें ॥ यदुवीर वंदितसे कीं ॥ स० ॥ ७ ॥ **वासुदेव** ॥ **पद** ॥ गोविंदा रामाहो ॥गोपाळा रामाजी ॥ ध्रु० ॥ सद्गुरुदेवाजीचे ॥ आम्हीं पाय वंदिले जी ॥ भवभय संशयो हे ॥ दुर्वृक्ष छेदिले जी ॥ अलक्ष लक्षबाणें ॥ संधान साधिलें जी ॥ गोविंदारामाहो ॥ गोपाळा रामा जी ॥ १ ॥ ह्या संतसज्जनांची ॥ कशी सभा बैसली जी ॥ दर्शनें आसबेडी ॥ तात्काळ तुटली जी ॥ जीव कीं शिव कीं हे ॥ अशी भ्रांती फिटली जी ॥ भाविकां साधकांची ॥ गुरुमाय भेटली जी ॥ गोविंदा रामा० ॥ २ ॥ चिद्घनाद्वैत देवा ॥ तुझें नाम चांगलें जी ॥ गाईन टाळघोळें ॥ मन माझें रंगलें जी ॥ सांवळें रूपडें हो ॥ असें ध्यान लागलें जी ॥ उद्धवें मुख तेव्हां ॥ अनंत भोगिलें जी ॥ गोविंदा रामा० ॥ ३ ॥ **पद** ॥ गुरुनाथ निरंजन हो आपरूप देखिलें जी ॥ ध्रु० ॥ पाहतां रूप तें बा ॥ माया लोभ आटला जी ॥ संसारबद्ध आशा ॥ भवपाश तुटला जी ॥ कल्पना द्वैत कामा ॥ तात्काळ आटली जी ॥ गुरु० ॥ १ ॥ अहंतादि त्रिविध ताप ॥ सर्वहि जाळिले जी ॥ नेलेंसे ब्रह्मभुवना ॥ अक्षयें दाटलें जी ॥ हा ब्रह्मरस प्याला ॥ घोंटुनी पाजिला जी ॥ विश्रांति झाली तेणें ॥ जिवपणा मुकलों जी ॥ गुरु० ॥ २ ॥ त्रिकुटावरी जातां ॥ श्रीहाट देखिलें जी ॥ गोल्हाट औटपीठ ॥ पाहोनी त्यागिलें जी ॥ ब्रह्मरंध्र सहस्त्रदळीं ॥ एक मूर्त बैसली जी ॥ त्याहुनि परात्पर ॥ सहज न्याहाळिलें जी ॥ गुरु० ॥ ३ ॥ रंगनाथ निजदाता ॥ त्यानें दान दिधलें जी ॥ निर्भय केलें ॥ तेणें द्वैतासी मुकलों जी ॥ गोपाळनाथ नामें ॥ स्वरूपीं आटलों जी ॥ गुरु० ॥ ४ ॥ **पद** ॥ गोविंदा रामाहो गोपाळा रामाजी ॥ ध्रु० ॥ श्रीकृष्ण सौंगड्याचे ॥ आम्ही बाळ बागडे जी ॥ आनंदें गाऊं नाचूं ॥ परी पाहूं त्याकडे जी ॥ इंद्रियें गायी आमुच्या जातात दोहींकडे जी ॥ अनुहत वेणुनादें वळी आपणाकडे हो ॥ गोविं० ॥ १ ॥ गोविंद मूर्तिभोंवते गोपाळ शोभती जी ॥ अहं सोहं हुंबरीनें करीं टाळी वाहती जी ॥ सत्कीर्तिचामरें हो हरीवरी ढाळिती जी ॥ श्रीकृष्ण मूर्तिवरूनी देहलोण उतरती हो ॥ गो० ॥ २ ॥ आनंद माधवानें ऐसा खेळ दाविला जी ॥ अहंकार कल्पनेशीं ॥ संतुष्ट मारिला जी ॥ निःसंग शस्त्रघातें ॥ भववृक्ष छेदिला जी ॥ गणपती नाम नौके ॥ ठेवुनी तारीलें हो ॥ गोविंदा रामा हो गोपाळा-रामा जी ॥ ३ ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद जी झडकरी० ॥ **दिंडीगाण** ॥ **पद** ॥ जयजय बा नारायणा ॥ मायबापा तूं बंधु सज्जना ॥ काय वर्णूं बा तुझिया गुणा ॥ केले दंडवत तुझ्या चरणा ॥ ज० ॥ १ ॥ येथें जन्मासी कोण कोण आले ॥ त्यांनीं आपुलें स्वहित काय केलें ॥ सत्य सद्गुरूला शरण गेलें ॥ त्यांनीं येऊनि स्वहित केलें ॥ जय० ॥ २ ॥ एक जाणोनी नेणते झाले ॥ देहममतेसी विसरोनी गेले ॥ अवघे प्रपंच विलया नेलें ॥ देहीं येउनी क्षीण

तोडियेले ॥ जय० ॥ ३ ॥ एक जाणोनी भोळा भाव ॥ भूतमात्रीं दाखविला देव ॥ आला चिद्धन स्वयमेव ॥ त्याचे चरण वंदी उद्धव ॥ जय० ॥ ४ ॥ पद ॥ माझ्या हरभऱ्या नारायणा ॥ तुझा भाजून केला चणा ॥ त्याला मेळवून हळदी कालवणा ॥ त्याचे दोन चार फके माराना ॥ वर तांब्याभर पाणी कां प्याना ॥ १ ॥ दिंडीगाणें ॥ ऐका माझें दिंडीगाणें ॥ गाणें गातों ज्याच्या सत्तेनें ॥ ज्याच्या तेजें सर्व देखणें ॥ द्वैत निरसोनि एक पाहणें ॥ १ ॥ आजीजीजीजी ॥ ऐका माझें दिंडीगाणें ॥ ध्रु० ॥ एक असोनि द्वैत भाविती ॥ रज्जूवरी सर्प जेवीं भ्रांती ॥ स्तंभीं पुरुषाचें भान अर्पिती ॥ निर्धारितां व्यर्थ जाली निगुती ॥ आजी० ॥ २ ॥ अखंड दंडायमान जे वृत्ती ॥ तेचि दिंडी धरिली हातीं ॥ अनुहत तंतु वाजती ॥ सुखानंदें झालीसे तृप्ती ॥ आजी० ॥ ३ ॥ गाणें ऐकणें दोनी एक जालीं ॥ ऐका म्हणतां लाज वाटली॥ मेघश्यामें एकात्मता केली ॥ यदुवीराला लुटी केली ॥ आजी० ॥ ४ ॥ सद्गुरु द्यावा प्र० ॥ ब्राह्मण ॥ पद ॥ चुडू चुडू चुडू यशोदा तल्ली ॥ ध्रु० ॥ चुडू अमानी येकडू वची नाडू ॥ पालू पेरगु वाडू तागी पोईन डू आमा ॥ चुडू० ॥ १ ॥ गोला वालदी कोंगू पठी नाडू ॥ गोपी कळनो प्रचकं आडूताडू आमा ॥ चुडू० ॥ २ ॥ यमुनकू मेमू लीलक पोंगा ॥ दोंगा कीष्णूडू गंगाकू वचीनाडू ॥ भक्तुलमू मेमू शर्णू पोंगा आमा ॥ चुडू० ॥ ३ ॥ पद ॥ पहागे पहागे पहा यशोदेबाई ॥ ध्रु० ॥ पहा पहा पहागे तुझा मुरारी ॥ दह्या दुधाची करितो चोरी ॥ राधिकेच्या पदरीं ॥ मागतो कुचदानगे ॥ १ ॥ जात होतों यमुनातीरीं ॥ तिकडून आला तुझा मुरारी ॥ दुष्ट वचनें बोले हरी ॥ दास धरितो चरणगे ॥ २ ॥ पहागे० ॥ पद ॥ ब्राह्मण वंदावे वंदावे ॥ कदापि न निंदावे ॥ ध्रु० ॥ नहुषें विप्रा छळिलें ॥ त्याचें शरीर अजगर झालें ॥ ब्राह्मण वंदा० ॥ १ ॥ सहज विनोद केला ॥ राजा परीक्षिती निमाला ॥ ब्राह्म० ॥ २ ॥ सद्गुरु द्यावा प्र० ॥ भाट ॥ बानी ॥ मेहरबान सलाम, बडे बडे सेट सौदागर सावकार सुभेदार हवलदार राजे रजवाडे राजकुमार भर सभामो गर्जेत भाट, भाट गजथाट साजे घोडेपर थाट थाटपीठपर जीन जडावके जडे है, आंगमो सरमज्याम जरदपीला गल बीच मोतनकी माला ॥ आंगपर शाला दुशाला सीरपेचका झलाला ॥ उपर चमक रही बाला ॥ रामराजा देनेवाला दातनको बोल बाला ब्रह्मभाटबखान बोला थरकत घोडा भटकत निशान अठरा बरनके राज्य महाराज ॥ कवीत ॥ छोटे छोटे हात छोटे छोटे पाव छोटे छोटे बाल गोविंद कन्हया, नाग फनाफन झुल रहि पगरी पटको मुखचुंबन लियो तेल फुलेल बनेल उगलीपर टेक नचावत मय्या, पुनीत जसोदा माता कुधिगट धिगट धीनाचत कन्हया ॥ कबित ॥ आनेकी वाट कोन, जानेका घाट कोन, ब्रह्मका कपाट कोन,कहासे जीव आया है ॥ जीव कोन, शिव कोन, शिवका स्वरूप कोन, माया कोन, धरनी कोन, धरनीकु धरे कोन, सोवनमो ज्यागे कोन, देहेले भागे कोन, वादचंद लागे कोन, कोन मो कोन समाया है, कहे निपटनिरंजन इतना नही बुझे तो झकमारन नरदेह पाया है ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी झडक० ॥ जोशी ॥ भविष्य ऐका दादानुरे बाबानु ॥ ध्रु० ॥ पंचविसांचा हा देहो बाहा देहो ॥ साधन बंधन सा धाहो बा साधाहो ॥ धरून नटली हा देहो बा हा देहो ॥ भवि० ॥ १ ॥ आलें संचित फळासी बा फळासी ॥ तो नर नये देहासी बा देहासी ॥ तीन ग्रह तुजपाशीं बा तुजपाशीं ॥ ते तुज करतील परदेशी बा

परदेशी ॥ २ ॥ त्रिगुणपंचक विषयाचें बा विषयाचें ॥ थोराथोराला भय त्याचें बा भय त्याचें ॥ दहा राशी हें बळ त्याचें बा बळ त्याचें ॥ अकरावें हें स्थळ त्याचें बा स्थळ त्याचें ॥ भविष्य ऐका०॥ ३ ॥ रात्रिसहित दिनमान बा दिनमान ॥ आटतील हे त्रिभुवन बा त्रिभुवन ॥ जरी तुज आपलें हित करणें बा हित करणें ॥ सद्गुरुचरण दृढ धरणें बा दृढ धरणें ॥ भवि० ॥ ४ ॥ कडाका मोठा होईल बा होईल ॥ काळ जगातें खाईल बा खाईल ॥ जळस्थळ अवघें जाईल बा जाईल ॥ निवांत होऊन राहिल बा राहिल ॥ भविष्य ऐ० ॥ ५ ॥ कृष्णरायाचा प्रभु जोशी बा जोशी ॥ सर्वही वस्तु त्यापाशीं बा त्यापाशीं ॥ क्षणांत हिंडे त्रिभुवनासी बा त्रिभुवनासी ॥ सुख भोगी मूळ मिरासी बा मिरासी ॥ भविष्य०॥६॥ **होरा** ॥ या रे जगामध्यें ब्रह्मराक्षस नांदतो ॥ त्या राक्षसानें पांच भूतें केलीं ॥ पांचापासून पंचवीस झालीं ॥ तीं एके ठायीं मिळालीं ॥ तें ऐका गा रायांनो ॥ १ ॥ त्या पंचविसांनीं देह धुंडिला ॥ बाबाचा जीव तोंडीं घातिला ॥ साधन करा तयाला ॥ पांच जिनसांची झाडणी करा गा ॥ रा० ॥ १ ॥ आधीं झाडणी अन्नाची करा ॥ दुसरी झाडणी मनपुरीची करा ॥ तिसरी झाडणी स्नेहाची करा ॥ हा एक विचार बरा ॥ सांगतों गा रायांनो ॥ २ ॥ चवथी झाडणी सुखशय्येची करा ॥ पंचक्रोशी हा विचार बरा ॥ त्रिवेणीचा संगम खरा ॥ वेद बोलतो गा रायांनो ॥ ६ ॥ **जोशी ॥ पद** ॥ मी आलों रायाचा जोशी, सत्य मानिसी ॥ ध्रु० ॥ कलपना बायको शेजारीण ॥ झगडा करी मोठा दारुण ॥ तिच्या पायीं होईल नागवण ॥ घर बुडविसी ॥ मी आलों० ॥ १ ॥ मनाजी पाटील देहगांवींचा ॥ विश्वास धरूं नका तयाचा ॥ घात होईल रे नेमाचा ॥ पडाल फशीं ॥ मी आलों० ॥ २ ॥ येथून पुढें बरें होईल ॥ भक्तिसुखें दोंद वाढेल ॥ बेडी कर्माची तुटेल ॥ सत्य मानसी ॥ मी आलों ॥ ३ ॥ पुढें काळ सन्निध ठेला ॥ माय धरीना लेकराला ॥ एका जनार्दनीं श्रोत्याला ॥ झणीं विसरसी ॥ मी आलों० ॥ ४ ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी०॥ **तुंबडीवाला** ॥ अवल एक निराकार मेरी तुंबडी भरदे ॥ जनीं ब्रह्माविष्णु रुद्र मेरी० ॥ मये दश अवतार मेरी०॥ छे दर्शनका पुर मेरी०॥ एक बीजका विस्तार मेरी तु० ॥ ब्रह्मा करे आकार मेरी० ॥ बोले रामानंदलाल मेरी० ॥ तुंबडी भरदे लाल तुंबडी भरदे० ॥ **भुत्या ॥ पद** ॥ उदोग उदो बोला ॥ सारा डोंगर गर्जला ग गर्जला ॥ ध्रु० ॥ दयाळ अंबाबाई ॥ आईनें मंदिरा जाब दिला ग दिला ॥ दिवस मावळला कोंडनपुरींच्या लवयनीग लवयनी ॥ दयाळ अंबाबाई आनंदें ये धाउनी ग, ये धाउनी ॥ **पद** ॥ आई रेणुके मूळ माया सुंदरी ॥ नांदते तुळजापुरीं जी ॥ ध्रु० ॥ आई कल्होळाची आंबोळ करी ॥ जडिताचा टोप शिरीं ॥ नाकीं मोतीं चकचक करी ॥ गाय मुखास जाय झडकरी ग ॥ आई रेणुके० ॥ १ ॥ माझे दयाळ तुकाबाई ॥ तुझें तुळजापुरीं ठाणें ॥ धांवणें धांवलीस केलें भक्तासाठीं येणें ग ॥ २ ॥ माझे दयाळ तुकाबाई किती वर्णूं मी तुझी थोरी ग ॥ आपल्या भक्तालागीं ॥ पावशी परोपरी ग ॥३॥ सद्गुरु द्यावा प्रसाद०॥ **जंगम ॥ पद** ॥ आतळ गंगा पातळ पाणी सीतळ होईरे जंगय्या ॥ ध्रु० ॥ सोनियाचे झारीमध्यें गंगाजळ पाणी ॥ आवडीनें पितां तूं सीतळ होईरे जंगय्या ॥ १ ॥ बारा वर्षें पूर्ण जाहलीं तुमच्या आमच्या भेटीला ॥ आज संधिशीं गांठ पडली तूं सीतळ होईरे जंगय्या०॥ आत० ॥ २ ॥ **पद** ॥ तो एक जंगमहो ॥ मूळतीर्थीं या संगम ॥ ध्रु० ॥ त्रिकूटावरी मठ केला ॥ त्याचा द्वैतभाव निमाला ॥ तो एक० ॥१॥ निर्विकार भूतमात्रा ॥

त्याला अक्षयीं माळा गात्रा ॥ तो एक० ॥ २ ॥ हेचि अंतरखुण दावी ॥ शांती भस्म कपाळीं लावी ॥ तो एक० ॥ ३ ॥ अक्षय भिक्षा मागे ॥ अखंड सद्गुरुभजनीं लागे ॥ ४ ॥ शिवदिन त्याला आधीं ॥ अय्या म्हणुनी शरण साधी ॥ तो एक० ॥ ५ ॥ सद्गुरु द्यावा प्रसादजी झ० ॥ अंधळा ॥ धर्म जागो सद्गुरुचा ॥ जो कां परोपकारी ॥ अंधळ्या दृष्टी देतो ॥ त्याचें नाम उच्चारी ॥ ध्रु० ॥ पूर्व जन्मीं पाप केलें ॥ तें बा अधिक विस्तारलें ॥ नाशिवंत विषयसुख ॥ सेवितां तिमिर कोंदलें ॥ चौऱ्यायशीं लक्ष योनी ॥ फिरतां दुःख भोगिलें ॥ ज्ञानदृष्टी हारपली ॥ दोन्हीं नेत्र आंधळे ॥ धर्म०॥ १ ॥ संसार दुःखमूळ चहूं-कडे इंगळ ॥ विश्रांती नाहीं कोठें ॥ रात्रंदिवस तळमळ ॥ कामक्रोध लोभ श्वान ॥ पाठीं लागले ओढाळ ॥ कवणा आतां शरण जाऊं ॥ दृष्टी देईल निर्मळ ॥ धर्म० ॥२॥ बहिरा॥ बहिरा मी झालों देवा ॥ तुझे गुण ना ऐकिले ॥ भवाचे प्रवाहीं मी पडलों ऐसें झालें ॥ ध्रु०॥ तें स्थान नाहीं होतें ॥ तयानें बुडविलें ॥ धांवबा पांडुरंगा ॥ दावी संतांचीं पाउलें ॥ बहिरा० ॥ १ ॥ संतांसीं विनावितों तुम्हीं जातां पंढरीसी ॥ सांगा माझी विनवणी ॥ एवढी पांडुरं-गासी ॥ बहिरा० ॥ ३ ॥ बहिरा मज ऐसें करी नाइकें कोणाची निंदा ॥ दुसरें मज कांहीं नको ॥ लावी रामनामीं सदां ॥ ब० ॥ ३ ॥ याचक मी हेंचि मागें ॥ देईं संतांची सेवा ॥ हेचि माझी प्रार्थना सांगा पंढरीच्या देवा ॥ खाकनाथ म्हणतसे विठ्ठलनाथापरी ध्यावा ॥ बहिरा मी ॥ ४ ॥ सद्गुरु द्यावा प्र० ॥ मुका ॥ पद ॥ मुका मी झालों देवा ॥ केला प्रपंच हेवा ॥ बहु दोष आचरलों ॥ पूर्व जन्मींचा ठेवा ॥ ध्रु० ॥ मुकलों पूर्व स्थान स्वरूपाचें विंदान ॥ माझा मी आहें कवण ॥ हें नकळेचि ज्ञान ॥ संतांच्या संगतीनें ॥ नाहीं आत्मनिवेदन ॥ गुरुकृपा मज व्हावी ॥ एवढें मागतों मी दान ॥ मुका मी० ॥ १ ॥ आतां मज वाचा देईं ॥ गुण वर्णीन मी कांहीं ॥ संत कृपा करतील तेचि दाखविती सोई ॥ याचक मी हेंचि मागें ॥ उदारा तूं दाता होई ॥ नाहीं तरी सोडी बिरुदा ॥ जाईन आपुल्या ठायीं ॥ मुका मी झा० ॥ २ ॥ माई होऊन दुरमाई नको होऊंची आतां ॥ आर्त माझें पुरवावें ॥ तुजवीण कोण दाता ॥ खाकनाथ हात ठेवी श्रीमस्तकावरुता ॥ विठ्ठलनाथा धन्य केलें ॥ वैष्णवासरता मुका मी झा० ॥ ३ ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद० ॥ **कैकाडीण** ॥ **पद** ॥ कैकाई कैकाई दादा दुरिल माझा देश ॥ अलक्षपूर नगर तेथें आम्हां रहिवास ॥ सहज आम्हीं बीज केलें शकुन सांगायास ॥ सांगितलें दादा धरीं पां विश्वास ॥ ध्रु० ॥ प्रथमाचि मी तंव दादा कैकाडीण झालें ॥ जेथिंचें तेथिंचें येथें अवघें संचलें ॥ होतां घडमोडी नाहीं स्वरुप कालवलें ॥ कैका० ॥ १ ॥ काळाई गोराई आई नव्हे सांवळाई ॥ मत्स्याई कुर्माई नव्हे वराई नरसाई ॥ वामनाई परसाई नव्हे रामाई कृष्णाई ॥ बौधाई कल्काई नव्हे सांगों काई ॥ कैकाई० ॥ २ ॥ दिसे तें तें भुर दादा सांगों काय अंतीं ॥ चंद्र सूर्य क्षणामाजीं भुर होउनी जाती ॥ चौदा मन्वंतरें दादा तींही भुर होतीं ॥ पाहतां अवघें दादा भुर अनुभव प्रचीती ॥ कैका० ॥ कैकाई कैकाई ऐसें बोलती घरोघरीं ॥ कैकाई कैकाई ऐसें कोणी न विचारी ॥ धनधान्य पुत्रपौत्रीं हाचि सोस भारी ॥ विषयलोभासाठीं दादा ठकल्या नरनारी ॥ कैका० ॥ ४ ॥ सहज पारिस दादा सांगेन हितगुज गोष्टी ॥ सांडूनिया मायाजाळ राहें निजदृष्टीं ॥ सद्गुरुकृपें केशवराजीं कैकाईसीं भेटी ॥ एकांतीं लोकांतीं पडली निज-वस्तशीं मिठी ॥ कैकाई० ॥ ५ ॥ सद्गुरु द्यावा प्रसाद० ॥ **गोंधळी** ॥ **श्लोक** ॥

प्रभो मोरया मोरया नाम तुझें ॥ कृपासागरा हेंचि माहेर माझें॥तुझी सोंड बा वांकडी एकदंता ॥ मला बुद्धि दे मोरया गुणवंता ॥ गण ॥ गणराज गजानन बावाहो ॥ ध्रु० ॥ व्याळ वेष्टित दोंद विराजे, नाचत रंगणीं पहावा हो ॥ १ ॥ आदि नारायण गणपति वरदे कीर्तनीं करी निजठेवाहो ॥ २ ॥ पद ॥ सुदिन सुवेळीं तुझा मांडिला गोंधळ हो ॥ पंचप्राण दिवट्या दोन्ही नेत्रांचे हिल्लाळ हो ॥ ध्रु० ॥ मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवना माझारीं हो ॥ चौक साधियेला नाभीकलश ठेविला वरी हो ॥ १ ॥ बैसली देवता पुढें वैष्णवांचें गाणें हो ॥ उदोकार गर्जेति कंठीं तुळशीचीं भूषणें हो ॥ २ ॥ स्वानंदाचे ताटीं धूप दीप पंचारती हो ॥ ओंवाळिली माता विठाबाई सर्वांभूतीं हो ॥ ३ ॥ तुझें तुज पावलें माझा नवस पुरवीं आतां हो॥ तुका म्हणे राखीं आपुल्या शरणागता हो ॥ ४ ॥ सद्गुरु ध्यावा प्र० ॥ गारुडी ॥ ॥पद॥ आदि पुरुष निर्गुण निराधारकू याद कर ॥ मेरे परवर दिगारकू याद कर ॥ जिने अजब माया बनाई उस वसतादकू याद कर, संत महंतकू याद कर, श्रीभगवंतकू याद कर ॥ १ ॥ जोग जुगतका बांदा तोडा, समदम शिरपर समला छोडा, समतावे सोसमका तुरा ॥ गुरु गारोडी बीर पुरा ॥ २ ॥ नैन चक्के पेहरे निद्रा, कान फारके पेहरे मुद्रा, अनुहात धनु बडा वाजे, नागासुरकी धुनी गरजे ॥३॥ चल चल चल चल, निरजन जंगलके जीवडे चल, खेलना है तो खेल उलट दृष्टीसे खेल, चुप करेगा बदफैल तेरा मुंडी काटेगा ॥ ४ ॥ साप सब भुले बीचू किडे प्रपंच पेटारेमें आन पडे, बडे बडे जनावर पाले, हारे जरदे उजले ॥ ५ ॥ काला पीला भला बे, भला अभिमान का जोडा, झुटमुट चुप लडा, नैनतो काटनें दवडा, दोर भीया दौर दौर दौर ॥ ६ ॥ हाय हाय हाय, आवा बा बा नही, आलालालालाला आतातातातााता ॥ ७ ॥ हाय हाय, डंक मारा रे मारा, भले भलेसे नही उतारा जद लगाये गुरुग्यानका म्होरा, जद जहेर उतारा ॥ ८ ॥ विद्या खेल हंडीबाग, हंडीबाग बडा अलबेला, हात हलावे पाव झुलावे, भाले भोले लोक भुलावे ॥ ९ ॥ आजी हंडीबाग, आहाजी, बाप बडा का बेटा बडा, नै जी बेटा बडा, बेटे आगे बाप खडा, गुरु बडा क्या चेला बडा, चेला बडा, चेले आगे गुरु खडा, धनी बडा क्या चाकर बडा, चाकर बडा, नै जी धनी आगे चाकर खडा, सास बडी क्या बोहु बडी, बोहुके आगे सास खडी, बीबी बडी क्या बांदी बडी, बांदी आगे बीबी खडी,लेकर निराधारकी छडी, बीबी खसम छातीपर चढी, तै बडा क्या मै बडा, तै आगे मै खडा, नही नही नही नही, ताहां नहीं, आलम छडा, लोभी अबेलेकूं उडावूं, फुक मारूं तो ज्या ज्या ज्या ॥ १० ॥ जहां आना नहीं तहां ज्या, जहां जाना नही तहां ज्या, अनादके झाड उपर ज्या, बोधके पहाड उपर ज्या, मेरे सद्गुरु दाताकु शरण ज्या, मेरे गुरु दाताकी इशनीसी लकरी, वो मूलमंत्रसे हातमें पकरी. फेर देखा तो मेरे मेरे पास॥११॥ अबी करूंगा खबूतरका तमासा, बिन पंखसें उडावत है. कैसा देखे तो आवे देख, ग्वलीतेमें घुसा, आव ये आव बाहेर आव, जीसे हात ना पाव, जीसे गांव ना ठाव, जीसे नही रूपरेखा नांव कछू बी नहीं,धीरे धीरेसे मंत्र बोलूं. लिंगदेहकी गांठ खोलूं. मै ऐसा एकवार खेल खेलूकी, मेरे बडे बडे नही खेले, अवल करूंगा एक, एकके करूं दो, दोके करूं तीन, तीनके करूं चार, चारके करूं पांच, पांचके करूं पचीस, पचीसके करूं छतीस, छतीस का करूं एक, एक नही तो एकाजनार्दन देख ॥ १२ ॥ सद्गुरु ध्यावा प्र० ॥ जोहार ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी देह गांवींचा महार, पार्वतीच्या गळ्याचा हार, ईश्वराचा सर्व शृंगार की

जी मायबाप ॥ १ ॥ सूच करून सांगतों साचें ॥ पैसे टाका माझ्या धन्याचे, बाकी ठकवूं नका त्याची कीं जी मायबाप ॥ २ ॥ पैल हा मनाजी मोठा फितवेकर, यानें लाविला थोर घोर, आवर बुद्धाई आपला पोर नाहीं तर धनी कोपल कीं जी मायबाप ॥ ३ ॥ विकल्पजी शेटे सदाची घान, पाहतात आपुलाची मान जेव्हां तोंडावर बसेल व्हान, तेंव्हां डोळे पुसाल कीं जी मायबाप ॥४॥ वासनाईनें फितूर केला, घराचा भेद बाहेर नेला, हा विचार धन्यास जर कळला, धनी धरून नेईल की जी मायबाप ॥ ५ ॥ तैशीच ही ममताई आवा, इनें लाविला उभा दावा, ती ओढिल हातापायाच्या सावा, मग थुंकाल कीं जी मायबाप ॥ ६ ॥ निंदाई आवाचें तोंड मोठें, मागें मागें मोडी बोटें, म्यां म्हटलें कोणा बोलती नेटें, हाद टाकून कीं जी मायबाप ॥ ७ ॥ आशा आवाचा खोटा चाळा, ज्यासी त्यासी घालिती डोळा, दावी नवनीताचा गोळा, परी अंतीं जड जाईल कीं जी मायबाप ॥ ८ ॥ हा देह पाटलाचा गांव, पांच पंचवीसांची वेगळालीच हांव, आणखी पन्नासांचें नांव, घेऊं नका कीं जी मायबाप ॥ ९ ॥ सद्गुरु ध्यावा प्र० ॥ **वाघ्या मुरळ्या** ॥ ह्या ह्या जेजुरी नगरांत ॥ कोऱ्या चंदनी महालांत ॥ धृ० ॥ म्हाळसा बाणाई भांडती ॥ ऐकून मल्हारी हांसती ॥ एकमेकींला बोलती ॥ बस माझ्या धाकल्या सवती ॥ ह्या ह्या जेजु० ॥ येळकोट भे० ॥ **पद** ॥ आले मार्तंड मल्हारी भक्तकैवारी ॥ घोड्यावर स्वार खंडा घेऊन करीं ॥ धृ० ॥ मणिमल्ल दैत्य माजला महा बाळिवंत ॥ तो कडेपठारीं वास करी निश्चित ॥ आसपास बारा योजनें फेरी घालीत ॥ गायी ब्राह्मण गवसून मारितसे त्वरित ॥ मणिमल्ल नांव ऐकतां धासत भारी ॥ हरिहरा विनविती प्रजा अवघ्या नरनारी ॥ आले० ॥१॥ संकट विष्णूसी पडलें पाहे शोधून॥ सांबाचें केलें स्तवन आला धांवून ॥ मणिमल्ल दैत्य संहारा तुम्हीं जाऊन ॥ त्याचा अंत तुमच्या हस्तें करा पावन ॥ ऐसें ऐकतांचि सांबानें केली तयारी ॥ धांवण्या धांवला भक्तांचा कैवारी ॥ आले मार्तंड० ॥ २ ॥ करून पिंवळा पोषाख पठाण वेष धरिला ॥ शिरीं पेच मंदील वर तुरा खोंविला ॥ घोड्याला कडका पटा जडाव जिन मिडला ॥ हुम्यावर कल्गी पिंवळा सडका त्याला ॥ पायजमा अंगरखा शेला पिंवळा भरजरी ॥ मोत्यांची कंठी प्रभा फांकली वरी ॥ आले० ॥ ३ ॥ जाऊन गांठिला दैत्य युद्ध मांडिलें ॥ दैत्याचे खंड विखंड करून टाकिले ॥ खंडेराव नामाभिधान तेथून पडलें ॥ दैत्यासी कड्याखालीं लोटून दिधलें ॥ म्हणूनी कडेपठार म्हणती सत्वरी ॥ गांवांत मर्दिला म्हणूनि नाम जेजुरी ॥ आले० ॥ ४ ॥ लोक जयजयकारें गर्जती आनंद झाला ॥ तेहतीस कोटी देवांनीं पुष्पवर्षाव केला ॥ मणिमल्ल दैत्य मारिला आनंद झाला ॥ ऐसा ऐकून प्रताप राजा होळकर आला ॥ देवळासी लाविलें काम केली तयारी ॥ नवलक्ष पायरी बांधून कळस वरी सुमुहूर्तें सिंहासनीं देव स्थापिला ॥ खाकनाथ म्हणे मी भावें शरण त्याला ॥ आले० ॥ ५ ॥ **पद** ॥ बानु म्हाळसा दोघी भांडती पहाती सकळ शाई ॥ यांत कांहीं बरी गत नाहीं ॥ धृ० ॥ बानु म्हणे म्हाळसा किती तरी जाती जाणें ॥ तुला काय होतें सांगून ॥ कल्पतरूच्या झाडाखालीं चिंध्यांस गांठी देणें ॥ तुला काय सांगू शहाणपण ॥ कशी येऊन पडली गळां ॥ लाविला ळळा भुलविला॥ राजा जीजीजी ॥ सवतीनें पाडली तूट ॥ केला लंपट मलया माझा जी जी ॥ गति तुझी ठाऊक अवघी कथा ऐक बाणाई ॥ धनगर तुझा पिता ऐक बाणाई ॥ बिरदेव तुझा चुलता ऐक बाणाई ॥ सदा अरण्यांत बसतो ऐक बाणाई ॥ गेला जन्म मेंढ्या वळतां ऐकी बाणाई ॥ ताड

कठिण शब्द बोलत काळजामधीं रुतली सुई ॥ यांत कांहीं बरी गत नाहीं ॥ १ ॥ सद्गुरु द्या० ॥ **फकीर** ॥ दिन पांचकी है जिंदगी ॥ करले खुदाकी बंदगी ॥ नहीं तो बडी शरमिंदगी ॥ गफलत छोड हुशार रहो ॥ १ ॥ जिनें आपकू जोया नहीं ॥ तनमनसे खोया नहीं ॥ मनमेलकू धोया नहीं ॥ स्नान किया तो क्या हुवा ॥ २ ॥ **सवाल** ॥ अल्लानें तुजकूं पैदा किया ॥ भला बुरा बतला दिया ॥ तूं पावेगा आपना किया ॥ गफलत छोड हुशार रहो ॥ २ ॥ **पद** ॥ संतनके संग ॥ खाई चिद्बुदकी भंग, सदा आनंदमो दंग फकीर ॥ १ ॥ ऐसे मलंग फकीर ऐसे ॥ धृ० ॥ संतनके चरन झटे ॥ सब जंजाल काळ तुटे ॥ त्रिभुवनका नाथ लुटे ॥ २ ॥ संतनका लिया दुमाल ॥ मेरा तुटा भवजंजाल ॥ कहत केशव कंगाल ॥ २ ॥ सद्गुरु द्या० ॥ **बैरागी** ॥ सची भई बैरागन दिलसे लगी लटक सीतारामकी ॥ सची० ॥ धृ० ॥ औरतसे कछु काम नही है व्यहनी माला काष्ठकी ॥ १ ॥ भाल तिलकहै नचहत टोपी ॥ छोडी आस धनमानकी ॥ २ ॥ मध्वनाथ जो रघुबरजीसे लगाल-गन्नही कछु बाकी ॥ ३ ॥ सद्गुरु द्यावा प्रासादजी झडकरी ॥ **पद** ॥ हाहा रमता जोगी रमता जोगी ॥ आया रे बाबू रमता जोगी ॥ धृ० ॥ कानोंमें कुंडल बिभुत लगावे ॥ गलबीच निर्गुण सैली रे बाबु ॥ रमता० ॥ १ ॥ गौडबंगाला मंत्र तुमारा ॥ नाथ भये गिरधारी रे बाबु॥ रमता० ॥ २ ॥ कहत कबीरा सुनभई साधु ॥ अनुहात कींगरी बजावे रे बाबु॥ रमता जोगी आयारे० ॥ ३ ॥ सद्गुरु द्यावा० ॥ **शाहीर** ॥ **लावणी** ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा हृदयीं वागावा ॥ धृ० ॥ ज्याचें पदपंकजरज सुरसंघें मस्तकीं धरावें ॥ ज्याच्या नतभक्त-जनाच्या संगें भवताप सरावे ॥ ज्याणें सिंधुरासुरादिक मर्दिले स्वभावें ॥ तो हा गणराज वरद मागावा रंगीं रंगावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक० ॥ १ ॥ शुंडाभुजदंड सुमंडित ज्याचे कुंडलें लटकती ॥ श्रवणीं रंगामध्यें तुंदिल नाचे पाऊलें पटकती ॥ भुलले गण किन्नर गंधर्वांचे गायनीं अटकती ॥ ऐसा गजवदन काय सांगावा ॥ स्वमनीं लागावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा० ॥ २ ॥ हस्तीं वर परशु मोदकांकुश हे शोभतात चारी ॥ माथां मणिमुकुट झळाळूनि राहे दूर्वा उपचारी ॥ अंगीं सर्वोत्तम सुषमा वाहे विद्यामृत चारी ॥ वाटे कविराय सदा भागावा ॥ तत्पदिं जागावा ॥ वदनीं श्रीविघ्नविनायक गावा हृदयीं वागावा॥ ३ ॥ ॥ **लावणी** ॥ वंदे श्रीगजमुखमगजाबालं ॥ विधुमुललितभालं ॥ धृ० ॥ चंडीस्तनमंडितशुंडादंडं मदमर्दितगंडं ॥ सांग श्रीमंगलविभवकरंडं ॥ कृतादितिकुलदंडं ॥ दूरीकृतपदनतजनभवजालं ॥ विधु० ॥ १ ॥ गौरीपरमेश्वरकुतुकारामं ॥ कृतविघ्नविरामं ॥ कामंत्रिभुवनैकपूरितकामं ॥ सुवरदमाभिरामं ॥ शरणागत परिजन करुणाबालं ॥ विधुमुल० ॥ २ ॥ आद्यं विद्यामृतपारावारं ॥ विधिजगदाधारं ॥ ३ ॥ कंठालंबितमणिमुक्ताहारं ॥ श्रितसपदगारं ॥ धीरंकविरायपिकैकरसालं ॥ वंदे श्रीग० ॥ **लावणी** ॥ भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा ॥ धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ धृ० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरी हरी ॥ जरा तरी समज धरि अंतरीं ॥ हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि तूं शिरीं ॥ मठाची उठाठेव कां तरी ॥ वनांत अथवा जनांत हो कां मनांत मलत्यापरी ॥ हरीचें नाम भवांबुधि तरी ॥ चाल॥ काय गळ्यांत घालुनी तुळशीचीं लांकडें ॥ हीं काय भवाला दुर करतील माकडें ॥ बाहेर मिरवीती आंत हरिशीं वांकडें ॥ अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा ॥ धरिसि रे हरिचा सेवक सुधा ॥ १ ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ काम कोपला ॥

आंतुनि बाहेर म्हणविशी भला ॥ वित्त पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला ॥ असें हरि म्हणतो नुमजे तुला ॥ दांभिक वर संभावित अभ्यंतरीं नाहिंसा बिंबला ॥ बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चाल ॥ तूं पोटासाठीं करि खटपट भलतिशी ॥ परि भक्तिरसाविण हरि भेटेल काय तुशीं ॥ काय ध्यान धरूनियां गोमुखीला जाळिसी ॥ स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला बुधा ॥ धरिशि तरि० ॥२॥ टिळा टोपिवर शिळा पडो या बिळांत करिशी जपा ॥ तथापि न होय हरीची कृपा ॥ दर्भ मुष्टिच्या गर्भि धरुनियां निर्भर पशुच्या वपा ॥ जाळिशी तिळां तांदुळां तुपा ॥ दंड कमंडलु बंड माजविशि मुंड मुंडिशी तपा ॥ न सार्थक लक्ष्या साऱ्या गपा ॥ चाल ॥ ही बारबार तलवार येईल काय पुन्हां ॥ ह्या दुर्लभ नरदेहांत ठेविशी कुन्हां॥ भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा ॥ धर्म कळेना धर्म घडेना कर्मचित्त न द्विधा ॥ सदा हरि कविरायावर फिदा ॥ ३ ॥ भला जन्म हा तुला लाभला० ॥ धरिशि तरि० ॥ **भैरवजोशी**॥ सिद्धा जागता जग जोगी रे जग जोगी रे, सिद्धा जागता ॥ विश्वविभूति लावूनि अंगीं ॥ अंगीं रे बा ॥ दुर्जेपण नुरविलें जगीं ॥ अनुहत वाजती शिंगी ॥ १ ॥ ज्ञान वैराग्य उपरम जाणें ॥ तोचि त्रिशूल हातीं धरणें ॥ कामक्रोध केले छेदन ॥ बोध डौर करीं घेऊन ॥२॥ जोगी नामरूपातींत ॥ वर्णव्यक्तिभेदरहित ॥ मेघश्यामीं हाचि सिद्धांत ॥ यदुवीरा तोंचि तें प्राप्त ॥ ३ ॥ सद्गुरु० ॥ **बाळसंतोष** ॥ तुझे आंगींचा उतारा ॥ तो मज देईगा दातारा तेणें न ये मी संसारा ॥ बाबा बाळसंतोष ॥ १ ॥ काया कबाय टोपी दान ॥ अहंदेही शेला दान ॥ मागतसे तुज लागोन ॥बाबा० ॥ २ ॥ जितेंद्रिय कटिवेष्टन ॥ सम वदनीं दे भोजन ॥ पंचविषयीं देणें दान ॥ बाबा० ॥३॥ आशा साडी चोळी देई ॥ तृष्णाधटी दे गे बाई ॥ नकरी अनुमान कांहीं ॥ बाबा० ॥ ४ ॥ मेघश्यामचरणीं मन ॥ ठेवूनियां करणें दान ॥ यदुवीर करी दातेपण ॥ बाबा ॥ ५ ॥ सद्गुरु० ॥ **प्रसादाचा** ॥ **अभंग** ॥तीर्थ चरणींचें शीतळ ॥ गळां तुळशीची माळ ॥१॥ इतुकें झडकरी पाठवावें ॥ नाहीं तरी बळिया होऊनि राहावें ॥ ध्रु० ॥ चुवा चंदन केशराचा ॥ विडा आपुले हातींचा ॥ महा प्रसाद ताटींचा ॥ विडा आपुले हातींचा ॥ २ विनवी जगन्मित्र नागा ॥ सद्गुरूतें जाऊनि सांगा ॥ ३ ॥ असो. याप्रमाणें वासुदेव, दिंडीगाण, अंध, बहिरे इत्यादि अनेक प्रकारचे याचक आले; परंतु प्रभूंनीं ज्यास जी इच्छा होती ती सर्व पूर्ण करून त्या सर्वांस कृतार्थ केलें. इतर दात्यांजवळ सर्व प्रकारच्या इच्छा पूर्ण व्हावयाच्या नाहींत. फार झालें तर द्रव्यसाध्य पदार्थ ते देतील. प्रभु रामचंद्र महाराजांच्या दरबारांत षड्गुणैश्वर्य, ऋद्धि, सिद्धि, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे सर्व पदार्थ अखंड परिपूर्ण आहेत. जो ज्या वेळेस जें मागेल तें त्यास देऊन त्याची पुनर्याचना प्रभु उरूं देत नाहींत. याकरितां तुकाराम म्हणतात ॥ ऐशा दात्या विसरावें तोंड कोणा पसरावें ॥ १ ॥ **आरती रामाची** ॥ उत्कट साधुनि शिळा सेतू बांधूनी ॥ लिंग देह लंकापुर विध्वंसूनी ॥ कामक्रोधादिक राक्षस मर्दुनी ॥ देह अहंभाव रावण निवटोनी ॥ जयदेव जयदेव जय निजबोधा रामा ॥ परमार्थी आरती परिपूर्ण कामा ॥ध्रु०॥ प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला ॥ लंका दहन करुनी अखया मारिला ॥ मारिला जंबुमाळी भुवनीं त्राहाटीला ॥ आनंदाची गुढी घेऊनी आला ॥ जय० ॥ २ ॥ निजबळें निजशक्तीं सोडविली सीता ॥ म्हणुनी येणें झालें अयोध्ये रघुनाथा ॥ आनंदें ओसंडे वैराग्य भरता आरति घेउनि आली कौसल्या माता ॥ जयदेव० ॥ ३ ॥ अनुहतध्वनि गर्जेति अपार ॥

अठरा पद्में वानर करिती भुभुःकार ॥ अयोध्येसी आले दशरथकुमर ॥ नगरीं होत आहे आनंद थोर ॥ जयदे० ॥ ४ ॥ सहज सिंहासनीं राजा रघुवीर ॥ सोहंभावें तया पूजा उपचार ॥ सहजाची आरती वाद्यांचा गजर ॥ माधवदासा स्वामी आठव ना विसर॥जयदे० ॥ २ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वानुसृतस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ १ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरि ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ ९ ॥ हरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥ इति भजनं ॥ पुंडलीकवरदे हरि विठ्ठल ॥ पार्वतीदते हरहर महादेव ॥ जानकी-जीवनस्मरण जयजय राम ॥ सब संतकी जय ॥ बाळगोपाळकी जय॥सद्गुरु महाराजकी जय॥

भाग दुसरा समाप्त.